# चि न्त नि का

[ ॲमिल या थोर पाश्चिमात्य विचारवंताच्या दैनंदिनीचा अनुवाद ]

## – खंड पहिला –

: अनुवादक :

सा ने गु रु जी

किंमत ६॥ रुपये

: प्रकाशक :
रा. ज. देशमुख
देशमुख आणि कंपनी
१९१ शनवार, पुणें २.



२ मुखपृष्ठावरील चित्र श्री. दीनानाथ दलाल यांचें आहे.

: मुद्रक :
रमाकान्त वेलदे
सुदर्शन प्रेस
नाशिक

जून १९४७

# प्रस्तावना

ॲमिल हा एक थोर विचारवंत एकोणिसाव्या शतकांत युरोपमध्यें होऊन गेला. जीनेव्हा येथें तत्त्वज्ञानाचा तो प्राध्यापक होता. त्यानें स्वतंत्र असें फारसें लिखाण केलें नाहीं आत्मविश्वासाचा त्याच्या ठिकाणीं अभाव होता. परंतु तो रोज आपली दैनंदिनी लिहून ठेवीत असे. जेव्हां जेव्हां वेळ मिळे तेव्हां तेव्हां तो स्फुट विचार लिहून ठेवीत असे. हजारों पानें याप्रमाणें त्यानें लिहून ठेविलीं. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या या अपार लेखनांतील कांहीं वेचें मित्रांनीं निवडून छापिलें. ॲमिलचें प्रकाशित झालेलें हेंच काय तें साहित्य. ॲमिलची डायरी म्हणून हें पुस्तक प्रसिद्ध आहे. महर्षि टॉल्स्टॉयच्या मुलीनें ॲमिलच्या कांहीं उताऱ्यांचें रशियन भाषेंत भाषान्तर करून प्रसिद्धिलें होतें. टॉल्स्टॉयनें त्याला प्रस्तावना लिहिली होती. ती प्रस्तावना चिन्तनिकेच्या दुसऱ्या खंडाच्या शेवटीं देण्यांत येणार आहे. जगांतील अमर अशा पुस्तकांपैकीं हें एक आहे, असें त्यानें तींत म्हटलें आहे.

ॲमिलच्या या दैनंदिनींत नाना विषयांवर विचार आले आहेत. येथें एक सुरस मेजवानी आहे. अमुक एक येथें नाहीं! असें नाहीं. आत्म्याचें हें विश्वरूपदर्शन आहे. अंतर्बाह्य सृष्टीचें येथें मनोरम चित्रण आहे. तत्त्वज्ञान, इतिहास, राज्यशास्त्र, काव्य, टीकाशास्त्र, धर्म, मृत्यु, स्त्रिया, मुलें, संसार, शिक्षण, निसर्ग, सर्वांवर येथें सुंदर विचार आहेत.

ॲमिलचें हें पुस्तक एके काळीं माझी जणूं गीता होती. १९२९ मध्यें

अंमळनेरच्या छात्रालयांत असतांना आमचा गोपाळ गद्री आजारी पडला. हें पुस्तक वाचीत मी त्याच्याजवळ बसून असें. ३० सालीं तुरुंगांत हेंच पुस्तक माझ्याजवळ होतें. त्रिचनापल्लीच्या तुरुंगांत असतांना तेथलि सुपरिन्टेन्डेंटनें माझ्याजवळून हें पुस्तक वाचायला नेलें. पुढें सुटतांना मी तें मागितलें नाहीं. म्हटलें, आपली आठवण त्यांच्याजवळ राहील. कारण मीं खुणा केलेले भाग त्यांनाहि आवडले होते.

त्रिचनापल्लीच्या तुरुंगांत या पुस्तकाचें कांहीं भाषान्तर मीं केलें होतें. पुढें गांधी -आर्विन करारामुळें मी सुटलों. ३१ सालीं बाहेर आल्यावर वेळ कोठला ? पुढें ३२ सालीं पुन्हां कृष्णमंदिरांत गेल्यावर मीं हें भाषान्तर हातीं घेतलें. नाशिकच्या तुरुंगांत तें मीं पुरें केलें. मधले कांहीं थोडे उतारे मीं सोडून दिले होतें. परंतु बहुतेक सर्व पुस्तक मीं अनुवादून ठेवून दिलें होतें.

१९४० मध्यें या अनुवादांतील कांहीं निवडक वेचें प्रसिद्धीसाठीं मी लिहून काढीत होतों. परंतु मला पुढें अटक झाली नि तें काम तसेंच राहिलें. १८ वर्षें माझ्या पेटींत पडलेलें हें भाषान्तर महाराष्ट्रीय वाचकांसमोर आज येत आहे. या पुस्तकानें मला अपार आनंद दिला आहे. तसा मराठी वाचकांसहि मिळो हीच आशा आहे.

—साने गुरुजी

# चिन्तनिका

१

ईश्वरप्राप्तीसाठीं एकाच गोष्टीची आवश्यकता आहे. आपलीं सारीं इंद्रियें, मनाच्या व बुद्धीच्या सर्व शक्ति म्हणजे ईश्वराकडे जाण्याची साधनें आहेत. त्याच्याकडे जाण्याचे हे मार्ग आहेत. ईश्वराची पूजा करण्याचें, त्याची चव घेण्याचे हें सगळे प्रकार आहेत. जें जें क्षणभंगुर आहे त्याच्यापासून दूर राहण्यास आपण शिकलें पाहिजे; आणि जें शाश्वत आहे, स्वतंत्र व निरुपाधिक आहे त्यालाच आपण चिकटून राहिलें पाहिजे. जगांतील इतर सर्व गोष्टी म्हणजे आपल्याजवळ ठेवलेली ठेव आहे. जणूं तें ऋण आहे. त्याच्या आसक्तींत आपण गुंतून जाऊं नये. वस्तुमात्रा-कडे आदरबुद्धीने पाहणें, नीट समजून घेणें, जें वाट्यास येईल त्याचा स्वीकार करणें, भावनांचे संवर्धन करणें, जवळ असेल तें देणें, आपलें कर्तव्य करणें, हा माझा धर्म आहे. हा माझ्या जीवनाचा कायदा, ही माझी नीति, माझा स्वर्ग, माझें सुख यांत आहे. जें काय व्हायचें असेल तें होवो. मृत्युही आला तरी चिंता नाहीं. माझ्या जिवा, अंतरंगांत शान्तीशीं एक-रूप होऊन राहा. मनांत वादळे नकोत. प्रभूच्याजवळ बसला आहेस, त्याच्या जवळ बोलत आहेस अशा वृत्तीनें रहा. ज्या विश्वव्यापक

शक्तीच्या विरुद्ध तुला जातां येत नाहीं, त्या शक्तीच्या स्वाधीन स्वतःचें जीवन कर. तुझ्या जीवनाचें, तुझ्या आयुष्याचें त्या शक्तींना जें कांहीं करावयाचें असेल ते खुशाल करूं दे. ' मृत्यू अजून मला अवसर देत असेल तर ठीकच आहे. आणि त्याचें बोलावणें जवळ आलें असलें तरीहि हरकत नाहीं. मृत्युशय्येवर खितपत पडून रहायचें नशीबी असेल तरीहि मी तयार आहे. या जगांत यश मिळण्याचा, कर्तृत्व दाखविण्याचा एक मार्ग मला बंद झाला, तरी धीरोदात्तता दाखविण्याचा दुसरा मार्ग मला दिसूं लागेल. नैतिक मोठेपणा, एकप्रकारची वैराग्यशील त्यागबुद्धि, सारें शांतपणें सहन करण्याची वृत्ति यांचा मार्ग मला दिसूं लागेल. प्राणिमात्राच्या ठिकाणीं मोठेपणाची क्षमता आहे. ईश्वराला सोडून या विश्वांत जर कोठें जाणें शक्यच नाहीं तर मग त्यालाच धरून राहा.

× × ×

२

आपण ज्या काळांत वावरत असतों, त्या काळाचें मूल्यमापन, निरीक्षणपरीक्षण या विराट् विश्वाच्या इतिहासाच्या दृष्टीनें करावें. असें केल्यानें आपले विचार विशाल होतात. प्रगल्भ नि उदार होतात. आकाशांतील अनंत ताऱ्यांचा आपण विचार करावा; भूगर्भशास्त्राचा विचार करावा; प्राणिशास्त्राचा विचार करावा. आपण असें करूं लागलों, या विश्वेतिहासाच्या दृष्टीनें आपण पाहूं लागलों, म्हणजे मग आपणांला स्वतःचें किंवा राष्ट्राचें जीवन एखाद्या क्षुद्र घुंगुरट्याच्या जीवनाप्रमाणें दिसूं लागेल. आणि एखाद्या क्षुद्र घुंगुरट्याच्या जीवनातही अनंत इतिहास, महान् विश्व दिसूं लागेल. राष्ट्राराष्ट्रांतील रणधुमाळीची धूळ जरी सर्वत्र उडालेली असली, असंख्य घडामोडींचा गदारोळ सभोंवतीं जरी चालत असला, तरी मग आपण अधीर होत नाहीं. आपण अगदीं क्षुद्र आहोंत तर आपण मोठेही आहोंत. दोहोंची जाणीव आपणांस विश्वेतिहासाची दृष्टि देत असते. आकाशांतील तारकांवर

बसून तेथून, त्या उंच ठिकाणाहून आपण आपलें हें क्षुद्र मर्त्यजीवन पाहूं शकतों. आपल्या या लहानशा धुरोपांतलि जे विचारवारे आहेत त्यांच्याकडे त्या परमोच्च स्थानापासून पाहूं शकतों.

× × ×

३

खरोखर विचारपूर्वक पाहिलें, तर आपलीं सारीं कर्में, आपलें सारें शिकणें सवरणें या सर्वांचा उपयोग आपल्या मनाचें स्वरूप समजून घेण्यासाठीं आहे. सारें मनाच्या अभ्यासासाठीं आहे. आपल्या मनाचीं नानाविध रूपें आपण पाहातों. आपलें मनच सर्व क्रियांतून प्रकट होत असतें. त्याचींच स्थित्यंतरें आपण बघतों. सगळया विषयांच्या मुळाशीं मनाचा अभ्यास आहे. इतर सर्व अभ्यास या मनाच्या अभ्यासाकडे आपणांस नेत असतात.

× × ×

४

आज सहा वर्षांनीं जीनेव्हाला मी परत येत आहे. या सहा वर्षांत मी कितीतरी प्रवास केला. मनावर कितीतरी संस्कार झाले, ठसे उमटले. मी शेकडों वस्तु पाहिल्या. मनांत हजारो विचार आले गेले. या सहा वर्षांत अनंत वस्तु नि अनंत व्यक्ति डोळयांसमोरून गेल्या. बाह्यसृष्टींत व माझ्या अन्तःसृष्टींत केवढा फरक झाला आहे! गेलीं सहा सात वर्षें माझ्या आयुष्यांतील महत्त्वाचीं होत. कारण या वर्षांत माझी बुद्धि जागी झाली; या वर्षांनीं जीवनांत जीवन आणलें.

× × ×

५

आज तिसरे प्रहरीं तीनदां बर्फाचें वादळ झालें. गरीब बिचारीं फुललेलीं झाडें! सहा वर्षांपूर्वी मी येथून गेलों, त्या वेळची सृष्टि व आतांची सृष्टि यांत किती अंतर आहे! ज्या वेळेस सहा वर्षांपूर्वी मी येथून गेलों, तेव्हां वसंत ऋतु होता. वृक्षवेलींनीं नवपल्लवांचे हिरवेंगार वासंतिक पोषाख घातले होते, आणि फुलांच्या मनोहर अशा विवाह-मंगलमालाच जणूं त्यांनीं धारण केल्या होत्या. मी जात असतां माझ्याकडे पाहून जणूं तीं स्मित करीत होतीं. बगीचामधील लिलॅक फुलांचा सुगंध घेऊन येणारा वारा माझ्या तोंडासमोर घोंघावत होता, असा तो काळ होता.

× × ×

६

माझ्यामध्यें अपूर्व अशी बुद्धिमत्ता आहे असें मला कधींच वाटलें नाहीं. अलौकिक असें माझ्यामध्यें कांहीं आहे असा अनुभव मला कधीं आला नाहीं. यश मिळवीन, वैभव मिळवीन, सुखें मिळवीन, अशीं स्वप्नें माझ्या मनश्चक्षूंस कधीं दिसलीं नाहींत. आपण कीर्तिमान् झालों आहोंत असें कल्पनेच्या साहाय्यानेंहि मी कधीं पाहूं शकलों नाहीं. मी लग्न केलें आहे, पति व पिता झालों आहे, वजनदार असा प्रतिष्ठित नागरिक बनलों आहे, असेंहि मी मनांत कधीं कल्पिलें नाहीं. आपलें पुढें काय होणार या विषयीं मी उदासीन असें. माझा स्वतःवर बिलकूल विश्वास नाहीं. माझें हें औदासीन्य, माझा हा आत्मविश्वासाचा अभाव, या कशाच्या बरें खुणा?

जीं जीं स्वप्नें मी मनांत आणतों ती सारीं असत्य नि अंधुक अशींच असतात. खरें म्हटलें तर मी जगूं नये. जगण्याची पात्रता माझ्याठायीं नाहीं. माझें मन मला म्हणतें, "तुझें खरें स्थान ओळख, जे जगायला लायक आहेत, त्यांना जगूं दे. जे धडपड करायला तयार आहेत, झगडे

करायला तयार आहेत, त्यांना धडपडूं दे, झगडूं दे. तूं एकच कर. तूं स्वतःचे विचार गोळा कर. स्वतःच्या विचारांची, भावनांची, कल्पनांची पुंजी जगासाठीं ठेवून जा. याच एका मार्गानें तुझा जगाला थोडा फार उपयोग होईल. तूं स्वतःला प्रभूच्या हातांत सोपव. त्यानें जो पेला भरून तुला दिला आहे तो ओंठाला लाव. त्यांतील सुधा वा त्यांतील विष जे कांहीं त्यांत असेल तें आनंदानें पी. हृदयांत त्या परमात्म्याची प्रतिष्ठापना कर. स्वतःचें सारें मन प्रभुमय कर. हृदयांत प्रभूला सांठवून शांत अंतःकरणांत त्या प्रभूसाठीं मंदीर उभार. सत्कर्मे करण्यासाठीं तत्पर ऐस. दुसऱ्यांना अधिक सुखी अधिक चांगले कर. वैयक्तिक महत्त्वाकांक्षा दूर ठेव. असें केल्यानें जीवनांत वा मरणांत तुला समाधान लाभेल. कांहींहि झालें तरी मग तुझी शांति टिकेल."

× × ×

७

ज्यांच्यावर आपण प्रेम करतों त्यांनींहि आपल्याविषयीं गैरसमज करून घ्यावा, याच्यासारखें जीवनांत दुसरें दुःख नाहीं. हें सर्वांत कटु असें दुःख; हें सर्वांना तीव्र असें शल्य. महात्म्यांच्या मुखांवर एक प्रकारचें खिन्न असें स्मित असतें. त्या स्मितांतलि खिन्नतेचें हेंच कारण होय. परंतु, ते दुसऱ्यांना बहुधा समजत नसतें. जे स्वतःला इतरांपेक्षां अधिक समजतात त्यांना प्रभु ही कठोर कसोटी लावीत असतो. या गोष्टीनें मनुष्याचे हृदय कितीदां पिळवटून निघालें असेल! आणि त्या जगत्पित्यालाहि जर दुःखसंवेदना असेल, तर त्याला हें वरील प्रकारचें दुःख आपण सदैव देत आलों आहोंत. हें जग जास्तींत जास्त जर कोणाविषयीं गैरसमज करून घेत असेल, तर त्या थोर प्रभुविषयींच. त्याचें स्वरूप कोणी समजून घेत नाहीं. आणि त्याचें तर या सर्वांवर प्रेम. अरेरे! केवढी दुःखाची गोष्ट!

जगाला कधींहि न कंटाळणें, कधींहि निष्ठुर न होणें, सहनशील नि सहानुभूतीनें असणें, मनानें मृदु असणें, एक दिवस कळी फुलेल, हृदयाचा विकास होईल अशी आशा करीत राहणें, प्रभूप्रमाणें आशा करित राहणें नि सर्वांवर प्रेम करणें हें आपलें कर्तव्य आहे.

× × ×

८

आजची हवा किती प्रसन्न नि गोड आहे ! मी सकाळीं किती तरी दूर फिरावयाला गेलों होतों. निरनिराळ्या रानफुलांजवळ एकदम जाऊन त्यांना मी चकित केलें. शेतांमधून कसला तरी परंतु आरोग्यदायी असा सुगंध येत होता. दूरचे पर्वत धुक्यांनीं तेजस्वी दिसत होते. चमकत होते, सालेव्ही पर्वतावर अत्यंत मृदु अशी कोंवळी रमणीयता दिसत होती. शेतांत दोन खेंचरें काम करीत होतीं. कुंपणांतील झाडांकडे एक अधाशीपणानें सारखें ओढ घेत होतें आणि जवळच तीन मुलें होतीं. त्यांच्याजवळ जाऊन त्यांना कुरवाळावें, त्यांच्याबरोबर खेळावें असें कितीतरी मनांत आलें.

आज जो हा आनंद मी लुटला तो अवर्णनीय आहे. अशा प्रकारें आपला फुरसतीचा वेळ उपभोगणें, हीं शांतप्रशांत शेतें, ही सुंदर हवा, हें समाधान, आणि माझ्या दोन बहिणीहि सध्यां माझ्याजवळ आहेत. आपले डोळे प्रसन्न अशा निसर्गाकडे लावणें, या फुललेल्या वनोपवनांना पाहून दृष्टि शांत करून घेणें, गवतांतून व वृक्षवेलींतून ऐकूं येणारें संगीत ऐकणें, आणि अशा रीतीनें अत्यंत शान्त असें सुख अनुभवणें. परंतु हें मागणेंहि फार नाहीं का ? मी अशा सुखाला पात्र आहे का ? प्रभूनें मला हें सुख दिलें, तर त्याचा तो उदारपणा अनाठायीं झाला असें मला वाटेल कां ? हें सुख मला देण्यांत ईश्वरानें पात्रापात्र विचार केला नाहीं असें म्हणण्याचा प्रसंग माझ्यावर न येवो. हें सुख कृतज्ञताबुद्धीनें मला मनमुराद सेवूं दे. पुढें मला सुखाची आशा नाहीं. म्हणून या सध्यांच्या

सुखाचा शक्य तो फायदा मला घेऊं दे. हे दयामय निसर्गा, ये; हंस व मला हंसव; मला मोहून टाक, मुग्ध कर! क्षणभर तरी माझ्यापासून माझी स्वतःचीं व इतरांचीं दु:खें लपव. प्रेमळा, वैभवसंपन्ना, तुझी राजशाही वस्त्रें मला बघूं दे; त्याच्या सुंदर चुण्या पाहूं दे. तुझ्या औदार्याखालीं, तुझ्या सौंदर्याखालीं सारीं दुःखें, सारी कुरूपता लपून जावोत.

× × ×

९

काल रविवार होता. बायबल वाचत होतों कांहीं उतारेहि लिहून काढले. भगवान् ख्रिस्ताबद्दल पूर्वीचा जो विचार होता. तो अधिकच दृढावत चालला आहे. ख्रिस्ताविषयीं दुसरा कोणी काय म्हणतो हें पाहण्यापेक्षां खुद्द ख्रिस्तावरच विश्वास ठेवणें चांगले. या धर्मस्थापकाचें यथार्थ जीवन शोधून पाहणें हें आपलें खरें कर्तव्य आहे. अनेकांच्या विचार भिंगांतून आपण येशूकडे बघतों आणि त्याचे नानाविध स्वरूप आपणांस दिसतें. आकाशांतून एखादा किरण यावा, नि हजारों इंद्रधनुष्यांत त्याचें परिवर्तन होऊन त्याचे हजारों तुकडे व्हावेत, त्याप्रमाणें मानव जीवनावर प्रकाश पाडणाऱ्या ख्रिस्ताच्या संदेशाचें झालें आहे. त्या संदेशाची सहस्रावधि स्थित्यन्तरें झालीं आहेत. सगळींच दिसायला सुंदर. प्रत्येक नवीन युगाबरोबर ख्रिस्ती धर्मासहि उदात्ततर असें स्वरूप मिळत गेलें पाहिजे ख्रिस्त नि त्याची शिकवण यांची दिव्यता अधिकाधिक दिसून येत गेली पाहिजे.

स्वतः ख्रिस्ताने स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे कीं, "हें शब्दज्ञान सर्वनाश करतें." वरच्या आकारांना, देखाव्यांना, सोंगाढोंगांना भुलूं नका, असें त्यानें सांगितलें. परंतु आज १९०० वर्षानंतरहि आमच्यांत मंत्रतंत्र, सोंगेढोंगें इतकीं असावींत याचें आश्चर्य वाटतें. असल्या निर्जीव धर्मावर ख्रिस्त कोरडे ओढीत असे. ख्रिस्तानें उपदेशिलेला धर्म अति उदात्त नि

गंभीर आहे. पुष्कळांना तो अधर्महि वाटतो. ख्रिस्ती धर्मांत ख्रिस्त ही मुख्य व्यक्ति होय. पुनरुद्धार, अमरजीवन, दिव्यता, मानव्य, भक्ति, अवतारकल्पना, प्रभूचा न्याय, सैतान, स्वर्ग, नरक, पाप, इत्यादि गोष्टींना आजकाल केवळ ऐहिक व किळसवाणें रूप आलें आहे. या सर्व गोष्टींतून अर्थांची गंभीरता आहे. परंतु त्यांचें स्पष्टीकरण केवळ सुखलालसेच्या दृष्टीनें करण्यांत येत असतें हें आश्चर्य आहे.

ख्रिस्ती धर्मांतील निर्भयता नि स्वतंत्रता हीं पुन्हां प्राप्त करून घेतलीं पाहिजेत. आपले हे चर्च, हेच खरोखर अधार्मिक आहेत. चर्चवाल्यांची दृष्टि दूषित आहे, त्यांचें हृदय भित्रं आहे. तुम्ही माना किंवा न माना, ईश्वरी तत्त्वाचा आपणांस साक्षात्कार होतोच हें उच्च असें पारमार्थिक तत्त्व आहे. ज्या प्रमाणांत मानवप्राणी ईश्वरामध्यें शिरेल, त्या प्रमाणांत ईश्वरहि त्याच्यांत प्रवेश करतो. किंवा एन्जेल्स म्हणाला होता, "मी ज्या दृष्टीनें देवाला बघतों, त्याच दृष्टीनें देवहि मला बघतो."

ईश्वर सर्वत्र आहे, विश्व व्यापून राहिला आहे, हें तत्त्वज्ञान, हा धर्म जर ख्रिस्ती धर्माला जिंकावयाचा असेल, तर ख्रिस्ती धर्मानें हा विचार आत्मसात् केला पाहिजे. "अणुरेणूंत ईश्वर आहे, माझ्यांतहि प्रभु आहे असें कसें म्हणावयाचें? हा प्रभूचा अपमान आहे, उपमर्द आहे. तो प्रभु संतापेल." असें भेकड ख्रिश्चनांना वाटतें. परंतु हे विचार सांगणारीं वाक्यें ख्रिस्ती धर्मांतहि दिसून येतात. ख्रिस्त म्हणाला होता, "तुम्ही देव आहांत." आणि सेंटपॉलही म्हणाला होता, "आपण ईश्वराचे अंश आहोंत, प्रभूच्या जातीचे आपण आहोंत."

आपल्या या शतकाला नवीन धर्मज्ञानाची जरूरी आहे. ख्रिस्ताच्या जीवनाचें, चरित्राचें अधिक मूलग्राही स्पष्टीकरण आज हवें आहे. स्वर्ग व मानव यांच्यावर ख्रिस्तानें जो प्रकाश पाडला तो नवीन तऱ्हेनें आपण पुन्हां मिळविला पाहिजे.

शौर्य म्हणजे शेवटीं काय? आत्म्यानें शरीरावर विजय मिळविणें हाच त्याचा अर्थ होय. शरीरावर विजय म्हणजे विजय. दारिद्र्य, दुःख, छळ, जाच, हाल, निंदा, रोग, मृत्यु, या सर्वांची भीती जिंकून घेणें

म्हणजेच शौर्य. या शौर्याशिवाय खरी धार्मिकता अंगी बाणत नाहीं. तेजस्वी असें दिव्य धैर्य म्हणजेच खरी शूरता.

कर्तव्य आपणांस या खऱ्याखुऱ्या जगाची त्याचप्रमाणें त्याच्यापासून पृथक् होण्याची जाणीव करून देत असतें.

× × ×

१०

जागा झाल्यावर मी विचार नि कृति यांचा संबंध काय, या गूढांत गढून गेलो होतों. विचार करतां करतां मी अशा एका सिद्धांतावर आलों कीं, जो अद्याप मलाच तितकासा स्पष्ट नाहीं. त्या सिद्धांतासभोंवतीं अजूनहि अंधार आहे. विचाराचें ओबड धोबड स्वरूप म्हणजे कृति. कृति म्हणजे साकार विचार. परंतु कृतीमुळें विचार साकार झाला, तरी तो अधिक दुर्बोध व अस्पष्ट होतो. कृतींत विचाराचें निर्मळ स्वरूप रहात नाहीं. खाणेंपिणें, बसणें, झोंपणें यांसारखीं अगदीं सामान्य कर्मेंसुद्धां पुष्कळशा विचारांची व सत्यांचींच पुंजीभूत रूपें असतात. ज्या मानानें एखादें कर्म साधें त्या मानानें त्या कर्मापाठीमागील कल्पना व विचार यांची संपत्ति भरपूर. आपल्या चारी बाजूंस एक प्रकारची गूढता आहे. आणि अत्यंत मोठी गूढता जर कोठें असेल, तर आपण दररोज ज्या शेंकडो गोष्टी बघतों, करतों, त्यांत आहे. जेथें जेथें सहजस्फूर्ति असते, तेथें तेथें समान अशी कर्मसृष्टीहि उत्पन्न होत असते. स्फूर्ति, प्रेरणा जेव्हां नकळत येते, आपणांस आलेली कळतहि नाहीं त्यावेळेस जें कर्म होतें, तें सामान्य समजावें. परंतु स्फूर्ति ही जेव्हां आपणांस अवगत असते त्यावेळेस जें कर्म होते, तें बुद्धिपूर्वक झालेले म्हणजेच नैतिक असतें. म्हणजे मुळांत पाहिलें तर हेगेलच्या म्हणण्याप्रमाणें हें आहे. जें बुद्धिपूर्वक असतें तें सत्य असतें व जें सत्य असतें तें बुद्धिपूर्वक असतें. परंतु हेगेलचा हा नियम मला पूर्णपणें कधींच स्पष्ट झाला नाहीं. प्रत्येक कर्म विचार-

मय आहे. परंतु तो विचार जागृत नसेल, व्यक्तीचा स्वतःचाहि नसेल. मनुष्याची बुद्धि म्हणजे शेवटीं अस्तित्वाची जाणीव असणें एवढाच अर्थ करायला हवा. प्रायेक गोष्ट प्रतीकाचें प्रतीक आहे. आणि प्रतीक कशाचें, तर मनाचें.

× × ×

११

नुकताच मी मॉंटस्क्यूच्या ग्रंथांतून पानें चाळीत बसलों होतो. या लेखकाच्या असामान्य व विलक्षण लेखनशैलीचा माझ्या मनावर काय परिणाम झाला आहे हें माझें मलाच अद्याप स्पष्ट नाहीं. याच्या लेखनशैलींत गांभीर्य नि कृत्रिमता, निष्काळजीपणा नि कांटेकोरपणा, ओज नि मार्दव यांचें संमिश्रण आहे. याच्या लेखनांत एक प्रकारचा कठोरपणा आहे. परंतु त्या कठोरपणाचें कारण समजत नाहीं. याच्या लेखनांत जिज्ञासुपणाहि आहे. परंतु बेफिकीरीहि आहे. लेखनशैली कधीं पीळदार, खळखळ वाहणारी, तर कधीं संथ, हळुवार अशी, कधीं विचार इतस्ततः अस्ताव्यस्त फेकलेले, तर कधीं सम्यक रीतीनें ते मांडलेले, असे भिन्नाभिन्न प्रकार या लिखाणांत आहेत. याचे ग्रंथ वाचूं लागलों म्हणजे एक गोष्ट मनांत येतें, ती ही कीं, हा ग्रंथकार मुळांत गंभीर व प्रखर असा आहे. त्यानें घातलेला विनोदी पोशाख हा लोकांसाठीं आहे. या लेखकाचा मनोरंजनाइतकाच शिकवणें हा उद्देश दिसतो. मॉंटस्क्यूच्या ठिकाणीं ज्ञानवत्तेबरोबर विदूषकीपणाहि आहे. त्याच्या शतकांतील कल्पनेप्रमाणें तत्त्वज्ञानांत व धर्मांत जितकी कांहीं प्रखरता लागत असे, तितकी त्याच्या लिहिण्यांत आहे. त्याच्या लिहिण्यांत कला असलीच तर ती शब्दरचनेची नसून अर्थांत आहे; कथनांत नसून कथनविषयांत आहे. शब्द कसे तरी स्वच्छंदेपणें येतात, परंतु विचार मात्र बुद्धिपूर्वक मांडलेले आहेत.

× × ×

१२

प्रत्येक कळी ही एकदांच फुलते. आणि प्रत्येक फुलाच्या सौंदर्याची परिसीमाही एका विवक्षित क्षणींच असते. त्या क्षणाला सारें सौंदर्य फुलून उभें असतें, आपल्या आत्म्याच्या उद्यानांतहि हाच प्रकार आहे. प्रत्येक भावनेच्या फुलण्याचा विवक्षित क्षण ठरलेला असतो. त्यावेळेस ती भावना सुंदर असतें, विकासते, एखाद्या राणीप्रमाणें विराजते; परंतु फक्त त्या क्षणींच. आपल्या डोक्यावरील प्रत्येक तारा त्याच्या कक्षेंतून एकदांच जातो, तेथें क्षणभर प्रकाशतो. त्याचप्रमाणें आपल्या हृदयाकाशांत तो तो विचार, ती ती भावना त्या एका विवक्षित क्षणाला परिपूर्णता गांठतात. त्या एका क्षणीं त्यांचें सारें तेज त्यांची शोभा प्रकट होतात. त्यावेळेस त्या विचाराची सारी दिव्यता, सारा मोठेपणा हीं प्रगट झालेली असतात. तुम्ही कोणीही असा; कवि, कलावान, विचारस्रष्टे, कोणीहि असा. स्वतःच्या मनांतील कल्पना नि विचार यांना जर तुम्हांस अमर करायचें असेल, तर त्या नेमक्या क्षणीं, क्षणांत नष्ट होणाऱ्या त्या विवक्षित क्षणीं, ज्या वेळेस तो विचार, ती भावना परमोच्च स्थितींत असतील त्याच वेळेस दृढतेनें त्या विचारास, भावनेस पकडा तो विचार, ती भावना त्या क्षणापूर्वी अन्धुक होती आणि त्या क्षणानंतरहि त्यांची अस्पष्ट अशी स्मृतीच राहील. एक प्रकारचें दुबळें दुःख मात्र मागून राहील, तो जो विवक्षित क्षण तो तुमच्या ध्येयाचा क्षण असतो.

× × ×

१३

मत्सर म्हणजे एक प्रकारचा क्रोधच होय. जो क्रोध बाहेर प्रगट व्हायला भितो, जो क्रोध दुर्बल व कर्मशून्य असतो, तो क्रोध म्हणजेच मत्सर.

× × ×

१४

गवांसारखें दुसरें काय ? दुसऱ्याचा पाणउतारा करणें ! आलेलीं संकटें दूर लोटणें म्हणजे तीं अधिक जड करणें होय.

× × ×

१५

आपल्या जीवनांत वाक्पांडित्यापेक्षां संवयींना अधिक महत्त्व आहे. ओंठावर बोधप्रद म्हणी खेळवणें याला महत्त्व नाहीं. तुम्ही कसें वागतां याला महत्त्व आहे. संवय म्हणजेच खरें जिवंत बोधवाक्य, शरीराशीं, मनाशीं एकरूप झालेलें बोधवाक्य म्हणजेच संवय. म्हणी, बोधवचनें, उतारे यांत सुधारणा करणें याला महत्त्व नाहीं. पुस्तकाचें नांव बदलण्याप्रमाणें तें सोपें आहे. नवीन संवयी लावून घेणें याला महत्त्व आहे. कारण त्यामुळें जीवनाचा खरा गाभा आपण मिळवतों. जीवन म्हणजे नानाविध संवयींचें विणलेलें वस्त्र होय !

× × ×

१६

जोबर्टचा स्फुटविचारात्मक ग्रंथ मी सारखा वाचीत होतो. पांच-सहा तास सारखें वाचन केलें. प्रथम प्रथम या पुस्तकानें मला चांगलेंच वेड लाविलें. वाचतांना आनंद होत होता. परंतु लवकरच हा पहिला पूर ओसरला; माझा उत्साह कमी झाला. प्रकाशकिरणांप्रमाणें, ठिणग्या-प्रमाणें एका पाठीमागून एक येणारे हे स्फुट व त्रोटक विचार माझ्या मेंदूला थकवीत नसले तरी माझ्या विवेचक शक्तीला कंटाळवतात. ही

गोष्ट खरी, जोबर्टच्या लिहिण्यांतील मुख्य गुण म्हणजे त्याची गोड भाषाशैली. त्याच्या टीकेंतही एक प्रकारचा जोर आहे, एक प्रकारचा नवीनपणा आहे. तो अतिसुंदर रूपकें वापरतो. परंतु नाना प्रश्नांची उत्तरें देऊन तें सोडविण्याऐवजीं जोबर्ट आणखी नवे प्रश्न उभे करतो. त्याच्या लिहिण्यांत जें तत्त्वज्ञान आहे. तें सर्वसामान्य जनतेसाठीं आहे. त्यांत खोली नाहीं, गांभीर्य नाहीं. त्याची प्रतिभा, त्याची शक्ति बारीक सारीक गोष्टीच नीट मांडण्यांत रमते. जोबर्टला थोर तत्त्वज्ञानी म्हणतां येणार नाहीं. तो एक विचारवंत लेखक आहे; वरच्या दर्जाचा टीकाकार आहे. त्याची जाणीवशक्ति, समजून घेण्याची शक्ति ही अपूर्व आहे. परंतु निरनिराळया गोष्टींची संगति दाखविणारी प्रज्ञा त्याच्याजवळ नाहीं. अमुक एक ध्येय असें त्याच्यासमोर नाहीं. त्याच्या लिहिण्यांत अखंड सूत्रता नाहीं. तत्त्वज्ञानी कलावान लेखक, असें त्याला म्हणतां येणार नाहीं. या पदवीवर तो थोडाफार हक्क सांगूं शकेल. परंतु संपूर्ण हक्कानें त्या पदावर तो बसूं शकणार नाहीं. त्याच्या विचारांत व्यापकता नाहीं. मोठी दृष्टि नाहीं. त्याचा लेखनपट लहानसा आहे. त्याची विचारसृष्टि छोटी आहे. तेथें तो सुंदरता दाखवील. सुंदर वाक्यें लिहील. मोत्यांप्रमाणें, हिऱ्याप्रमाणें शब्द वापरील. मधून मधून म्हणी योजील, अर्थबोधक वाक्यें घालील, सुभाषितें, सूत्रें, टीका, उपदेश हें सारे त्याच्या लेखनांत आहे. एखादा जवाहिऱ्या, सारें उत्कृष्टपणें मांडून ठेवतो तसें जोबर्टचें आहे. पन्नास वर्षें तो रोज आपली रोजनिशी लिहीत होता. त्या प्रचंड बाडांतून निवडून काढलेल्या उताऱ्यांचें हें प्रस्तुत पुस्तक आहे. येथें हिरे आहेत, माणकें आहेत, फुलपांखरें आहेत. कोंदणांत बसविलेलीं रत्नें आहेत. जोबर्टचें हें लिखाण ओजस्वी नसलें, शक्तिसंपन्न नसलें, तरी त्यांत सूक्ष्मतेच्या छटा आहेत, हें लिखाण सखोल नसलें, उदात्त नसलें, तरी काव्यमय आहे. वाचणाऱ्याच्या समोर छोट्या छोट्या अनंत चित्रा येथें मांडण्यांत आलेल्या आहेत. या वस्तू फारशा मोलाच्या असतात असें नाहीं. परंतु त्या पाहून मनाला आल्हाद वाटतो. अति मह-

त्याच्या वस्तु याच्या लिखाणांत नाहींत. थोर बुद्धीच्या निदर्शक अशा गोष्टी येथें दिसणार नाहींत. जोबर्ट नवीन विचार देत नाहीं, नवी दृष्टि देत नाहीं. त्याच्या ठिकाणीं स्वयंभू प्रज्ञा, अभिजात प्रतिभा नाहीं. पहिल्या प्रतीच्या तत्त्वज्ञान्यांत त्याला स्थान नाहीं; थोर कवींत त्याला घालतां येणार नाहीं. त्यांच्या रांगेंत त्याला बसवावयाचेंच म्हटलें तर फार खालीं कोठें तरी बसवावें लागेल. परंतु नैतिक विचार मांडणारा व टीकाकार या नात्यानें त्याचें स्थान वरचें आहे. स्वतःच्या ग्रंथांपेक्षां मोठे असणाऱ्यांपैकीं तो आहे. जोबर्टच्या ग्रंथापेक्षां जोबर्ट ही व्यक्ति फार मोठी आहे. त्याच्या ग्रंथांत एकसूत्रता नसली तरी त्याच्या जीवनांत ती होती. जोबर्टविषयींचें माझें हें पहिलें मत आहे. कदाचित् हें अविवेकीहि असेल. मागून कदाचित् या मतांत मला बदलहि करावा लागेल.

× × ×

१७

जोबर्टच्या स्फुट विचारांचे दोन खंड आणि त्याच्या पत्रव्यवहाराचा ग्रंथ, हीं पुस्तकें संपवलीं. पत्रव्यवहारानें मला जास्त वेड लावलें. त्या पत्रांतील सुभगता, लालित्य, मृदुता, सूक्ष्मता, रेखीवपणा, सारीं स्पृहणीय आहेत. अध्यात्मविद्या, तत्त्वज्ञान यावरील त्याचें लिहिणें मात्र खालच्या प्रतीचें झालें आहे. ज्या गोष्टींचा विशाल दृष्टीशीं संबंध आहे, ज्या गोष्टींच्या वस्तूंचा परिपूर्णतेशीं संबंध आहे, अशा गोष्टी येथें नाहींत. जोबर्टजवळ इतिहासाचें तत्त्वज्ञान नाहीं. वस्तूंच्या अंतरंगांत शिरणारी स्वयंभू प्रज्ञा नाहीं. सटरफटर गोष्टींचाच तो विचार करीत बसतो. त्यांतच रंगतो. मानसशास्त्र व इतर गोष्टी हेंच त्याचें खरें कार्यक्षेत्र, मनुष्याच्या मनाला आवडणाऱ्या अनेक गोष्टी लिहिण्यांत तो तरबेज आहे. कल्पना नि भावना यांची मृदुता, सूक्ष्मता त्याच्या ठिकाणीं अपूर्व आहे. आपलीं नाना प्रकारचीं पेयें, आपल्या आसक्ति, शेंकडों आवडीनिवडी, मनाचे अनंत छंद, सामाजिक नि शैक्ष-

णिक महत्त्वाच्या गोष्टी, इत्यादि विषयांवर लिहिण्यांत जोबर्टची बुद्धि प्रभावशाली आहे. तेथें त्याचें चातुर्य दिसून येतें. तो सुंदर टीका करतो. मधूनमधून विचारांची चमकहि दाखवितो. एका फुलावरून उडून दुसऱ्या फुलाकडे जाणाऱ्या फुलपांखरांप्रमाणें, भ्रमराप्रमाणें तो आहे. तो लुटतो, कुस्करतो, छाळतो, निरनिराळ्या तारा छेडतो. झाडांच्या पानांतून नाचत खिदळत येणाऱ्या किरणांप्रमाणें त्याच्या लेखणींतून विचार येत असतात. त्याचे विचार सुसंबद्ध नाहींत. आतां एक लिहील, लगेच दुसरें. जोबर्टच्या संपूर्ण लिखाणाकडे पाहिलें म्हणजे येथें कांहीं तरी अस्पष्ट, नीट हाताला न गवसणारें असें आहे, असें वाटतें. सारें चंचल आहे. जोबर्टमध्यें एक प्रकारचा बायकी-पणा आहे का? बायकीपणा नसला तरी मर्दानीपणा त्याच्यांत खास नाहीं. दृढतम असें, निश्चित असें, ओजस्वी, सामर्थ्यसंपन्न असें येथें कांहीं सांपडत नाहीं. ठसकेबाजपणा, ठसठशीतपणा येथें नाहीं, सारें लेचेंपेचें काम आहे. हाड नाहीं मांस नाहीं. भित्रेपणा, कल्पनासृष्टींत वावरणें हें त्याच्याजवळ आहे. प्रत्यक्ष सृष्टींत वावरायला तो जणूं भितो, आणि स्वप्नसृष्टींतच विहरतो. जिवंत मनुष्य असें म्हणण्याऐवजी त्याला केवळ वारा म्हणावें, श्वास म्हणावें. शरीररहित जीव आहे तो. मुलाच्या स्वभावांतील तो स्त्रीचें चंचल मन आहे. जोबर्टविषयीं आदर व कौतुक वाटत नाहीं; परंतु त्याच्याविषयीं एक प्रकारची कोमल कृतज्ञता मात्र वाटते.

× × ×

## १८

रुसोच्या एमिलियो पुस्तकाचा पहिला भाग वाचला. लेखनशैली बघावी, तींतील सौंदर्य अनुभवावें या अपेक्षेनें मी हें पुस्तक उघडलें परंतु माझी निराशा झाली. या पुस्तकावर मी रागावलों. सुंदर लेखनशैलीऐवजीं बोजड नि कृत्रिम अशी लेखनपद्धति प्रतीतीस येऊं

लागली. हातोड्याचे घाव प्रत्येक वाक्यावर घालीत जणूं तो लिहितो. सारें लिहिणें रागारागानें. सर्वत्र प्रक्षुब्धता, हटवादीपणा. येथें गांभिर्य, उदारता, थोर वृत्ति दिसत नाहीं. ग्रंथाच्या एकंदर गुणदोषांनीं माझ्यावर परिणाम झाला तो हा कीं, या लेखकाजवळ सुसंस्कारिता, नीट रीतभात नाहीं. येथें बुद्धीची चमक आहे. परंतु मधुरता, प्रमाणबद्धता, सुभगता, अपूर्वता असें येथें कांहीं एक नाहीं. हें पुस्तक वाचतांना मोठ्या पुरुषाच्या संगतींत आहों असें वाटत नाहीं. रूसोचे ग्रंथ वाचले म्हणजे वाचणाऱ्याच्या मनांत एक प्रकारचा तिटकारा उत्पन्न होतो असें कां म्हणतात, तें मला आज समजून आलें. सद्‌भिरुचीविषयीं तो अनादर उत्पन्न करतो. अशा लेखकाच्या लेखनशैलीचें अनुकरण करणें धोक्याचें आहे. तेथें विचाराला हि धोका आहे. कारण सत्यासत्याची येथें फारच मिसळ आहे. सत्याची येथें ओढाताण आहे. सत्य शोधणें त्यामुळें कठीण होतें. माझ्या म्हणण्याचा असा अर्थ केला जाऊं नये कीं रूसोची महत्ता मी ओळखत नाहीं. रूसोमध्यें जें सत्य आहे जें सामर्थ्यसंपन्न असें कांहीं आहे, तें माझ्या डोळ्यासमोर आहे. त्यासाठीं मी त्याचें अभिनंदनच करीन. परंतु त्याच्या लिहिण्यांत कांहीं तरी विकृत, कांहीं तरी असद्‌भिरुचीचें आहे. गुणांबरोबरच ह्याची ही दुसरी बाजू मला दिसून आली.

× × ×

१९

स्फुट विचार लिहिणाऱ्या जोबर्टविषयीं मी काय म्हणूं? केवळ वावदूक मनुष्य किंवा एखादा विदूषक ज्याप्रमाणें कलावान होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें जोबर्ट हा तत्त्वज्ञानी होऊं शकत नाहीं. तो विचाराजवळ खेळत बसतो. आणि ते विचार दुसऱ्या शेंकडों सटरफटर गोष्टींना जन्म देतात. जोबर्टला अंतिम सत्याविषयीं, शाश्वत सत्याविषयीं जिज्ञासा नाहीं. पराविद्येविषयीं त्याला आवड नाहीं. संसारांतील अनंत सत्यें त्याला आवड·

तात. अपरा विद्येंतच तो रमतो. विचाराला अत्यन्त आवश्यक अशी जी कार्यकारणपरंपरा, एकांतून दुसरें कसें काय निघतें हें पाहणें, ही बुद्धि, ही एकसूत्रता जोबर्टजवळ नाहीं. तो आपलें वाद्य बरें वाजवतो. परंतु त्या वाद्याचा तो स्वामी नाहीं. आणि तें वाद्य स्वतः निर्माण करणें हें तर त्याला केवळ अशक्य आहे. तो माळी आहे, बागवान आहे. तो भूगर्भशास्त्रवेत्ता नाहीं. फुलेंफळें उत्पन्न करण्यापुरतीच जमीन तो नांगरील, मशागतीस आणील. परंतु पृथ्वीचें यथार्थ स्वरूप समजून घेण्या-साठीं खोल खणीत तो जाणार नाहीं! थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे जें वरवरचें आहे, त्याच्याशीं तो खेळत बसेल. शब्दवेल्हाळ असा हा तत्त्वज्ञानी आहे, वक्तृत्वपूर्ण बोलणारा, लिहिणारा असा हा तत्त्वज्ञानी आहे. परंतु खरा तत्त्वज्ञानी मनांतील शास्त्रशुद्ध असे विचार मांडतो. मनांतील हजारों विचार गोड भाषेंत मांडणारे जोबर्टसारखे लेखक तत्त्व-ज्ञानाविषयीं गोडी उत्पन्न करतील, परंतु ते तत्त्वज्ञानी होऊं शकणार नाहींत. आपल्या मनांतील शेकडों विचार मांडणारे हे लेखक, त्यांच्यां-तहि एक प्रकारचें सौंदर्य असतें आणि याशिवाय या लेखकांचे दोन उपयोग असतात. एक म्हणजे वाचकांची फौजच्या फौज ते उभी करूं शकतात. बहुजन समाजाचे हे नाडीपरीक्षक असतात. विचारांची अदला-बदल करणारे, जें विचार जाणें हवें असेल तें आणून देणारे हे असतात. स्वतःच्या मनांतील शेकडों अनुभव, शेकडों विचार हे मांडीत असले तरीहि त्यांच्या प्रकृतींत थोडी गंभीरताहि असते. आणि म्हणून असे लेखक लोकप्रिय होतात. खरा तत्त्वज्ञानी हा आपल्या विशिष्ट शास्त्रांत पारंगत असतो. त्याच्या शास्त्राचें बाह्य स्वरूप तरी असें असतें कीं तो लोकप्रिय होऊं शकत नाहीं. फ्रान्समध्यें डेकार्ट हा एक तत्त्वज्ञानी झाला; परंतु त्याच्या विचारांना लोकप्रिय करणारे स्फुटविचार लेखक तीस झाले! परंतु जर्मनींत स्फुट विचार-लेखक दहा झाले तर त्यांच्यासाठीं वीस तत्त्वज्ञानी झाले!

× × ×

२०

किती तरी मोठमोठी माणसें माझ्या आठवणींत देवाघरीं निघून गेलीं. मला ही सारीं माहित होती. थोर कलावान, संगीतज्ञ, इतिहास-लेखक, ज्ञानी अशी ही मंडळी होती. जुनी पिढी जात चालली. नवी पिढी काय देणार, कोणतें ज्ञानामृत वाढणार ? नवीन अशी कोणती मोलाची भर आम्ही घालूं ? कांहीं थोडीं थोर माणसें देवाच्या दयेनें अजून हयात आहेत. वैभवशाली भूतकाळाशीं नवीन पिढीचा दुवा जोडणारी हीं माणसें अद्याप आमच्यांत आहेत. परंतु या येणाऱ्या भविष्यकाळाचीं जबाबदारी आपल्या शिरावर घेण्यास कोण तयार आहे ? आमच्या आजूबाजूस असलेले मोठमोठे रथी महारथी पडत चालले. आमच्या रांगा रोडावत चालल्या. पडलेल्यांची जागा कोण घेणार ? कोण घेणार शिरावर बोजा ?

असा विचार मनांत आला म्हणजे कांपरें भरतें. सभोंवतालची मंडळी जात चालली म्हणजे आपणांसहि जावें लागणार हा विचार मनांत येतो. आणि कर्मदेवता विचारते, "तुझ्यामध्यें काय आहे तें दाखव. हा क्षण आहे, ही वेळ आहे. हिशोब दे. झाडा दे. नाहीं तर शून्यांत विलीन हो. आतां तुझी पाळी आली आहे. जगाला तूं आपलें माप भरून दे. जें सांगावयाचें असेल तें सांग. बोलायचें असेल तें बोल. तुझी उपयुक्तता किंवा व्यर्थता दाखव. चल, कोंपऱ्यांतून पुढें ये. काळोखांत काय बसलास? आतां फुकटची अभिवचनें नकोत. वायदे पुरे झाले. आतां प्रत्यक्ष कांहीं तरी करून दाखविलें पाहिजे. उमेदवारीचा काळ कधींच संपला. प्रभूच्या सेवका. तूं आपल्या बुद्धीनें काय केलेंस तें दाखव. बोल, सांग. नाहीं तर कायमचा शांत होऊन जा, मुका होऊन रहा." प्रत्येकाच्या हृदयांत अशा प्रकारें सद्सद्विवेकबुद्धि बोलूं लागते. ती हजेरी घेऊं लागते. ज्याप्रमाणें त्या शेवटच्या दिवशी प्रभूच्या न्यायासनासमोर उभे राहण्याची घंटा वाजेल, त्याप्रमाणें सद्सद्विवेक बुद्धीची ही घंटा आंत वाजूं लागते. ही सद्सद्विवेक बुद्धि विचारते, " बोल, तयार आहेस कीं नाहीं ? तुझ्या आयुष्याचा,

बुद्धिचा, फुरसतीच्या वेळेचा, तुझ्या सर्व शक्तीचा, तुझ्या आभ्यासाचा, तुझ्या कामाचा हिशोब दे. आतां या क्षणीं थोरांच्या हृदयांचा, त्यांच्या शौर्यधैर्यांचा, उदात्ततेचा, बुद्धिमत्तेचा उपयोग होण्याची वेळ आहे. "

× × ×

२१

माझ्याइतका तिरस्कारणीय असा प्राणी कधीं झाला असेल का ? मी जर लग्न केलें असतें, संसारांत पडलो असतों, तर मुलांबाळांमुळें मी स्वतःला किती संत्रस्त करून घेतलें असतें! नसत्या चिंताच मनांत उगाळीत बसलों असतों. पति या नात्यानें हजारों दुःखे मनांत आणून कष्टी झालों असतों. कारण माझें सुख शेंकडों गोष्टीवर अवलंबून आहे. माझें हृदय अति हळुवार आहे. जरा धक्का लागतांच तें रडूं लागतें. तसेंच माझी कल्पनाशक्ति कधीं स्वस्थ नसते. ती सदैव चंचल व अस्थिर असते. विसावा तिला माहीतच नाहीं. निराशा तर माझी कायमचीच मैत्रीण झाली आहे. वाटेल तेव्हां ती माझ्याकडे येते व माझा ताबा घेते. प्रत्येक संवेदनेचा माझ्यावर परिणाम होतो. जरा कांहीं झालें तरी मी उसळतो, उचंबळतों. जें होणारें आहे त्याच्या विचारानें, भविष्याच्या चिंतेनें मी या क्षणीं जें जवळ असतें तेंहि गमावून बसतों. मी असें असें असावयास पाहिजे होतें ह्या विचारानें मी पदोपदीं दुःखदग्ध होतों. माझ्या या स्वभावामुळें ही प्रत्यक्ष वस्तुस्थिति, हा वर्तमानकाळ, ही जाणारी घटका, पुन्हां कधीं न येणारा असा हा सद्यःकाळ हा मला दूर लोटतो. मी त्याला भितों. प्रत्यक्षाची मला भीति वाटते. माझ्यामध्यें कल्पनाशक्ति अमर्याद आहे. सद्सद्विवेकबुद्धि, सूक्ष्म भेदकबुद्धि यांचेंहि आधिक्य आहे. परंतु प्रत्यक्ष चारित्र्य, प्रत्यक्ष कर्म माझ्याजवळ फार कमी. मी वैचारिक जीवनांतच रंगतों. कारण तें अनंत आहे. वाटेल तसें बदलतां येतें. वैचारिक जीवनाचा आधार घेऊन पुन्हां कधीं परत न येणाऱ्या

अशा काळाच्या तडाक्यांतून मी सुटतों. व्यावहारिक प्रत्यक्ष जीवन हें मला कंटाळवाणें, जिकरीचें व त्रासदायक वाटतें.

असें असलें तरीहि हें प्रत्यक्ष जीवन, हा संसार, हीं माझ्या मनाला कधीं कधीं मोह पाडतात. कधीं कधीं त्यांचें मला आकर्षण वाटतें. मला त्यांची जरूर भासते. सर्व प्रकारच्या सात्विक आनंदानें संपन्न असें कौटुंबिक जीवन, त्या जीवनांतलि खोल अंतरिक नीति, यांकडे माझें मन ओढ घेतें. असा संसार करणें, असें आदर्श कौटुंबिक जीवन अनुभवणें म्हणजे आपलें कर्तव्य आहे असें मला वाटतें. आदर्शभूत गृहस्थाश्रमाचें चित्र डोळ्यासमोर येऊन मला कधीं कधीं अपार आनंद होतो. त्या सुखस्वप्नांत मी तरंगत राहतों. माझ्या जीवनांतील सहचरी, माझ्या उद्योगांतील माझी सखी, माझ्या सुखदुःखातील माझ्या आशानिराशांतील, माझ्या विचारांतील माझी वांटेकरणि, हृदयांत एक प्रकारचा भाक्तिभाव नि आदर असणारी, मनानें पूजा करणारी, बाहेर सर्वांशीं दयाळु व परोपकारबुद्धीनें वागणारी अशी पत्नी, आणि मुलांमुलींना शिकविणें, एका गोष्टीच्या अनुषंगानें येणारीं हीं शेकडों कर्तव्यें, या सर्व मधुर कल्पना मला कधीं कधीं वेडा बनवितात. परंतु या सर्व कल्पना शेवटीं मी दूर फेंकतों. कारण आशेच्या अंड्यांतून कोमल कबुतरें बाहेर पडणार कीं साप बाहेर पडणार, तें कोणास माहीत ? एकेक आनंद गमावून बसणें म्हणजे सुरीचा घाव आहे. कारण, कर्माच्या बीजांतून शेवटीं दुःखाचींच कणसें बाहेर यावयाचीं !

एकंदरींत माझा स्वतःवर विश्वास नाहीं आणि म्हणून आपण सुखी होऊं या गोष्टीवरहि माझा विश्वास नाहीं. माझा स्वभाव मी जाणतों. माझ्या डोळ्यांसमोर सदैव आदर्शभूत सृष्टि असते, ध्येयभूत गोष्टी असतात, पूर्णता असते. अपूर्णात मला आनंद नाहीं. ज्या ज्या गोष्टीमुळें उद्यांच्या भविष्यकाळाबरोबर मला तडजोड करणें भाग पडेल त्या त्या गोष्टी मी दूर ठेवीन. कारण त्या गोष्टीं माझें आंतरिक स्वातंत्र्य हिरावून घेतील. मी जें असलें पाहिजे, मी जें कांहीं होऊं शकेन, असूं शकेन त्यापेक्षां ज्या गोष्टी मला वेगळें करूं पाहतील, निराळें स्वरूप देऊं

पाहतील, मला गुलाम होण्यास ज्या भाग पाडतील, मनुष्यत्वाची माझी जी कल्पना आहे, त्या कल्पनेस ज्या गोष्टीमुळें कमीपणा येईल, त्या सर्व गोष्टी मला मरणांतिक वेदना करतात. त्या गोष्टी माझ्या हृदयांस खाली ओढतात, छळतात. त्या गोष्टी प्रत्यक्ष जीवनांत समोर येण्याआधींच त्यांच्या केवळ कल्पनेनेंच मी मरून जातों. मागून उगीच दुःख करीत बसणें, पश्चात्ताप करीत बसणें, याचा मला तिटकारा आहे. मनुष्याच्या कृत्यांवर, उद्योगांवर नशिबाचा अजब तडाखा ठेवलेलाच आहे. नाटकांत ज्याप्रमाणें अकस्मात् कांहीं तरी घडामोड होते आणि सारें बदलतें, तसेंच आपल्या जीवनांतहि आहे. आणि सर्वांत दुःखदायी गोष्ट ती हीच. प्रत्यक्ष परिस्थितीपेक्षांहि आकस्मिकतेमुळें मी थबकतों, गतिहीन होतों. आणि कर्तव्यानें प्रेरणा मिळण्याऐवजीं या नशिबाच्या विचाराकडेच मी अधिक ओढला जातों. जें व्हायचें असेल तें होवो. मी जें कांहीं थोडे फार करतों सवरतों तेंहि मोठ्या कष्टानें व बळजबरीनें; उपायच नाहीं म्हणून धडपडतों झालें.

परावलंबी होणें, परवश असणें! अरे बापरे! ही कल्पनाच मला असह्य होते. परिस्थितीचें बाह्य गोष्टींचें गुलाम होणें! आणि त्यांतल्या त्यांत जें पुन्हां न येणारें, अनिश्चित, लहरी, अदृश्य असें आहे, त्याच्यावर स्वतःच्याच चुकीनें नि दोषानें अवलंबून राहणें, त्याच्या ताब्यांत जाणें, आणि आपलें स्वातंत्र्य, आशा गमावून बसणें, आपली निद्रा, सुख सारें गमावून बसणें, छे! हा तर केवळ नरक होय. जें आवश्यकच आहे, जें प्रभूच्या इच्छेनेंच घडून येतें, जें अपरिहार्य आहे व ज्याच्याविषयीं आपणांस कांहीं समजत नाहीं, तें मी सारें सहन करीन परंतु आपण होऊन जाणून बुजून एखादी जबाबदारी अंगावर घेणें म्हणजे दुःख आलेंच. कोणतेंहि कार्य करणें हें व्यक्तीच्या इच्छेवर अवलंबून असल्यामुळें मी शक्य तितकें कमी कार्य करूं पाहतों.

× × ×

## २२

माझी संकल्पशक्ति मोठी बंडखोर आहे, फसवी आहे. तिनें पुन्हां बंड केलें बघा. विश्रांति, समाधान, स्वतंत्रता यांची तिला तहान लागली आहे. अशा प्रकारच्या निःस्वार्थीपणांतहि एक प्रकारचा स्वार्थ नसतो का ? मला विश्रांतीची एवढी तहान कां बरें लागावी ? जगाचें एवढें भय काय म्हणून ? कां मनांत या शंका आशंका ?

या जगांतील आपलें कर्तव्य आपण पार पाडावें असें मनांत तर मला वाटतें. परंतु माझें कर्तव्य कोणतें ? कोठें आहे तें ? हा प्रश्न सोडण्यासाठीं आपली वृत्तीच पुन्हां आपल्या मदतीस येतें. आपला स्वभावच शेवटीं आपला स्वधर्म ठरविणार. परंतु शेवटीं असा प्रश्न उभा राहतो कीं आपल्या स्वभावाप्रमाणें वागणें हें तरी कर्तव्य आहे का ? आपला स्वभाव, मग तो कसा का असेना, किती उच्च नि दैवी वृत्तीचा असेना, त्याच्याप्रमाणें वागणें हें कर्तव्य, कीं त्या स्वभावालाहि जिंकून घेणें हें कर्तव्य ?

जीवन म्हणजे मनोबुद्धिचें नीट संवर्धन, तिच्यावर योग्य ते संस्कार करून तिला कार्यक्षम बनविणें, हा अर्थ, कीं आपल्या इच्छा शक्तीला, कर्मशक्तीला नीट वळण देणें हा अर्थ ? आणि आपली जी इच्छाशक्ति तिचा जोर तरी कशांत आहे ? सामर्थ्यानें पुढें घुसून वैभवसंपन्न होणें यांत इच्छाशक्तीची पूर्तता आहे कीं या जगापासून विरक्त होण्यांत तिचें सारसंर्वस्व आहे ? जीवनाचा हेतु जर निवृत्ति हा असेल, तर सर्व रोग, संकटें, सारे त्रिविध ताप, विरोध यांचें आपण स्वागत केलें पाहिजे. जीवनाचा हेतु जर परिपूर्ण मानव होणें हा असेल तर आपलें मन व आपलें शरीर यांच्यांत एकसूत्रीपणा असायला हवा. तसा प्रयत्न आपण केला पाहिजे. संकटें मुद्दाम ओढून घेणें, त्यांना जाणूनबुजून आमंत्रण देणें म्हणजे देवाची कसोटी बघणें होय. माझ्यासमोर प्रेमस्वरूप परमेश्वर उभा असतो. प्रभूवर श्रद्धा ठेऊन वागण्याऐवजीं तो काय शासन करील या विचारानें मी थरथरत असतों.

हृदयांतील आवाज जोपर्यंत निश्चित नाहीं, स्पष्ट नाहीं तोपर्यंत तो आवाज खऱ्या सद्सद्विवेकबुद्धीचा नाहीं असें समज. संदिग्ध आवाज हृदयस्थ प्रभूचा कसा असूं शकेल ? तूं आणखी खोल जा; निश्चित असा आवाज ऐकूं येईपर्यंत अंतरंगांत खोल खोल जा. सद्सद्विवेक बुद्धीचा खरा स्वर निःसंदिग्ध असतो. तो आवाज आपलें मन वळवितो, आपणांस प्रकाश देतो, आपणांस गंभीर करतो. ज्यांच्या मनांत शान्ति आहे, ज्याची सद्सद्विवेकबुद्धि नि मन यांच्यात तेढ नाहीं, ते धन्य होत. केलेल्या कर्माबद्दल ज्यांच्या मनांत रुखरुख नाहीं, ज्यांचें हृदय, ज्यांचें मन केलेल्या कर्मांना नांवें ठेवित नाहीं, ते धन्य होत. ते खरे सुखी होत. ज्या मानानें मन अधिक चिकित्सक, विवेचक, पृथकरण करणारें, भविष्यकाळाचा फार विचार करणारें, त्या मानानें मनांतील आंतरिक ऐक्य, मनांतील निःशंकता हीं प्राप्त होणें कठीण.

अरेरे, जीं शिखरें आपण एकदां गांठलीं होतीं, ज्यांच्यावर आपण उभे होतों, त्याच शिखरांवर पुन्हां पुन्हां चढावें लागणें हें किती वाईट ! हजारों वेळां पुन्हां तेथें चढून जावें लागतें. जे किल्ले, ज्या टेंकड्या आपण एकदां सर केल्या होत्या, त्यांना जिंकून घेण्यासाठीं पुनःपुन्हां लढाई करावी लागते. आतां कायमची शान्ति येईल या ढोंगानें राजे लोक ज्याप्रमाणें तात्पुरते तह करतात, तसेंच या मानवी मनाचें आहे. खरें शाश्वत जीवन प्राप्त करून घेणें म्हणजे शाश्वत लढाई करणें. अरेरे ! अहो ही शान्ति म्हणजे शेवटीं काय ? शान्ति म्हणजे सदैव झगडा. अखंड धडपड, निरनिराळ्या चळवळी म्हणजे शांति ! धडपड, सदैव उद्योग हा ऐहिक जीवनाचा नियम आहे. प्रयत्न करण्यांतच शांति आढळून येते. जळत राहण्यांतच ज्वालेचें जीवन आहे, तिचें अस्तित्व आहे, त्याप्रमाणें लढण्यांतच, धडपड करण्यांतच शान्तीचें स्थान आहे. सुखाची निशाणी नि दुःखाची निशाणी एकच आहे. एकूण चिन्ता, निराशा, आशा, स्वर्ग, नरक सर्वत्र तीच अस्वस्थता आहे. देवांच्या वा दानवांच्या स्थंडिलावर तोच अग्नि जळत आहे. एकूण असें आहे तर जीवन !

हें जीवन दुधारी आहे. दुतोंडी आहे. जो अग्नि प्रकाश देतो, तोच भाजतो, जाळतो ! जो दैवी अंश तो आसुरी होण्याचाहि संभव !

× × ×

२३

रूग या ग्रंथकाराचा 'डाय् अकॅडमी' हा खंड वाचीत होतों. हेगेलनंतर राजकारण, धर्म, वाङ्मय यांमध्यें एक नवीन बुद्धिवाद, स्वतंत्रता वाद निर्माण झाला आहे. याला नवमानवतावाद असेंहि म्हणतां येईल. या ग्रंथांत पत्रव्यवहाररूपानें तर कधीं निबंधरूपानें हा विषय मांडण्यांत आलेला आहे. गेल्या शतकांत बुद्धीच्या शस्त्रानें सर्व गोष्टींचें पृथक्करण करणारे जे जे तत्त्वज्ञानी झाले ते सारे माझ्या डोळ्यांसमोर या पुस्तकामुळें आले. या तत्त्वज्ञान्यांना सर्जनात्मक असें–विधायक असें कांहीं करतां आलें नाहीं. पृथक्करण करीत, अवयवच्छेदन करीत सारें त्यांनीं नाहींसें केलें. जेथें कांहीं नवनिर्मिति करायची असते, तेथें हृदयाची, भावनांची, स्फूर्तींची, सहज-प्रेरणेची आवश्यकता असते. तत्त्वसंशोधक दृष्टीलाच कार्यकर शक्ति मानणें चूक आहे. हे सारे तत्त्वज्ञानी बुद्धीच्या स्वातंत्र्यालाच हृदयाचें स्वातंत्र्य समजतात. म्हणजे अंशालाच संपूर्णता, अपूर्णालाच पूर्णता मानतात. नीति-वाद व बुद्धिवाद यांमध्यें जो जमीनअस्मानाचा फरक आहे तो या ग्रंथानें मला स्पष्ट करून दाखविला. या पुस्तकाचा लेखक धर्माऐवजीं तत्त्वज्ञान उभारू पहात आहे; धर्माची जागा तत्त्वज्ञानाला देऊं पहात आहे. याच्या धर्मांतील मुख्य वस्तु म्हणजे मनुष्य; आणि मनुष्यामधलि परमोच्च वस्तू म्हणजे बुद्धि. एवं या लेखकाचा धर्म बुद्धिप्रधान आहे. बुद्धि म्हणजे याचा देव. आपल्या समोर अशा वेळेस दोन भिन्न अशीं विचारक्षेत्रें उभी राह-तात. खिश्चन धर्म मनुष्याच्या इच्छेला वळण लावून त्याला मोक्ष देऊं पाहतो; तर बुद्धिवाद मनुष्याच्या मनाला मुक्त करून त्याला मोक्ष देऊं पाहतो. एक बुद्धीवर हल्ला करतो; दुसरा हृदयावर करतो; दोघांचेंहि इच्छित

एकच आहे कीं मनुष्याला त्याच्या ध्येयाकडे घेऊन जाणें. परंतु, ध्येयांतील प्राप्य जरी एक असलें तरी ज्या मनोवृत्तीनें त्या ध्येयाकडे जायचें, तींत फरक आहे. मनांतील कोणत्या वृत्तीला महत्त्व द्यावयाचें या बाबतींत भेद असल्यामुळें दृष्टिभेद येतो. एकाला मन हें आत्म्याचें एक इंद्रिय असें वाटतें तर दुसऱ्याला आत्मा महत्त्वाचा नसून मन हेंच सर्वस्व वाटतें. व्यक्तीचें वर्तन सुधारून तिला सुसंस्कृत करणें हें एकाचें ध्येय तर तिला सुसंस्कृत करून तिचें वर्तन सुधारणें हें दुसऱ्याचें ध्येय. सॉक्रेटीस व येशुख्रिस्त यांच्यांत जो फरक आहे तोच याहि दोन विचार सरणींत आहे.

मुख्य प्रश्न आहे पापाचा. ईश्वरच सर्वत्र ओतप्रोत भरलेला आहे कीं द्वैत आहे हा प्रश्न तादृश महत्वाचा नाहीं. मरणोत्तर जीवन, स्वर्ग, नरक हीं जीं तीन तत्वें, यांत जो पुष्कळ बाष्कळपणा शिरलेला आहे तो निघून जाईल. स्वर्ग व नरक खरोखरच आहेत ही भावनाहि कदाचित् नाहींशी होईल. हटवाद, अंधपणा दूर होईल. परंतु हे शब्द गेले, तरी त्यांतील गर्भितार्थ राहील. मानव प्रश्न शिल्लक उरतोच. मानवाला तारणारें असें तारक तत्त्व कोणतें? मनुष्याला यथार्थपणें मनुष्यत्व कसें प्राप्त करून घेतां येईल ? त्याच्या जीवनाचें अंतिम मूळ जबाबदारी हें आहे का ? होय कीं नाहीं ? मनुष्याचें अंतिम ध्येय काय? सत्चें स्वरूप समजून घेणें कीं जें जें सत् आहे तदनुरूप वागणें? विचार कीं कृति? जर शास्त्रानें प्रेमवृत्ति निर्माण होत नसेल, तिचें पोषण होत नसेल तर शास्त्र अपुरें आहे. शास्त्रीय दृष्टीनें, केवळ बुद्धिवादानें आपण विचारांत रमायला शिकतों. तेथें प्रकाश मिळतो, परंतु ऊब मिळत नाहीं. एक प्रकारची केवळ वैचारिक विरक्ति प्राप्त होते. दिसायला मोठी परंतु खोटी. ही विरक्ति आपण दुसऱ्यामध्यें उत्पन्न करूं शकत नाहीं. ती ज्याची त्यालाच. हीं वैचारिक विरक्ति फारच थोड्यांच्या नशिबीं असतें. परंतु नीतिप्रधान प्रीतीची गोष्ट निराळी, नीतिमय प्रेम व्यक्तीचा मध्यबिंदु त्यांच्या जीवनांत आणून ठेवित असतें. या प्रेमाचें ध्येयहि मुक्ति हेंच असतें. या प्रेमांत शाश्वत जीवनाचें बीज असतें. प्रेम करणें म्हणजेच खरोखर जाणणें. परंतु जाणणें

म्हणजे कांहीं प्रेम करणें नव्हे. मनुष्यामधील हे दोन मार्ग आहेत. ज्ञाना-जवळ प्रेम असेलच असें नाहीं, परंतु प्रेमाजवळ मात्र ज्ञान असतें. विचारानें मिळालेला मोक्ष, बौद्धिक प्रेमानें मिळालेला मोक्ष हा नैतिक व हार्दिक प्रेमानें मिळणाऱ्या मोक्षापेक्षां अपूर्ण आहे; त्यांत कांहीं तरी कमीपणा आहे. वैचारिक मार्गानें मनुष्य आपल्या अहंकारापासून मुक्त होतो. परंतु दुसऱ्या मार्गानें मनुष्य निरहंकार होतो एवढेंच नव्हे, तर तो प्रत्यक्ष सेवामय कार्यांत रमतो; त्याचें मन निष्क्रिय न राहतां कर्ममय होऊन प्रत्यक्ष फळ मिळवतें. एक मार्ग पृथक्करणात्मक, टीकात्मक आहे; त्यानेंहि विशुद्धि होते. परंतु अभावरूप तो मार्ग आहे. दुसरा मार्ग अधिक उत्साहप्रद आहे, भावरूप आहे, अधिक विधायक स्वरूपाचा, फलदायी असा आहे शास्त्र कितीहि दैवी आणि सार-मय असलें तरी प्रेमाच्या मानानें तें औपचारिकच राहतें नैतिक सामर्थ्य हा खरा प्रश्न आहे.

नैतिक शक्ति नैतिक शक्तीनेंच निर्माण करतां येते, मुद्दे मांडून बुद्धिवाद करून दुसऱ्याला पटवित बसूं नको. प्रत्यक्ष कृतीनेंच शिकव; भावनांनीं भावनांना शिकव; हृदयानें हृदयाला शिकव; प्रेम जागृत करण्यासाठीं प्रेमाशिवाय अन्य साधनांचा उपयोग नको करूं. दुसऱ्यांनीं ज्या प्रकारचें व्हावें असें तुला वाटतें, त्याप्रकारचा तूं स्वतः हो. तुझ्या शब्दांनीं लोकांना शिकवण्यापेक्षां तुझें चारित्र्यच लोकांना शिकवूं दे.

पुन्हां मूळच्या विषयाकडे वळावयाचें; म्हणजे एकंदरींत काय कीं धर्माची जागा तत्त्वज्ञान भरून काढूं शकणार नाहीं. क्रान्तिकारक हे धर्मस्थापनेचे नर नसतात; परंतु धर्मस्थापक मात्र क्रांतिकारक असतात. बाहेरच्या गोष्टी सांभाळण्यानें आंतील गोष्टी सांभाळूं पाहाणें हा मार्ग चुकीचा नि धोक्याचा आहे. मी बाहेरच्या गोष्टी असें म्हणतों, त्यावेळेस बुद्धीलाही मी इच्छाशक्तीच्या बाहेरचीच मानतों. बुद्धीवादी लोकांचे विध्वंसात्मक, अभावात्मक कार्यहि उपयुक्त नि चांगलें आहे. त्यामुळें ख्रिस्ती धर्मावर जीं पुटें चढलीं आहेत, जीं कवचें जमलीं आहेत तीं गळून पडतील यांत शंका नाहीं. परंतु रूग किंवा फाअरबेक यांच्यासारखे विचारवंत लोक मानव जातीला वाचवूं शकणार नाहींत. या बुद्धिवादी, तत्वज्ञानी लोकांचें कार्य पुरें करण्यासाठीं

संतांची, वीरपुरुषांची, महात्म्यांची जरूरी आहे. शास्त्र, बुद्धिवाद ही मानवाची उसनी शक्ति आहे तर प्रेम ही त्याची स्वाभाविक शक्ति आहे. मनुष्य बुद्धीनें मनुष्य होतो परंतु प्रेमामुळें तो मनुष्य आहे. ज्ञान. प्रेम नि सामर्थ्य या तिहीं मिळून जीवनाला परिपूर्णता येते.

× × ×

२४

सायंकाळीं मैदानावर मी फेऱ्या घालीत होतों. आकाश निरभ्र होतें. आज चंद्र नव्हता. जिकडे तिकडे पाणी शिंपल्यामुळें एक प्रकारचा ताजेपणा, टवटवितपणा वाटत होता. उंच अशा त्या तीन कंदिलांचा प्रकाश पडला होता. आकाशांत तारें चमचम करित होतें. तरुणांचे थवे मी बघत होतों. माझ्यासमोर किती तरी कुटुंबे, किती तरी जोडपीं, मुलेंबाळें जात होतीं; येत होतीं. गाणीं गात, गप्पा मारीत आपल्या स्वतःच्या किंवा भाड्याच्या घरीं, आपल्या दिवाणखान्यांत, आपल्या खोलींत परत जाण्यासाठीं तीं निघालीं होतीं. मला त्या सर्वांसाठीं सहानुभुति वाटत होती. माझे कान कवीचे झालें होतें. माझे डोळे चित्रकाराचे झालें होते. दुसरे आनंदात आहेत व आपणहि आनंदी आहोंत या विचारानें एक प्रकारची कृतार्थता वाटते. हे सारे सुखी असतील, सुखी आहेत, नाहीं का? ही साधी जिज्ञासाहि मनाला आल्हाद देते.

× × ×

२५

सदैव सज्ज असणें, सज्ज असण्याची जाणीव असणें, कसें सज्ज राहिलें पाहिजे याचें ज्ञान असणें, ही महत्वाची गोष्ट आहे. हें ज्याला साधलें त्याला बहुमोल ठेवा मिळाला, त्याला लाखाची देणगी लाभली. आपण सज्ज

असणें, तयार असणें म्हणजे काय ? म्हणजे साधक बाधक गोष्टींचा विचार केलेला असणें, महत्त्वाच्या गोष्टी ध्यानांत धरणें, निश्चय केलेला असणें. एका पायावर तयार राहण्यासाठीं मनुष्यानें तोडायलाहि तयार असलें पाहिजे. कारण नेहमींच गांठ नीट सोडवतां येईल असें नाहीं. गांठ कापून टाकण्याचीहि सिध्दता हवी. तसेंच बारीक सारीक हजारों गोष्टींतून, सटरफटर फोलपटांतून सारभूत गोष्टी निवडून काढण्याचीहि बुद्धि हवी. सार हें पुष्कळदां संसारांतच गुरफटलेलें असतें. या संसारांत सगळ्या गोष्टी सारख्याच महत्त्वाच्या नसतात. या जगांत तरतमभाव आहे. थोडक्यांत सांगायचें म्हणजे झटपट काम कसें करावें, आपली कर्तव्यें गुंतागुंत न करतां नीट समजून कशीं घ्यावीत हें सांधलें पाहिजे. एखाद्या धंदेवाइकाप्रमाणें पटापट सारें उरकतां आलें पाहिजे. सज्ज राहायला शिकणें म्हणजेच जीवनाला आरंभ करणें होय.

जीं खरोखर आपली कर्तव्यें नाहींत अशीं हजारों कर्तव्यें आपल्या डोक्यावर आपण घेत असतों. जे खरोखर अडथळे नाहींत असे शेकडों अडथळे आपण आपल्या मार्गांत उगीच उभे करीत असतों. कोळ्याच्या-जाळ्याप्रमाणें या हजारों क्षुद्र गोष्टी आपणांस जखडून टाकित असतात. आपले पंख आपणच बांधून घेतों. आपल्या जीवनांत व्यवस्था नसते म्हणून तर आपण गुलाम बनतों.- आजच्या दिवसाच्या कामांत घोटाळा होणें म्हणजे उद्यांचें कांहीं स्वातंत्र्य आपण गमावणें.

गोंधळ म्हणजे सर्व सुखांचा शत्रू. दिरंगाईमुळें गोंधळ माजतो. सज्ज असणें म्हणजेच काम संपावयाला शिकणें. जें संपलें नाहीं तें पुरें झालें असें कसें म्हणतां येईल ? ज्या गोष्टी आपण अर्धवट सोडूं त्या पिशाच्या-प्रमाणें पुन्हां: पुन्हां आपल्या मार्गांत येतील व भंडावून सोडतील. आल्या दिवसानें आलेल्या दिवसाचा विचार करावा. सारें काम हिशोबांत काढावें. त्याची विल्हेवाट लावावी आणि नव्या नवीन दिवसाला मोकळे व्हावें. त्या नवीन दिवशीं आपली जुनी ओझीं दामटूं नये. अशा रीतीनें त्या त्या क्षणींचें काम करून आपण सदैव तयार रहायला शिकूं. नेहमीं

तयार असणें याचाच खोल अर्थ म्हणजे केव्हांहि मरण्यासाठीं तयार असणें हा होय.

× × ×

२६

टॉक्‌विलेचें 'अमेरिकन लोकशाही' हें पुस्तक वाचलें. या पुस्तकावर निश्चित असें मत आजच नाहीं देत. परंतु एकंदरींत पुस्तक मोठें छान आहे. या पुस्तकांत 'मॅांटेस्क्येचें' पुष्कळच अनुकरण आहे. लेखनशैलीहि जरा दुर्बोध वाटली, कृत्रिम आणि कंटाळवाणी आहे. तिच्यांत ताजेपणा, अभिनवता नाहीं. या पुस्तकांत शहाणपणा खच्चून आहे परंतु येथें कल्पनेचा विलास नाहीं. हें पुस्तक विचार करावयाला लावील, परंतु मनाला मोहणार नाहीं, वेड लावणार नाहीं. आणि जरी हें पुस्तक गंभीर असलें तरी पोरकटहि आहे. ग्रंथकार विचारांचे जणुं तुकडे तुकडे करतो. एखाद्या फळाचे काप पाडीत आंत जावें त्याप्रमाणें विचाराचे काप करीत हा पुढें जातो. एखाद्या विषयाचा विचार करतांना ही पद्धति अवलंबिणें. यांत दोष असतात. आपण आजुबाजूच्या गोष्टींचं ज्ञान मिळवितो, अवयवांचें ज्ञान मिळवितो, परंतु संपूर्ण वस्तूचें--अवयवांचें-सम्यक् ज्ञान आपणांस मिळत नाहीं. हजारों ठिणग्यांचा प्रकाश झाला तरी तो पुरेसा वाटत नाहीं. तो दरिद्री, अंधुक, क्षणिक असा असतो. असें असलें तरी लेखकाची बुद्धि परिणत आहे व ती अंतर्भेदी आहे. यांत संशय नाहीं. विषयाचा व्यापक अभ्यास त्यानें केलेला आहे. आणि त्या बरोबरच खोल पृथक्करणाची शक्तीहि त्याच्याजवळ आहे.

× × ×

२७

टॉक्‌क्विलेच्या पुस्तकानें एकंदरींत मनावर शांतिप्रद परिणाम झाला. हें वाचून मधूनमधून कंटाळाहि येई. जगाविषयीं एक प्रकारचें औदासीन्य वाटे. आपल्या सभोंवती जें चाललें आहे, जें ध्येय तयार केलें जात आहे, तें चुकवतां येणार नाहीं याची जाणीव हें पुस्तक करून देतें. एक नवीन युग सुरू झाले आहे याची खात्री या पुस्तकावरून झाली. हें युग दुय्यम दर्जाच्या लोकांचें आहे. अलौकिक विभूति, महात्मे आतां दिसणार नाहींत. हजारों टेंकड्या दिसतील, परंतु आकाशाला डोकें भिडविणारा हिमालय आढळणार नाहीं. आजुबाजूचें सारें वातावरण सामान्य जनांचेच असलें म्हणजे मनांतील आकांक्षा गाठून जातात. आपण समानता उत्पन्न करतों परंतु त्यामुळें सारखेपणा उत्पन्न होतो. विविधता विलुप्त होते. व्यक्तीचें वैशिष्ट्य नष्ट होतें. जगांतील असत् दूर करण्यासाठीं, जें उत्कृष्ट, अपूर्व व सुंदर आहे त्याचीहि होळी करावी लागते. सामम्न्यानें पाहिलें तर समाज कमी रानवट होईल परंतु अधिक पोरकट होईल.

मोठ्या माणसांचें, थोरांचें युग चाललें. सामान्य लोकांचें जीवन मुंग्यांचें तेंच ते एकविध जीवन सुरूं होत आहे. समानतेच्या अमूर्त तत्त्वाचा जर विजय झाला तर आजचें युग व्यक्तिमहात्म्याचें असूनहि व्यक्तीचा विकास होणें दुष्कर होईल. सर्वत्र सारखेपणा आणण्याच्या प्रयत्नामुळें, श्रमविभागाच्या आनंततेमुळें समाजाला महत्त्व येऊन व्यक्ति कांहींच नाहीं असें होईल.

प्रचंड वर्षावानें व अपरंपार पुरांमुळें मोठमोठे पर्वत जर सपाट झाले तर दऱ्याखोऱ्यांतील तळजमीनच वर येऊन उंच दिसूं लागते, त्याप्रमाणें मोठ्यांचा मोठेपणा प्रकट न होतां जें सर्वसाधारण आहे तेंच पुढें येत जाईल. अपूर्व व असामान्य सारें नाहींसें होईल. जेथें सर्वत्र सपाट आहे, उंचनीच कांहीं नाहीं असें मैदान दिसूं लागेल. विभिन्नता, विरोध दिसणार नाहीं. समाज एकसारखा दिसूं लागेल. तेथें विविधता उरणार नाहीं. आंक्‌डेशाकाश एकंदर बेरीज करून म्हणतील कीं जगाची प्रगति होत आहे. परंतु

नीतिशास्त्रज्ञ म्हणेल कीं अधःपात होत आहे. वस्तूंची प्रगति होईल, परंतु मनाची खच्ची केली जाईल. जें जें सुंदर आहे तें जाईल व जें जें उपयुक्त आहे तेंच पुढें उभें राहील. कलांच्या जागेवर उद्योगधंदे येऊन बसतील. धर्मांची जागा अर्थशास्त्र घेईल. अंकगणित काव्याच्या सिंहासनावर बसेल. सारें सपाट करून टाकणाऱ्या या युगाला पोटाचाच एक रोग सदैव जडून राहील. या लोकसत्तेच्या युगांत शेवटीं अशीच पाळी यायची कां? हेंच नीरस ध्येय अखेर गांठायचें का? केवळ खाण्यापिण्यासाठीं, बाह्य गोष्टीसाठीं एवढी किंमत द्यायची का? मनुष्याच्या ठिकाणी सहनशक्ति आहे, नवनवीन निर्माण करण्याची शक्ति आहे. ही सहनशक्ति सदैव कार्य करीत असते व म्हणून जागामध्यें हे नानाविध भेद आपणांस दिसतात. हे सारे भेद जमीनदोस्त करून हें सगळें जग ठरीव सांच्याचें बनवायचें का? सृष्टीच्या आरंभींहि समानता होती, सारखेपणा होता. म्हणजे काय होतें? निष्क्रियता, दुबळेपणा, मरण, निर्जीवता हीं होतीं. पुन्हां त्याच गोष्टीकडे आपण जायचें का? आपल्या जीवनाचें निर्जीवता हें का स्वभाविक स्वरूप उद्यां व्हावयाचें? समाजसत्तावादी व तशाच प्रकारचे इतर लोक यांना आर्थिक समानता, राजकीय समानता हवी आहे. त्यांच्या प्रयत्नाचें हें ध्येय आहे असें म्हटलें तरी चालेल. परंतु याच्याहि पलीकडे जाऊन मनाचें एक नवीन राज्य नाहीं का निर्माण करतां येणार? जेथें धर्म नांदेल, जेथें सारे आत्मे खेळीमेळीनें राहातील, ज्या राज्यांत या केवळ जड नि नीरस उपयुक्ततावादापेक्षां, सत्य, सुंदर, शिव, हीं असतील; भक्ति, पावित्र्य, उदात्तता उत्साह हीं दिसतील; जेथें अपूर्वता नि आनंदता असतील; शाश्वत अशा ज्या नगरांत, ज्या राज्यांत या तत्त्वांची पूजा राहील असें राज्य नाहीं का स्थापतां येणार? केवळ उपयुक्ततावाद, आदिभौतिक सुखवाद, केवळ भावनाहीन शरीरपुष्टि, ही केवळ शारीरपूजा, अहंची अर्चा, हेंच का आपल्या सर्व प्रयत्नांचें अंतिम प्राप्तव्य? मानवजातीच्या अविरत उद्योगाची हीच का अखेरची फलश्रुति? मला तरी असें नाहीं वाटत. मानवजातीचें ध्येय याहून निराळें आहे, उदात्त आहे. तरी पण एवढें खरें कीं आपल्यांतील पशुता

आधीं संतुष्ट केली पाहिजे. आपणांला जें हें बाह्य दुःख आहे, जें दुःख सामाजिक विषमतेमुळें उत्पन्न झालेलें आहे, तें प्रथम दूर केलेंच पाहिजे. आध्यात्मिक व दैवी उन्नतीकडे जाण्यापूर्वी, सत्यम्, शिवम्, सुंदराकडे जाण्यापूर्वी पोटापाण्याचे प्रश्न नीट सोडविलेच पाहिजेत. परंतु पोटापाण्याचे प्रश्न म्हणजे अंतिम साध्य नव्हे हें विसरतां कामा नये.

× × ×

२८

रात्रीचे दहा वाजले आहेत. बाहेर चंद्रप्रकाश आहे. आजचा चंद्रप्रकाश जरा अपूर्व असा आहे त्याच्यामध्यें जणूं गूढता आहे. थंडगार व उत्साहप्रद असा वारा वहात आहे. तारे कोठें कोठें चमकत आहेत. गच्चीवरून किती शोभा दिसत आहे! चंद्राचे हे स्निग्ध, सौम्य, शीतल किरण एक प्रकारच्या गंभीर शांतीचा जणूं वर्षाव करीत आहेत. अनुभवी माणसाच्या मुखावर जसें एक प्रकारचें दुःखगर्भ स्मित असतें, संयमी, प्रशान्त असा आनंद जसा असतो, त्या आनंदांत त्या स्मितांत सहनशीलतेचें एक प्रकारचें गुप्त सामर्थ्य जसें असतें, तसें या चांदण्यांत आहे. तारे, ठळक ठळक तारे चमकत आहेत. तृणपर्णें सळसळत आहेत, कांपत आहेत. सभोवतालच्या सृष्टींत कसलाहि आवाज नाहीं. सर्वत्र स्तब्धता, शांतता आहे. हिरव्या झाडांच्या खालीं मोठमोठ्या सावल्या पडल्या आहेत; त्या वळणाच्या जवळहि सांवल्या दिसत आहेत; छाया दिसत आहेत. सारें एक प्रकारें रहस्यमय व गंभीर असें वाटत आहे. हा निशीथलसमय किती प्रशांत, किती एकान्तमय! हे निशे, तुझ्याजवळ सौंदर्य नि दुःख दोन्ही आहेत. तूं खिन्न करतेस, समाधानहि देतेस. आजपर्यंत जे गेले आणि पुढें जे जातील त्या सर्वांची तूं आठवण करून देतेस. तरीहि पुन्हां "धीर धर, घाबरूं नकोस" असें सांगून तूं विश्रांतीचें अभिवचनहि आम्हांस देतेस.

× × ×

२९

आज रविवार. चर्चमध्यें आज गेलों होतों. तेथें अडोल्फे मोनाड यांचें प्रवचन होतें. आजचें हें त्यांचें दुसरें प्रवचन. मागच्या रविवारचें प्रवचन अधिक उत्कट, भव्य असें होतें. परंतु आजच्या प्रवचनांत स्वतंत्र विचार, स्वतंत्र बुद्धि ही अधिक होती. मला पाहिल्या प्रवचनापेक्षां आजचें अधिक उंच नेणारें, मनाला उन्नतिप्रद असें वाटलें. पाहिल्या प्रवचनाचा विषय ख्रिश्चनधर्मी मनुष्याचें अतर्जीवन किंवा सेंट जॉन हा होता. तर आजच्या दुसऱ्या प्रवचनाचा विषय सेंट पॉल म्हणजेच प्रत्यक्ष कर्ममय जीवन हा होता. वक्तृत्व अपूर्व होतें. त्याची मोहीनी माझ्या पूर्णपणें प्रत्ययास येत होती. मी नागासारखा डोलत होतों. निर्भय विचार, सुभगता, जोर, एकंदर कला आणि त्याबरोबरच मनाची तळमळ नि बुद्धीची चमक हीं सारीं असल्यामुळें ओठाबाहेर शब्द पडतांच माझे कान पिऊन टाकीत. संकटामुळें कांहीं लोकांचा उत्साह द्विगुणीत होतो हें तत्व मला पूर्णपणें पटलें. ज्या गोष्टी इतरांना मार्गोतील अडथळे वाटतात, तेच प्रसंग दुसऱ्यांना विजयप्राप्तीचे, मोठे होण्याचे असतात. त्या दीड तासाच्या प्रवचनांत सेंट पॉल प्रत्यक्ष आमच्या समोर आहे. त्याच्या डोळयांतून गरिबांसाठीं अश्रू वाहत आहेत, असें वाटलें. त्यानें आजाऱ्यांची शुश्रूषा कशी केली, त्यानें आपला झगा कसा हुडकला, टिमॉथीला त्यानें औषध कसें दिलें, त्यानें ते कंतान कसें दुरुस्त केलें, थोडक्यांत, ज्या ज्या गोष्टींनीं आपणांला थोडेसें हसूं येईल, अशा सर्व गोष्टी वक्त्यानें सांगितल्या आणि त्या साध्या गोष्टींनींच आमच्या डोळ्यांतून अश्रू आणले. त्या साध्या गोष्टींतूनच अत्यन्त उज्वल असे धडे त्यानें दिले. हुतात्मा या नात्यानें, धर्मप्रवर्तक या नात्यानें. सर्व दृष्टीनें सेंट पॉलचें वर्णन केलें त्याचें दुःख, त्याची भूतदया, त्याच्या मनाची कोमलता आज आमच्यासमोर पुन्हां उभी केली गेली. आणि हें सारें वर्णितांना व्याख्यात्याच्या वाणींत अशीं कांहींएक दिव्यता नि भव्यता होती, अशी कांहींएक प्रत्यक्षत्वाची ऊब होती कीं, तशी मी आजपर्यंत कधींच पाहिली नाहीं.

आजचें शतक हें सुखासक्त शतक आहे. धर्मोपदेशक व धर्माचे अनुयायी–मेंढपाळ नि मेंढ्या-सारे एक प्रकारच्या द्रव्यमदिरेनें सुस्त होऊन पडले आहेत. अशा या युगांत दुःखांचें, कष्टांचें, संकटांचें असें उन्नत वर्णन ऐकलें म्हणजे हृदय हेलावतें. कष्ट हाच देव माना, हे शब्द ऐकून हें सुखलोलुप मन हादरतें. जगाविषयीं बेफिकीर असणाऱ्या या शतकांत, दुसऱ्यांविषयीं उदासीन व निष्प्रेम असणाऱ्या या शतकांत, भूतदया व प्रेम यांनाच दैवत माना असें सांगणें; सध्याच्या या शतकांत, ज्या शतकांत ख्रिश्चन धर्म हा मनुष्यास अनुसरण्यास कठिण आहे असें कोणी मानतात, तर तो अनुसरणें म्हणजे माणसास कमीपणा आहे असें दुसरें आणखी कोणी म्हणतात, अशा या शतकांत तुमच्या हृदयांतच जन्मतःच हा ख्रिस्ताचा धर्म, हा उदार मानवतेचा स्वाभाविक धर्म आहे, त्याची पूजा करा, असें सांगितलेलें ऐकणें, म्हणजे किती स्फूर्तिप्रद वाटतें! असें प्रवचन ऐकून मनाची चलबिचल होतें आणि प्रवचनकारानें समारोप करतांना किती उज्वल वाणीनें सांगितलें कीं, " आतां नवीन लोकांची जरूर आहे. वादळें येत आहेत. ती या जगाचा विध्वंस करतील. या वादळांपासून जगाला वांचविण्यासाठीं प्रबळ वृत्तीचे खंदे वीर, उत्साही पुरुष पाहिजे आहेत प्रभूच्या पुत्रांनो, लेकरांनो , देवाच्या उठा. अश्रूंनीं पेरा म्हणजे पुढें विजय मिळेल. "

अशा प्रकारचें प्रवचन म्हणजे मनाला केवढें खाद्य! हें केवढें ज्ञान! हें व्याख्यान ऐकतांना माझे डोळे सजल होत होते तर मन उत्कृष्ट वक्तृत्वाचें कौतुक करीत होतें. ती भाषण शैली, एकंदर मांडणी निरनिराळ्या उपमा,रुपकें, सारें अपूर्व होतें; घेण्यासारखें होतें, अविस्मरणीय होते. मी हादरलों, चकित झालों. मुग्ध झालों. हृदयांत विचारकल्लोळ झाले.

× × ×

३०

मताला किंमत आहे, महत्त्व आहे, मत ही एक शक्ति आहे. आपण जेव्हां आपल्या मित्रमंडळींत असतों, तेव्हां इतरांचें मत आपल्या विरुद्ध असलेलें पाहून आपणांस वाईट वाटतें, बाह्य जगांत विरुद्ध मताची आपणास भीति वाटते. आपल्यासारखें इतरांचें मत व्हावें म्हणून आपण खुशामत करूं नये त्याचप्रमाणें तुमच्याप्रमाणेंच माझें मत आहे, असें वरपांगी दाखवून कोणास फसवूंहि नये. खुशामत करण्यानें आपल्या मनाची क्षुद्रता दिसते, तर दुसऱ्यास फसविण्यांत विचारशून्यता नि अदुरदर्शीपणा दिसतात. पहिल्या गोष्टीविषयीं शरम वाटायला हवी, दुसरीविषयीं वाईट वाटायला हवें. तूं स्वतःकडे लक्ष दे. दुसऱ्या प्रकारची चूक तूं पुष्कळ वेळां करतोस व मग रडत बसतोस. या चुकीमुळें तूं तुझें स्वतःचें किती तरी नुकसान करून घेतलें आहेस. आपला अभिमान, ताठा जरा कमी करायला शीक. तूं दुसऱ्याप्रमाणें तयार आहेस, त्यांच्याइतकेंच चातुर्य, शहाणपण, हुशारी हीं तुझ्या ठायीं आहेत, हें दाखविण्यासाठीं तुला कमीपणा पदरांत घ्यावा लागला, जरा विनम्र व्हावें लागलें तरी हरकत नाहीं. या जगांत हुशार लोक असतात. ते अभिमानी असले तरी तसें ते दाखवीत नसतात. जगांत नाना स्पर्धा चाललेल्या आहेत. अनेक महत्त्वाकांक्षांचे झगडे आहेत. नानाविध माणसांनीं गजबजलेल्या या जगांत हंसत हंसत फसवावें लागतें, प्रत्यक्ष कृतीनेंहि फसवावें लागतें, मुकेपणाइतकेंच शब्दानेंहि फसवावें लागतें, स्वाभिमानी व स्वतंत्र वृत्तीच्या मनुष्याला, नेकीच्या प्रामाणिक मनुष्याला या जगाचा कंटाळा येतो. त्याचें पित्त भडकतें तरीहि अशा या जगांतच, या संसारांतच नीट नांदायची कला आपणांस शिकायची आहे. या जगांत यशस्वी जीवनाची, विजयाची, पुरुषार्थाची आवश्यकता आहे. तूं यशस्वी हो. या जगांत सामर्थ्य ओळखलें जातें तूं समर्थ हो. बलवान् हो, या जगांत बहुमत आपल्यावर पगडा बसवूं पाहत असतें. बहुमताला धुडकावून लावण्याऐवजीं, त्यांच्याबरोबर भांडावें, झगडावें, तीं आपलींशीं करून घ्यावीं. जें जें वाकडें आहे, सर्पाप्रमाणें हळूच येऊन दंश करणारें आहे, जें जें त्रासदायक, अनुदार नि दुष्ट नष्ट आहे, त्या

सर्वांचा आपणांस संताप येतो, तिटकारा येतो. हें सारें चिरडून टाकावें असें वाटतें. परंतु ही एक प्रकारची सूडबुद्धि माझ्या मनांत फार वेळ टिकूं शकत नाहीं. हा संसार आहे. किती झालें तरी आपण सारीं माणसेंच. सारे मानव आपले भाऊ आहेत. आपल्यांतील दिव्यत्वाची ज्योत आपण मालवतां कामा नये. आपण सगळयांवर प्रेम केलें पाहिजे. या जगांत पुण्यानें पापाला, चांगल्यानें वाईटाला, जिंकून घेतलें पाहिजे. सर्वांत महत्त्वाची वस्तु म्हणजे निर्मळ सद्सद्विवेकबुद्धी. या दृष्टीनेंहि आपण दूरदर्शीपणाचा उपदेश केला तरी हरकत नाहीं. ख्रिस्त म्हणतो, या जगांत कबुतराप्रमाणें सरळ नि सर्पाप्रमाणें धोरणी असलें पाहिजे. तूं आपल्या कुलशीलाला जप, नांवाला जप, याचा अर्थ तूं अभिमानी हो, घमेंडखोर हो, असा नव्हे. परंतु आपण जर आपल्या नांवाला, लौकिकाला डोळयांत तेल घालून जपलें नाहीं, तर आजपर्यंत आपण जें काम केलें, जी इमारत उठवली, तें सारें धुळींत मिळण्याचा संभव असतो. म्हणून नांवाला जप. तसें करण्यांत सत्यप्रीतीहि असते. आपल्या सुसंस्कृत निःस्वार्थतेंतहि थोडा स्वार्थी गंध असतो. खरें म्हटलें तर त्याचें समर्थन करतां येत नाहीं. कारण जगाच्या मतापेक्षां आपण यांत स्वतःला श्रेष्ठ मानतों. आपण खरोखर जसे आहोंत तसें आपलें स्वरूप जगांत दाखवायला योग्यता लागते व त्याबरोबर विनम्रताहि लागते; आपण कोणी अलौकिक नाहीं, ही वृत्ति मनांत सदैव जागी असावी लागते.

मी ही जी माझी चिन्तानिका प्रत्यहीं लिहितों, तिचे माझ्यावर किती उपकार आहेत! मी लिहूं लागलों म्हणजे माझ्या मनाची प्रक्षुब्धता कमी होते. ही पहा मनाची चलबिचल थांबली, या वहींतील शेवटचा भाग मी नुकताच पुन्हां वाचला व सकाळ निघून गेली. वाचतांना एक प्रकारचे तेच तेच विचार मला आढळले. विविधतेचा अभाव दिसून आला. परंतु त्याचें नाहीं मोठेसें. मी लिहिलेलें हें बाड वाचण्यासाठीं नाहींचि मुळीं. माझ्या स्वतःच्या समाधानासाठीं, स्वतःला सूचना म्हणून हें लिखाण आहे. माझ्या भूतकाळांतील हे टप्पे आहेत, खुणा आहेत. कांहीं खुणा मरणदर्शक क्रॉसच्या आहेत; कांहीं सुंदर मनोरे आहेत. कांहीं वठून गेलेले परंतु पुन्हां पल्लवित झालेले तरु आहेत; कोठें शुभ्र संगम-

रवरी पाषाण आहेत; कोठें सुवर्णनाणीं आहेत. परंतु या सर्व सामक्षांचा उपयोग आत्म्याच्या राज्यांत मार्ग मिळविण्यासाठीं आहे. यात्रेकरूनें कसा कसा कुठकुठें प्रवास केला, त्याच्या या खुणा करून ठेवल्या आहेत. ह्या खुणांच्या साहाय्यानें आपलें विचार, आपले अश्रु, आपले आनंद तो पुन्हां पाहूं शकेल. ही माझी प्रवासी रोजनिशी आहे. जरी यांतील कांहीं उतारे इतरांस उपयुक्त असलें व कधीं कधीं मी स्वतः त्यांतील कांहीं भाग प्रसिद्धीसाठीं पाठविला, तरी हीं हजार पानें फक्त माझ्याच उपयोगाचीं आहेत. त्यांची मलाच किंमत आहे. जीवनाच्या एका कोपऱ्यांत राहून मुशाफिरी करणाऱ्या जीवाच्या मनोवृत्तीविषयीं ज्यांना जिज्ञासा असेल, त्यांनाही हीं पानें उपयुक्त वाटतील. जगाच्या खटाटोपापासून, किर्तीपासून, मानसन्मानापासून दूर राहणाऱ्या एका जिवाचे हे विचार आहेत. माझ्या जीवनांतच जर वैशिष्ट्य नाहीं, तर माझ्या लिखाणांत तरी तें कोठून येणार ? त्याच त्या भावना मनांत पुन्हां आल्या कीं तेच ते विचार पुन्हां येणार. परंतु एक गोष्ट येथें सदैव आढळेल. ती म्हणजे सत्य होय. माझ्या विचारांची अधिष्ठात्री देवता सत्य हीच एक आहे. सत्यशोधन हेंच या विचारांचें कर्तव्य. या लिहिण्यांतील हाच हेतु, या चिंतनिकेचें हेंच प्रासव्य.

× × ×

## ३१

**मी** फिरायला गेलों होतों. खूप मजा वाटली. आनंद वाटला. आकाश निरभ्र होतें. सूर्य उदयाचलावर येत होता. सर्व छटा उज्वल दिसत होत्या. प्रत्येक वस्तूचें स्वरूप स्पष्ट दिसून येत होतें. सरोवरावर मात्र मऊ असें धुकें पसरल्यामुळें तें आनंत दिसत होतें. धुक्याची पांढरी कड शेताच्या तोंडाना लागलेली दिसत होती. हिरव्यागार कुंपणावर धुकें पडल्यामुळें, त्यांना धातूचा मुलामाच दिला आहे कीं काय, असें वाटत होतें. सारें दृश्य मनोहर होतें. झाडांना अजून नवीन पानें फुटलीं नव्हती.

हवा उत्साहवर्धक, आरोग्यदायक अशी होती, प्रसन्न होती. तिच्यांत ताजेपणा जोम, आनंद हीं भरलेलीं होतीं. फौस्टनें म्हटलें आहे, "हे शिष्या तुझ्या संतत तृषित जीवाला या उषःकालीन दंवबिंदु सिंधूंत डुंबव. याचें त्याला स्नान घाल." फौस्टचें म्हणणें किती खरें आहे! प्रातःकालच्या वाऱ्याच्या झुळकांबरोबर अंगांत एक प्रकारचें चैतन्य संचरतें; एक प्रकारची आनंददायी शक्ति हंसत हंसत जणुं आपल्या रोमरोमांत शिरत असते. प्रत्येक नवीन दिवस नवीन जीवन आणून देतो; प्रत्येक प्रभात जीवनाशीं जणूं नवा करार करीत असतें. पहांटेच्या वेळेस सारें कांहीं तजेलदार, टवटवीत, ताजे, मुलाप्रमाणें दिसत असतें. ही सृष्टि जणूं मुलांसाठीं आहे असें वाटतें. प्रभातकाळचें वातावरण जसें निर्मळ नि प्रसन्न असतें, त्याप्रमाणें प्रभातकाळीं सत्यहि जणुं निर्मळ, पारदर्शक असतें, त्यावेळेस तें आपणांस सर्वत्र प्रतीत होतें. नवपर्णाप्रमाणें ही आपलीं इंद्रियें हा जीवनरस, हा निर्मळ प्रसन्न प्रकाश मोठ्या असोशीनें घे घे करून पिऊं लागतात. पार्थिव गोष्टी दूर झुगारून ही एक दैवी हवा, हा पारमार्थिक सत्याचा चारा, तीं खाऊं पिऊं लागतात. गंभीर निशा, तारकाखचित असें नभोमंडळ चिंतनशील मनुष्याजवळ शाश्वततेच्या, अनंततेच्या गुजगोष्टी करीत असतील, तर हा प्रसन्न प्रभातकाळ नवीन निश्चय, नवीन आरंभ, नवनवें मनोरथ, नवीन ध्येयें यांच्या गोष्टी मनुष्याजवळ बोलत असतो. निळ्या नभाची स्तब्धता आणि उदास गंभीरता हा जिवाला आत्मचिंतनाकडे खेंचीत असलीं तरी सृष्टींतील उत्साह नि आनंद अंतरंगांत शिरून जीवनाची उत्सुकता उत्पन्न करीत असतात. जगावें असें वाटूं लागतें. वसंत ऋतु आतां आलाच म्हणायचा. कांहीं फुलांनीं त्याचें स्वागत करायला सुरुवातहि केली आहे. कांहीं ठिकाणी गालफुग्या कळ्या, आतां आम्ही फुलणार, लौकर हंसणार, असें सुचवित आहेत. कांहीं लता वेली हिरव्यागार दिसत आहेत. वसंत येणार!

× × ×

## ३२

आज सायंकाळीं मनाला अगदीं उदास, शून्य असें वाटत होतें कर्तव्याचे नि भविष्यासंबंधीचें गंभीर विचार याचें मनावर मोठें ओझें पडलें होतें. मी चिंतनांत मग्न झालों. दिवसभराच्या कामानें आणि दगदगीनें त्रस्त झालेलें हें मन, त्याला अशा चिंतनाची जरूरीच असते. क्रौसे यांचें ( wrbild der Menschheit ) हें पुस्तक वाचलें. माझी मनोबुद्धि तृप्त झाली. विचार शांत झालें. या पुस्तकानें माझी गरज भागवली. या तत्त्वज्ञानाच्या लेखनाचा माझ्यावर नेहमींच असा शांतिप्रद परिणाम होतो. त्याच्या लिहिण्यांत गोड अशी धर्ममय गंभीरता आहे, त्यामुळें माझें मन मुग्ध होतें. ती गंभीरता माझ्या मनासहि व्यापून राहते. या ग्रंथकाराच्या लेखनानें माझें मन शांतीच्या भावनांनी आणि अनंततेच्या विचारांनीं भरून येत असतें.

तरीहि संपूर्ण समाधान नसतें. कांहीं तरी कमी आहे असें वाटत असतें. 'माझिया जातीचे मज भेटो कोणी' असें वाटतें. माझ्याबरोबर दुसरेंहि यावेत, माझ्या धर्माचे, मझ्या या वृत्तीचे पुष्कळ असावेत असें वाटते. सर्वांबरोबर या धर्मतेचा अनुभव घेतां यावा असें वाटतें. माझ्या मनांत ज्या धर्मकल्पना आहेत, त्या या जगांत साकार कधीं बरें होतील ? आपण एकटेंच योग्य मार्गानें जाणें यांत मला समाधान नाहीं. मला एकट्याचा खिश्चन धर्म नको आहे. माझ्या धार्मिक आशाआकांक्षा ज्याप्रमाणें अतृप्त नि अपूर्ण आहेत, त्याचप्रमाणें सामाजिक नि स्नेहप्रेमाच्या आशाआकांक्षाहि अतृप्तच राहिलेल्या आहेत. पुष्कळदां या माझ्या वासनांना मी गप्प बसवितों, निजवून ठेवतों. तरी पण त्या पुन्हां जाग्या होतात नि दुःख देतात, अशी माझी दोलायमान स्थिति आहे. एक प्रकारची ग्लानि आणि निष्क्रियता याच्यामध्यें मी पुढें मार्ग करीत आहे; जें अति दूर आहे नि अज्ञात आहे, त्यांच्यासांठीं मी तहानलेला आहे; परंतु आपल्यासाठींहि मी माझी शक्ति उधळून राहिलों आहे. फ्रेंच कादंबरीकारांना जी स्थिति रंगवायला फार आवडते,

त्या स्थितींत मी आहे. ज्या प्रांतात माझ्या वासना जाऊं इच्छितात तो माझा प्रांत नसतो. तेथें माझ्या मनाला सारें अपरिचित असें वाटतें. ही जागा आपली नाहीं असें वाटतें. कोठेंहि जा, तेथें माझ्या हृदयाला विसावा नाहीं मिळत, शांति नाहीं मिळत. हृदय सदैव अस्वस्थ असंतुष्ट आणि भुकेलेलें असेंच असतें ! खरें आहे. हा मर्त्यलोक आहे. येथें सारें क्षणभंगूर आहे. माझ्या सुखस्वप्नांची जागा म्हणजे तो स्वर्गलोक आहे. तें अनंतधाम म्हणजे माझें खरें स्थान. त्या माझ्या माहेरीं जायला मन उत्सुक आहे. तेथें जाण्यासाठीं तें रडत आहे. त्या माहेरच्या विसाव्याची त्या सुखाची त्याला तहान लागली आहे. गटे म्हणतो, " जीवनांत पुरुषार्थ मिळवा ! कर्मवीर व्हा ! निश्चयी, कृतसंकल्प, प्रयत्नवादी वीर बना ! " आणि स्वतःला ईश्वराच्या हातांत सोंपवून वागणें म्हणजे स्वार्थत्याग, वैराग्य व संयम. स्वतःला प्रभूच्या हातात सोपवण्याचें सामर्थ्य दाखविण्यांतच मानवाचा खरा शहाणपणा आहे ! हें जीवन म्हणजे झगडा आहे, ईश्वरावर भरंवसा ठेवून जी काय शांति नि गंभीरता मिळेल तेवढीच. असें करण्यांत ईश्वरावर श्रद्धा ठेवण्यांतच तुझें हौतात्म्य आहे. हेंच तुझें ध्येयार्थ आत्मसमर्पण. यांतच विजयाची ग्वाही.

× × ×

## ३३

वसंत ऋतूंत एक प्रकारची शिथिलता येते, ती गोड सुस्ती माझ्यांत आली आहे असें वाटतें. सभोंवतीं सर्वत्र उन्मादकारी असें वासंतिक वातावरण आहे. आज सकाळचें दृश्य कसें काव्यमय होतें ! पक्षी गात होते, प्रसन्न, प्रशान्त सूर्यप्रकाश पडला होता, हरितश्यामल शेतांवर वारा नाचत होता, खेळत होता. सभोंवतालचें हें काव्य माझ्या हृदयांतहि शिरत होतें. आतां सर्वत्र स्तब्धता आहे. हे स्तब्धते ! तूं भीषण आहेस. सागराची गंभीर शान्ति ज्याप्रमाणें भिवविते,—कारण त्या शांतीमुळेंच त्याची अथांग खोलिहि सम-

जून येत असते-त्याप्रमाणं तूंहि अंतःसागरांतील खोल प्रदेश दाखवून भिववितेस मनःसागरातील अनंत प्रदेश पाहून दृष्टि बावरते, मागें फिरते. तेथें खालीं काय दिसतें? कसल्या राशी तेथें असतात? कधींहि शांत न होणाऱ्या वासनाविकारांचे, त्याचप्रमाणें संकटांचें, कष्टांचे ढीग तेथें दिसूं लागतात. नको, ही भीषण स्तब्धता नको! तिच्यापेक्षां वादळें बरीं. या वादळांनो, या! वादळी वाऱ्यांमुळें वरचें पाणी फार तर प्रक्षुब्ध होईल. झंजावातांनो, या! माझ्या मनःसागरांत लाटांचा कल्लोळ उसळवा! माझ्या दृष्टीपासून हृदयसागरांतील ही अथांग खोली लपवा! आपण मृत्पिंड आहोंत. काळाचीं लेकरें आहोंत. शाश्वततेच्या विचारानें आपल्या सर्वांच्या मनांत एक सहजस्फूर्तवेदना निर्माण होते; अनंततेच्या दर्शनानें गूढ असें भय वाटूं लागतें. जणुं मृतांच्या राज्यांत, त्या अनंत, अज्ञात परलोकांत जात आहोंत असें वाटतें. हे दुबळ्या हृदया, तूं जिविनासाठीं, प्रेमासाठीं रडत आहेस. तुझें रडणें व्यर्थ नाहीं. कारण हें जीवन पवित्र आहे.

ज्या वेळेस आपण अनंताशी एकरूप होतों, त्या वेळेस हें समग्र जीवन निराळें दिसूं लागतें. आपण ज्या गोष्टींत रमून गेलों होतों, ज्यांच्यासाठीं आपला अट्टाहास असे, त्या साऱ्या गोष्टी क्षुद्र नि निस्सार वाटूं लागतात. आपण बुडबुडें आहोत, जगाच्या यात्रेंत दिमाखानें मिरवणारीं केवळ कळसुत्री बाहुलीं आहोंत, याची जाणीव होऊं लागते पै किंमतीच्या वस्तूंना अमोल मानून आपण कवटाळून बसलों होतों असें दिसतें. सारें बदललेलें दिसतें, निराळें दिसतें. रात्रीचा दिवस होतो, दिवसाची रात्र होते. बर्क्ले आणि फिक्टे यांचें म्हणणें खरें आहे. इमर्सनचेंहि म्हणणें सत्य आहे. हें जग म्हणजे माया आहे, असार पसारा आहे. वस्तूंच्या पसाऱ्यापेक्षां विचाराला सत्यता आहे, परींच्या कथांना, राजाराणींच्या गोष्टींना, दंतकथांना, आख्यायिकांना इतिहासाइतकेंच यथार्थत्व आहे. एवढेंच नव्हे तर इतिहासापेक्षांहि त्यांना अधिक सत्यत्व आहे. कारण सत्याचें स्वरूप अधिक यथार्थपणें त्यांतून दिसूं शकतें. या संसारांत एकच सारभूत वस्तु आहे. आणि ती म्हणजे आत्मा. बाकी हा सारा फोलकट पसारा आहे. सारें

मिथ्या मृगजळवत आहे. हे सारे आकार आहेत; स्वप्नें आहेत, प्रतीकें आहेत. चिदनुभूति हीच एक शाश्वत अशी, अभावरूप नसणारी वस्तु आहे. हें जग म्हणजे दारूच्या बाणाप्रमाणें आहे. दिसायला सुंदर परंतु क्षणभंगुर. या जगाचा उपयोग आत्म्याच्या रंजनार्थ आहे. या जगांत राहून स्वतःच्या आत्म्याला बलशाली करायचें असतें. जाणीव म्हणजे हें विश्व. आणि प्रेम हा या विश्वांतील सूर्यनारायण होय.

× × ×

३४

**मी** पुन्हां बाह्य विचारांत गुंग झालों. आंतरिक, भावात्मक जीवन हें माझें खरें जिव्हाळयाचें जीवन. बाह्य विचार माझें हें जीवन हिरावून घेतात, माझ्या मनाची तंद्री मोडते; एकतानतेचे पंख दग्ध होतात. शास्त्रांच्या अभ्यासानें परिपूर्ण मानव निर्माण न होतां, आंकडेमोड करणारा, सिद्धांत मांडणारा, नीरस मनुष्य निर्माण होतो. त्याला भावरूप जिणें जगणं नसतें. तो एक प्रतीक बनतो. नकोत ही शास्त्रें- चला, आपण खरें जीवन जगूं या! भावना संवर्धू या! फार पृथक्करणांत आपण गुंतूं नये. विचारापेक्षां स्फूर्ति, अभ्यासाहून अनुभव अधिक थोर आहेत. तर मग मला विसांवा देणारी भार्या नाहीं का मिळणार? मला मुलें बाळें नाहींत का होणार? ज्यांच्यांत मीच स्वतःला पुन्हां जन्मलेला पाहीन, ज्यांच्यांत माझ्या मनांतील गुदमरलेल्या, कोंडलेल्या, अविकसित अशा वृत्तिप्रवृत्ति फुललेल्या मला दिसतील, अशीं मुलें पाहण्याचें माझ्या नाहीं कां नशीबी? परंतु मी भितों. ह्या विचारापासून मी माघार घेतों. कारण माझें स्वप्न भंगेल अशी मला भिती वाटते. जीवनाच्या प्रत्यक्ष युतांत मी इतकें गमावून बसलों आहे कीं, आणखी पणास लावावें असें मला आतां वाटत नाहीं. प्रत्यक्षांत उतरण्याऐवजीं मला स्वप्नांतच रमूं दे.

तूं स्वतःवर जुलूम करूं नकोस. स्वतःमधलि चंचल भावनांचीहि कदर

कर. त्यांचाही सन्मान कर. कारण त्या भावना म्हणजे तुझेंच रूप, तुझेंच तें जविन, तुझाच तो स्वभाव. तुझ्याहून सुज्ञ अशा जगच्चालकानें त्या तुझ्यांत ठेवल्या आहेत. केवळ उपजतबुद्धि, केवळ इच्छाशक्ति याच्या आहारीं जाऊं नकोस. नैसर्गिक वृत्तिप्रवृत्ति मोह पाडतात तर इच्छाशक्ति सत्ता गाजवूं बघते. क्षणिक वासनाविकारांचा तूं गुलाम होऊं नकोस. तसेंच केवळ काल्पनिक, मोघम, अस्पष्ट अशा वस्तूंच्या मागें लागूं नकोस. या जीवनांत बाहेरून वा आंतून जें कांहीं मिळेल, तें खुशीनें घे. जें जें अदृश्य आहे, त्याची आनंदानें पूजा कर, त्याचें स्वागत कर. परंतु एक ध्यानांत ठेव. जीवनांत एकसूत्रीपणा आण; जें अदृश्य आहे तें प्रत्यक्षांत आण; जें तुझ्यांत स्वाभाविक आहे तें दैवी कर. जें दैवी आहे तें स्वाभाविक कर. अशा रीतीनेंच तुझा गोड व सर्वांगीण विकास होईल. तुझ्या मुखावर, भालप्रदेशावर दैवी शोभा फुलेल. परतु एक अट आहे. आदळआपट करायची नाहीं. सारें सहन करावयाचें क्रॉसवर बलिदानार्थ उभें रहायचें.

× × ×

३५

गतकालांतील आश्चर्यकारक नि कौतुकावह अशा गोष्टींचा आनंद पुन्हां अनुभवतां येईल का ? त्या स्मृति पुन्हां जगतां येतील का ? तरुणपणांत पहांटेच्या वेळीं फॉसिग्रीच्या पडक्या किल्ल्यांत मी जाऊन बसलों होतों. एकदां भर दुपारीं लॅव्हीच्या वरच्या बाजूस असणारे डोंगर चढून मी गेलों होतों आणि एका झाडाखालीं बसून माझी विचारपूस करायला आलेल्या तीन फुलपांखरांजवळ मी बोलत होतों, त्यांच्याकडे बघत होतों. आणि एकदां रात्रींच्या वेळीं उत्तर समुद्राच्या किनाऱ्यावर वाळूमध्यें मी पडून राहिलों होतों आणि आकाशांतील सुंदर आकाशगंगेकडे पहात होतों. भव्य, अमर स्वप्नें अनुभवीत होतों. तीं स्वप्नें अनुभवतांना हें सारें विश्व आपणांत आहे असें वाटतें. तारकांना आपण हात लावीत आहोंत, अनंततेत मिठी मारीत आहोंत, असें

वाटतें. दैवी सुखाचे जणूं ते क्षण असतात, अत्यानंदाच्या घटिका असतात. या जगांतून त्या जगांत आपला विचारविहंग भराऱ्या मारीत असतो; आपली विचारशक्ति अशा वेळेस गूढ कोडी सोडवित असते; कूट प्रश्नांचा उलगडा करीत असते; समुद्राप्रमाणें विशाल नि अपार होऊन जणूं आपण श्वासोच्छ्वास करित असतों; शांत आहोंत असें वाटत असतें; आपला विचार गगनाप्रमाणें गंभीर नि अनंत होऊन आपल्या भोंवतीं गुंगत असतो. असे ते क्षण -अशा त्या स्मृति-त्यांचा लाभ होईल का ?

स्मृतिदेवतेची ही भेट होईल का ? तिची ज्यांच्यावर कृपा होते, त्यांच्या भालप्रदेशांभोवतीं चिंतनशक्तीचीं दिव्य तेजोवलयें ती निर्मित असते; त्यांच्या हृदयांत असामान्य विभूतिचें सामर्थ्य ओतांत नसली तरी त्यांची प्रशान्त तन्मयता ती ओतीत असते. अमर क्षण दुर्दम्य अंतःप्रेरणेचे हे क्षण. अशा वेळेस आपण विश्वाकार आहोत असें वाटतें. विश्वाप्रमाणें विशाल आणि विश्वंभराप्रमाणें धीरगंभीर आहोंत असें अनुभवतें. आकाशांतील दिव्य गोलांपासून तो य:कश्चित् शिंपाशेवाळांपर्यंतची ही सारी सृष्टि, हें सारें ब्रह्मांड आपल्या समोर उभें असतें. सारें विश्व आपल्या हृदयाला व्यापून टाकतें. आणि प्रेमाच्या उत्कटतेनें, नियतीच्या निश्चिततेनें आपल्यामध्यें अखंड नि अविनाशी असें कार्य घडवून आणित असते. किती मोलाचे क्षण ! किती थोर आठवणी ! किती आनंद नि कौतुक ! गतस्मृतींचे अवशेषसुद्धां आपणांस उचंबळवतात त्यांची अस्पष्ट स्मृतिहि हृदयांत आदर नि उत्साह निर्माण व्हायला पुरेशी असते. परमेश्वरच जणूं भेटायला यावा, त्याप्रमाणें आपला हा भव्य, दिव्य, श्रीमंत भूतकाळ आपल्याला भेटावयास येतो. अनंत असें क्षितिज डोळ्यां उमोर असतें. उत्तुंग शिखरांवर आपण उभे असतो. आणि अशा स्थानापासून पुन्हां क्षुद्र गोष्टींच्या दरींत येऊन पडणें, पुन्हां चिखलांत येऊन पडणें... अरे राम ! तो गरीब बिचारा मुसा ! स्वर्गांतलि दिव्य लोक तो आपल्या दृष्टी समोर बघायचा; परंतु निर्जन वाळवंटांत दमला भागलेला त्याचा देह अखेर गतप्राण होऊन पडला होता. दैवाची अशी आहे गति. आपणांपैकीं असा कोण आहे कीं ज्याला ही दिव्य दृष्टी नाहीं, ज्याला हा स्वर्ग मिळालेला नाहीं ? प्रत्येकाच्या आनंदाचे दिव्य क्षणहि मिळालेले आहेत; आणि

प्रत्येकाच्या नशिबीं शेवटीं एकाकी मरणेंहि आहे. गतस्मृतींच्या विचारांच्या प्रकाशांत जें जीवन आपण बघतों, त्या मानानें आजचें हें वास्तव जीवन किती क्षुद्र वाटतें ! आपलें तें दैवी यौवन, त्यांतील तें तेज, तो पराक्रम, त्या विशुद्धता,-हें सारें मनासमोर आणलें म्हणजे आजचें हें प्रौढपण किती नीरस नि कंटाळवाणें, फिकें नि अंधारमय असें वाटते !

× × ×

३६

आज सकाळीं हवा शांत होती. आकाशानें थोडासा बुरखा घेतला होता. वसंतऋतूनें कितपत प्रगति केली आहे तें पाहाण्यासाठीं बागेंत गेलों होतों. कितीतरी फुलझाडें फुललीं होतीं. निरनिराळे ताटवे पाहिले. परंतु हें सारें पाहात असतां एकाएकीं एक अपूर्व गोष्ट दिसली. मी चकित झालों. आनंदलों. एका कोपऱ्यांत, कांटेऱ्या झुडपांत लहान पानांचें एक लहानसें रोपटें रात्रीं फुलून उभें होतें. तें चिमुकलें फुलझाड लग्नासाठीं जणुं फुलमाळा घालून उभें होतें. जरा लाजून बाजूला उभें राहून परंतु तेजानें चमचम करीत होतें. प्रसन्न टवटवित असें तें फुलझाड आपलें सारें मोहक सौंदर्य तें मला दाखवित होतें. आणि ती तिकडे दुसरीं पांढरी धोप फुलें फुलत होतीं. किती नाजुक नि कोमल, हळूवार नि हंसरी. वसंताचा साधेपणा नि निर्मळपणा त्यांच्यांत आहे. सूर्यप्रकाशांत तीं हळुहळु डोळे उघडीत आहेत. जागृति येतांच आपलें विचार ज्याप्रमाणें हळुहळू येऊं लागतात, त्याप्रमाणें फुलें सर्वत्र हळुहळू फुलत आहेत. उडणाऱ्या भ्रमरांप्रमाणें हीं नाचणारीं हिरवीं पानें आणि त्या पानांमधून फुललेलीं हीं फुलें ! मनोहर देखावा. हे निसर्गा, तूं कौतुकांची जननी आहेस. तूं गूढ आहेस, कोमल आहेस. आम्ही तुझ्या संगतींत अधिकाधिक कां बरें रमत नाहीं ? निसर्गप्रेमानें वेडे होऊन जाणारे सारे लोक माझ्या डोळ्यांसमोर उभे राहिले. निसर्गाचें

भक्त नि उपासक, निसर्गाचें सौंदर्य पाहून समाधिस्त होणारे सारे माझ्या मनश्चक्षूंसमोर आले. आणि माझ्या मनाला टोंचणी लागली. मी नवीन धडा शिकलों. खेडेगांवांत एक लहानशी पर्णकुटी आणि सभोंवतीं एक छोटीशी फुलबाग. मोठमोठ्या ग्रंथालयांत मिळणाऱ्या ज्ञाना-पेक्षां अधिक ज्ञान येथें मिळूं शकेल. परंतु नीट निरीक्षण परक्षिण करणारें हवेत. खरे भक्त नि उपासक हवेत. त्या त्या योग्य ऋतूची वाट पाहाणारे हवेत. आपण उगीच भाराभर वाचतों. कितीतरी उठाठेवी करीत असतों. कामाच्या जिकीरीनें रंजीस येत असतों. संसारांत, नाना कर्मांत आपण किती गर्क असतों ! सर्वांत महत्त्वाची जर कोणती गोष्ट असेल तर चिंतेचे गाठोडे दूर फेकून देणें. नसते विचार, नसत्या चिंता; भविष्याबद्दलचा फाजील विचार. नाना प्रश्न उभे करणारे पांडित्य, हें सारें फेकून दिलें पाहिजे. आपण लहान मुलाप्रमाणें या जाणाऱ्या क्षणांत रहायला शिकलें पाहिजे. उत्साही बालकाप्रमाणें या वर्तमानकालांतच सुखानें नि कृतज्ञतापूर्वक रहायला शिकलें पाहिजे. आपले धंदे जरा बाजूस ठेवावे याचा अर्थ आळशी व्हावें असा नाहीं. जरी आपण प्रत्यक्ष कर्म करित असलों तरी वैचारिक कर्म सुरू असतेंच. आणि हें कर्म सुरू असतांना आपल्या मनावरील, आत्म्याच्या मुखमंडलावरील अनेक आंठ्या नाहींशा होत असतात. आपल्या आत्म्याला मोकळें वाटतें. तो पंख पसरतो, स्वतःचें स्वरूप प्रकट करतो. ताजातवाना होऊन तो उड्डाण करूं लागतो. रस्त्याच्या कडेचं पायाखालीं तुडवलेलं गवत, किंवा एखाद्या रोपट्याचें म्लानवदन पान ज्याप्रमाणें दोन थेंब मिळतांच पुन्हां तजेलदार दिसूं लागतें, त्याप्रमाणें आपला आत्मा सारीं दुःखें विसरून संस्फूर्त जणुं होतो; त्याचें अभिजात तेज, त्याची सत्यरूपता त्याला प्राप्त होतात. रात्रीं पाऊस पडल्यानें सुकून गेलेली, वठून गेलेली सृष्टी ज्याप्रमाणें पुन्हां हसू लागते, रंगरूप धारण करते, त्याप्रमाणें विचारांची समाधि आपल्या सर्व जीवनाला नवरंग देत असते, सामर्थ्य देत असते. दिवसाच्या धाम-धुमीनें, नाना प्रकारच्या संघर्षांनीं, घर्षणानीं, क्रियाप्रतिक्रियांनीं, दमून भागून गेलेले आपले विचार रात्रींच्या चिंतनानें पुन्हा बलवान होतात. चिंतनानें मनोभूमि सुपीक होते आणि आपल्या मनांतील हजारों सुप्त विचारांचीं बीजें अंकुरित होऊं

लागतात. नवनिर्मितीला वाव मिळतो. आणि खेळत खेळत भविष्यकाळासाठीं, बुद्धीच्या उपयोगासाठीं नानाविध साहित्य, नाना मूर्ति नि कल्पना यांची रास जमा होऊन राहतें. समाधीमध्यें रोजच्या विचारांना सुटी असते. त्यांना रविवार असतो. समाधींत विचारांची आदिशक्ति मात्र जागृत असते. जीव गुदमरवून टाकणारें आठवड्यांतील भाराभर काम अधिक हितावह कीं रविवारची शांति अधिक जीवनदायी याचें उत्तर कोण देणार ? एकाग्रता, तन्मयता मधुर असते एवढेंच नव्हे तर उपयोगीहि असते. समाधीमुळें मनाला नि तनाला एका प्रकारचें नवजीवन, नवयौवन लाभतें. स्नानामुळें शरीराला नि चित्ताला ज्याप्रमाणें प्रसन्न वाटतें, त्याप्रमाणें समाधिस्नानानेंही परिणाम होतो. एक प्रकारची तरतरी येते. मुक्त वाटतें. स्वातंत्र्याचें, मोक्षाचे हें लक्षण आहे. मुक्तीचा हा महोत्सव आहे. आनंदाचा हा सोहळा आहे, मोक्षाची मेजवानी आहे. शेताभातांतून, दऱ्याखोऱ्यांतून, या फुलावरून त्या फुलावर भटकत फिरणाऱ्या भ्रमराच्या गोड मेजवानीसारखी ही मेजवानी गोड आहे. लक्षांत ठेवा कीं जीव, आपला हा आत्मा म्हणजे भ्रमरच आहे.

× × ×

३७

आज रविवार. सेंट जेम्सची पत्रें वाचलीं. सेलेरीचें धर्मभाषण वाचलें. पास्कलचेहि विचार वाचले. परंतु वाचायच्या पूर्वी जवळ जवळ तासभर बागेंत मुलांबरोबर खेळत होतों, बोलत होतों. फुलें, नानाविध वनस्पति, लहानलहान झुडपें, नाकतोडये, टोळ, गोगलगायी इत्यादींकडे नीट बघायला मी त्यांना शिकवित होतों. मुलांमध्यें अवलोकन शक्ति यावी, या अनंत वस्तूंविषयीं त्यांच्या मनांत कौतुक, जिज्ञासा, आश्चर्य नि सहानुभूति उत्पन्न व्हावीत असा माझ्या मनांत हेतु होता, म्हणून मी त्यांना सारें दाखवित होतो.

लहान मुलांबाळांबरोबरचें आपलें बोलणें फार महत्त्वाचें असतें.

त्यांच्याजवळ केलेल्या संवादांचें महत्व मानावें तेवढें थोडेच आहे. आज सकाळीं या गोष्टीची मला नीट जाणीव झाली. आणि एक प्रकारची नैतिक नि धार्मिक अशी भीति मनांत उद्भवली. बाल्य आणि ऋजुता या पवित्र गोष्टी आहेत. आईबाप मुलांच्या मनोभूमींत आपल्या बोलण्याचालण्यानें, आपल्या सर्व क्रियाकर्मांनीं पावलोपावलीं बीज पेरित असतात, हें बीं पुढें खात्रीनें वाढायचें असतें, फळायचें असतें. आईबापांचें हें पवित्र कर्तव्य आहे. आपल्या मुलाबाळांचे ते गुरु असतात. आचार्य असतात. मुलांजवळ वागतांना, बोलतांना एक प्रकारच्या धार्मिक गांभीर्यानें, पवित्र भावनेनें, प्रार्थनामय वृत्तीनें सारें करावें. ईश्वराच्या राज्यांतील हें काम आहे, देवाघरची ही शेती आहे, हें आईबापांनीं लक्षांत ठेवायला हवें. कोणत्याही प्रकारचें बीजारोपण असो; तें कर्म पवित्र आहे, गूढ आहे. तें बीं जमिनींत पेरणें असो वा मनोभूमींत पेरणें असो. मनुष्य हा शेतकरी आहे. मनुष्याची जगांत जीं कर्तव्यें आहेत, त्यांची खरी कल्पना एकच आहे कीं त्यानें आपलें जीवन परिपूर्ण करावे, कृतार्थ करावें; त्यानें जीवन वाढवावें, सर्वत्र पेरावें. मानवजातीचें हें दैवी कार्य आहे, आणि तें संपादण्याचें मुख्य साधन म्हणजे वाणी हें होय. वाणी हें जीवनाचें बीज पेरीत जाणारें यंत्र आहे. वाणीनें आपण बीज पेरतों व प्रकटहि करित असतों. उभय प्रकारचें काम वाणी करीत असते. परंतु आपण वाणीचें हें अखंड चाललेलें कार्य बहुधा नेहमीं विसरत असतों योग्य प्रसंगीं, योग्य वेळीं शब्दाचा जो परिणाम होतो, त्याचें मोल कोण करील, त्याचें मोजमाप कोण करील ! ही वाणी म्हणजे अपूर्व अशी गूढ वस्तु आहे. परंतु वाणीच्या या दिव्य कर्माकडे आपलें फारसें लक्ष जात नाहीं. कारण आपण नाना प्रकारच्या विषयोपभोगांत दंग असतो. आपण नेहमीं मातींत लडबडलेले, भोगाला लालसावलेले असे असतों. भंगुर व नाशिवंत वस्तूंतच आपण रमतों. रस्त्यांतून जातांना दगडधोंडे, झाडेंमाडें आपण बघतों. आपण घरांतील सामानसुमान, टेबलखुर्च्या याकडे लक्ष देतों. जें जें दृश्य आहे, स्पष्ट आहे, भौतिक आहे, तें आपण पाहतों. परंतु वातावरणांत धोंधावणारें, विहरणारें हजारों विचार, त्यांच्याकडे आपलें लक्ष नसतें. आपणांतील प्रत्येकाच्या

भोंवतीं विचारांच्या झुंडीच्या झुंडी रुंजी घालीत असतात. परंतु आपण तिकडे लक्ष देत नाहीं.

प्रत्येक जीवन म्हणजे श्रद्धेचें अभिवचन आहे. जीवन हें श्रद्धामय आहे कळत वा नकळत प्रत्येक जीवनाचा परिणाम अपरिहार्यपणें, शांतपणें होतच असतो. प्रत्येक जीवन स्वतःच्या शक्तीप्रमाणें या विश्वजीवनाला स्वतः-प्रमाणें करूं पहात असतें. आपणां सर्वांजवळ आत्म्याचें हें रसायन आहे. प्रत्येकजण जगाला सुधारूं पहात असतो. प्रत्येक व्यक्ति म्हणजे स्वयंप्रकाशी तेजोगोल आहे, प्रत्येक जीवन म्हणजे दीपस्तंभ आहे. हा दीपस्तंभ बंदरांत सुरक्षित नेईल किंवा खडकांवर फोडूनहि टाकील. मनांत असो वा नसो. प्रत्येक मनुष्य शिकवीत असतो. त्याचें वर्तन म्हणजेच मुकें प्रवचन असतें. या प्रवचनाचा उद्देश सदैव जगाला उपदेश करणें हाच असतो. परंतु हे सारे गुरु-भ्रष्ट असतात. उपदेशापेक्षां उदाहरणाचें महत्त्व अपूर्व आहे. आणि आपणां सर्वांवर एक अत्यन्त महत्त्वाची जबाबदारी असते. ती ध्यानांत ध्या. आपण सारे कळत वा नकळत एकमेकांचे आदर्श होत असतों. एकहि अयोग्य व दुष्ट मार्गाचा आदर्श निर्माण झाला तर तेवढ्यानेंहि या दैवी सृष्टींत विष निर्माण होईल, तुमच्या अपवित्र श्रद्धेचा तो डंका आहे. तुमचा देव सदोष आहे असें तुमचा असत् आदर्श पाहून जगाला वाटेल. पापामुळें पाप करणाऱ्याचेंच नुकसान होतें असें नाहीं. तर त्याचे जे दुसरे दुबळे बंधु असतात, त्यांचे जीवनहि त्यामुळें बिघडत असतें. आणि हा सर्वांत मोठा गुन्हा होय; हें सर्वांत घोर पाप होय. म्हणून असें म्हटलेलें आहे कीं " मनुष्यानें ईश्वराच्या या जगांतील एकहि लहानग्यास बिघडविण्यापेक्षां तो जन्मला नसता तरी बरें. "

× × ×

३८

डोंगरांवर फुलणाऱ्या फुलांत जसे निरनिराळे प्रकार दिसतात, त्याप्रमाणें स्त्रियांमुळें समाजांतील भिन्नभिन्न थरांची नीट कल्पना येत असते. सामाजिक कटिबंध स्त्रियांमुळें अधिक बिनचूक दृष्टोत्पत्तीस येतात. वर्गावर्गांतील श्रेष्ठ कनिष्ठ भाव स्त्रियांमध्यें अगदीं उघड उघड रीतीनें दिसतात. पुरुषांमध्यें हे भेद तितके स्पष्ट दिसत नाहींत. परंतु स्त्रियांमध्यें हें वर्गीकरण निसर्गाच्या नियमित पद्धतीप्रमाणें हमखास दिसतें. पुरुषांमध्यें मानवी स्वातंत्र शेंकडों प्रकारांनीं प्रतीत होत असते. त्या स्वातंत्र्यामुळें हे भेदाभेद कमी दिसतात. विभिन्नता भंगलेली जाते. पुरुष स्वतःच्या कृतीनें, उद्योगानें स्वतःला घडवित असतो. परंतु स्त्री ही परिस्थितीनें बदलत असते. पुरुष स्वतःच्या शक्तीनें परिस्थितीला आकार देतो. परंतु परिस्थितीचा स्त्रियांवर अधिक पगडा असतो. तिची सौम्य वृत्ति परिस्थितींत प्रतिबिंबित होते या सर्वांचा परिणाम असा होतो कीं, स्त्रिया या जातिविशिष्ट; वर्गविशिष्ट होतात तर, पुरुष व्यक्तिनिष्ठ बनतो.

परंतु पुन्हां आश्चर्य हें कीं, स्त्रिया अत्यंत अस्थिर नि चंचलहि असतात. नैतिक दृष्ट्या त्या स्थिर असतात. सामाजिक दृष्ट्या त्यांच्यांत फार बदल होतो. पहिल्या गोष्टींत त्यांच्यामध्यें समानता असते; दुसऱ्या गोष्टीमुळें त्यांच्यांतील भिन्नता, भेदभाव, अलगअलगपणा प्रतीत होतो. त्यांच्या बाह्य आविष्कारांत, त्यांच्या चालीरीतींत, अभिरुचींत, संस्कृतीच्या सर्व स्थितींचें नि पायऱ्यांचें, समाजांतील सर्व दर्जांचें नि वर्गांचें प्रतिबिंब पडलेलें असतें. परंतु त्यांच्या भावनांत, सहजप्रेरणांत, स्वाभाविक उपजत वृत्तिप्रवृत्तींत त्यांच्या इच्छांत आंतरिक एकता, समानता असते. ही एकता आणि निसर्गकृत व इतिहासकृत विषमता-दोन्हींचें प्रतिबिंब स्त्रियांत असतें. स्त्रीजातीचें ऐक्य, त्याचबरोबर समाजाचें वर्गीकरण दोन्ही गोष्टी स्त्रिया करतात. स्त्री जोडते व विभागतेहि; ती गोळा करते व अलग करते. स्त्री जाति व वर्ग यांना निर्मिते तर त्यांना मोडून एकताहि दाखवीत असते. स्त्रिया ज्या

मानानें आपलें द्विविध रूप प्रकट करतील. त्या मानानें एकता वा विभक्तता निर्माण होईल.

नीट पाहिलें तर मुळांत स्त्रियांचें काम सांभाळणें, टिकवून ठेवणें, तगवणें हें आहे. परंतु सारासार विचार न करतां सारेंच जुनें तें सोनें समजून ती उराशीं धरून बसत असते. मानवानें जें जें दैवी असें निर्माण केलेलें आहे, मानवास शोभेसें, उदात्त नि अमर असें जें जें त्यानें काव्यांत, धर्मांत, सद्‌गुणसंवर्धनांत, कोमलपणांत, निर्माण केलेलें आहे, त्या त्या सर्वांचा स्त्रीनें सांभाळ केला आहे. परंतु त्याचबरोबर जें जें तत्कालीन असतें, त्या त्या काळांतील परिस्थितीपुरतेंच असतें, जें वास्तविक जाणारें असतें, जें कृत्रिम असतें, तेंही ती कायमचें धरून ठेवींत असते. म्हणजेच नाना प्रकारच्या चाली, बाष्कळ बावळट कल्पना, पूर्वग्रह, रूढी, संकुचित क्षुद्रता यांनाहि ती कवटाळून बसते. गंभीर नि क्षुद्र, सत् नि असत्, शाश्वत नि क्षणिक दोहोंसहि त्याच चिकाटीनें त्याच पूज्यबुद्धीनें ती संभाळीत असते. तर मग शेवटीं करायचें काय ? तुला शक्य असेल तर विस्तवापासून धूर नाहींसा कर. तूं शोधून काढीत आहेस तो ईश्वरी नियम आहे. हा सिद्धांत चांगला आहे. स्त्री संरक्षण करणारी, सांभाळणारी आहे. पुरुष प्रगतिपथावर असतो. स्त्री परंपरेला चिकटून असते. स्त्रीपुरुषांशिवाय कुटुंब नि मानव जात यांचेंच अस्तित्व नाहींसें होईल. या दोन शक्ती नसतील तर इतिहास बनणार नाहीं.

× × ×

३९

काल माझें हृदय आनंदानें ओसंडत होतें. कालचें माझें तत्वज्ञान आनंदमय होतें, उत्साहमय होतें. हंसणारा वसंत आणि मुग्ध करणारीं गुलाबाचीं फुलें यांचें कालचें तत्वज्ञान होतें. माझ्याबरोबर दोन मित्र फिरायला आले होते. दोघांनाहि जीवनांत कटु अनुभव आलेले होते. त्यांना हाल

अपेष्टा भोगाव्या लागल्या होत्या. मी त्यांना "बलमुपास्स्व मा भीः" असें सांगत होतो. परंतु त्यांच्या मनाप्रमाणें माझींहि मतें असतीं तर त्यांच्याप्रमाणें मलाहि वाटलें असतें; त्यांच्या प्रमाणेंच मलाहि कटु अनुभव भोगावे लागले असते तर त्यांच्या सारखाच बुद्धिवाद मीहि केला असता. परंतु त्यांना उपदेश करतांना मी ही गोष्ट विसरून गेलों होतों.

[आपल्या विचारसरणी आपल्या स्वभावाच्या नि अनुभवाच्या निदर्शक असतात.] आपण ज्या परिस्थितींतून जातों, त्यांतूनच आपले विचारसिद्धान्त जन्मत असतात. म्हणजेच जें आपणास मिळालें तेंच आपण मिळविलें, असें म्हणायला आपणास आवडतें. आपला स्वभाव म्हणजेच आपलें कार्य, आपलें दैव म्हणजेच आपला विजय, असें आपण समजतों. परंतु हें सत्य नव्हे. आपल्या पोकळ अहंकारांतून ही माया, हें असत्य जन्म घेतें. स्वातंत्र्याची आपणास तहान असते, तिच्यांतूनच ही खोटी माया आपण निर्माण करीत असतो. आपण परिस्थितीचे अंकुर आहोंत, परिस्थितीनें आपणास घडाविलें आहे हें कबूल करायला आपणांस आवडत नाहीं, किंवा आपल्या आंतरिक बीजांचेंच आपण अंकुर आहोंत, असेंहि दाखवायला आपली तयारी नसते. परंतु खरी गोष्ट काय आहे ? आपण सर्व कांहीं जगांतून घेतों; जगांतूनच आपणांस सारें मिळतें. आपलें असें त्यांत फारच थोडें असतें. खंडीत रति, सिंधूंत बिंदु या न्यायानें तें असतें. आपलें म्हणून जें कांहीं असतें तें अभावरूप, विरोधरूप, दोषरूप असेंच असतें. जीवन आणि जीवनांतील आनंद या दोन्ही गोष्टीं आपणास मिळत असतात. आपलें वैशिष्ट्य, कशा रीतीनें या दोन्हीं गोष्टींचा आपण स्वीकार करतों, यांत आहे. म्हणून श्रद्धापूर्वक, खंत न बाळगतां, चिंता न करतां जगापासून आपण घेत राहूं या. आपला स्वतःचा स्वभावही परमेश्वरापासून घेऊं या व तो घेऊन सदयतेनें, सहृदयतेनें, निश्चयानें आणि विचारपूर्वक त्याची नीट निगा राखूं या. आपल्यामध्यें जे वाईट आहे, जें रोगट आहे त्याचाहि स्वीकार करणें प्राप्त आहे आणि अनिर्व्याज असा जो आनंद असतो, त्याची का भीति वाटते ? वेडा ! ईश्वर हा दयाळू आहे, चांगला आहे. तो जें करील तें बऱ्यासाठींच. तू स्वतःला सर्व बाबतींत, सुखाच्याहि गोष्टींत ईश्वरेच्छेच्या स्वाधीन कर.

त्या प्रभूपाशीं स्वार्थत्यागाची वृत्ति, अनासक्ति, निःसंगता, वैराग्य यांची याचना कर. आनंद व कृतज्ञता यांची जाणीव सदैव असावी म्हणून वर माग. तो परमात्मा आपला खराखुरा पिता आहे; त्यानें जीं सुखें दिलीं, जे आशिर्वाद दिले, त्याला आपण वास्तविक लायक नसल्यामुळें त्याची क्षमा मागितली पाहिजे, असें मनांत कधीं आणूं नका. तो प्रभू कां परका आहे ? तो प्रभु परका नाहीं असें ज्या धार्मिक आशावादामुळें वाटेल तो खरा आशावाद त्याच्याजवळ मागून घे. सुखी असण्याचें धाष्ट्य आपण केलें पाहिजे, आणि सुखी आहोंत हें छातीठोकपणें सांगितलें पाहिजे. परंतु आपल्या आनंदाचे निर्माते आपण नसून तो प्रभु आहे, ही आनंदाची ठेव त्यानें आपल्याजवळ ठेवली आहे, ही भावना मात्र मनांत सदैव असूं दे.

× × ×

४०

उतरणीच्या नागमोडी रस्त्यानें मी जात होतों आजूबाजूच्या हिरव्या मैदानांवर या ऋतूची खूण म्हणजे काजवे, त्यांतील एक दिसला. गवताखालून तो उडत नाचत जात होता. बुद्धीची प्रभा नुकतीच फांकूं लागल्यावर विचार ज्याप्रमाणें जरा भीत भीतच उडूं पाहात असतो, त्याप्रमाणें तो काजवा करीत होता.

× × ×

४१

ज्या ज्या गोष्टींनीं मनुष्याची प्रतिष्ठा नि स्वतंत्रता राहतात त्या त्या गोष्टीशीं हुकुमशाही जुलमी सत्तेचें एक प्रकारें वैर असते. आणि आश्चर्य हें कीं नैतिक प्रांतांतील संशोधनाची वृत्ति गुदमरवून टाकायला शास्त्रीय आणि व्यवहारवादी ज्ञानाची मदत घेण्यांत येत असते. प्रत्येक प्रकारच्या

जुलमाला, अनियंत्रित सत्तेला आजकालचा आधिभौतिक सुखवाद साथ देत आहे. मग तो जुलूम व्यक्तीनें केलेला असो वा समाजानें केलेला असो. आपल्या या एकोणीसाव्या शतकाचे ध्येय माणसाला यंत्र बनविण्याचें दिसत आहे. त्याच्यांतील सारी आध्यात्मिकता, त्याच्यांतील दैवी अंश, माणुसकी, नीति हीं नष्ट करून सामाजिक यंत्रांतील त्याला एक भाग बनविणें, हें आजकालचें ध्येय दिसतें. आपल्या व्यक्तित्वाचा परिपूर्ण विकास करायला आज अवसर नाहीं. जीवनाचा मध्यबिंदु व्यक्ति नसून समाज होत आहे. सद्सद्विवेक-बुद्धीस स्थान रहणार नाहीं. आत्म्याला ह्या बाह्य वस्तूंचा गुलाम करणें, मनुष्याला व्यक्तित्वापासून च्युत करणें ही आपल्या शतकाची प्रमुख प्रवृत्ति दिसत आहे. नैतिक सृष्टीच्या नियमांऐवजीं मृत आणि जड सृष्टीचे नियम आपणांवर लादले जात आहेत. सर्वसाधारण लोकांचे समानतेचें तत्त्व तेंच आज ध्येय होऊन बसलें आहे. सर्वांना बाह्यतः तरी सारखे करणें, बाह्यऐक्य निर्माण करणें, याचे प्रयत्न चालले आहेत. बुद्धिवादाऐवजीं आकड्यांनींच काम केलें जातें. तत्त्वापेक्षां बहुमताचाच उदो उदो होतो. एक प्रकारचें अभावरूप हें स्वातंत्र्य आहे. येथें स्वातंत्र्याचा अभिजात असा नियम नाहीं. सर्वत्र सत्तेचे प्रदर्शन. दुसरी मर्यादा नाहीं. विधायक स्वातंत्र्याला येथें वाव नाहीं. आंतरिक कायद्यानें त्या कर्माचें मार्गदर्शन होत असते, नैत्तिक सत्तेनें जें संमत केलेलें असते, असें कर्म येथें नाहीं. असें कर्म म्हणजे वास्तविक भावरूप स्वातंत्र्य. हायनेटनें आजच्या या युगाचें "समाजसत्ता वादाविरुद्ध व्यक्तिवाद" असें यथार्थ वर्णन केलें आहे. परंतु मला वाटतें कीं, हा अनादिकाळापासून चालत आलेला झगडा आहे. शब्द, त्यांतील अर्थ, आकार आणि त्यांतील आशय, बाह्य आणि आंतर, दृश्य आणि सत्य अशा प्रकारचें द्वंद्व काळांतील विचारांत आणि कल्पनांत दिसून येतें.

आधिभौतिक सुखवादानें सर्वनाश होत आहे. सौंदर्य नाहींसें होत आहे. सारें कांहीं हास्यास्पद आणि किळसवाणें होत आहे. प्रत्येक सत्य असत्य होत आहे. धार्मिक आणि राजकीय दोन्हीं क्षेत्रांत ही आधिभौतिक दृष्टि शिरली आहे. स्वातंत्र्य, समता, व्यक्तिमत्व, थोडक्यांत ज्या ज्या गोष्टींशीं

धर्माचा आणि राजकारणाचा संबंध येतो त्या सर्वांचा आज चुथडा होत आहे. लोकशाहीचें स्वरूप समजून घेण्याचें दोन मार्ग आहेत.

ज्यामुळें मनुष्य, मनुष्य आहे त्या सर्वच गोष्टी आजकाल धोक्यांत आहेत. व्यक्तीचें स्वातंत्र्य सद्सद्विवेकबुद्धि, आत्म्याविषयींची आदरभावना मानवाची उदारता व थोरवी सारें निकालांत निघत आहे. ज्याला ज्याला हा धोका दिसेल त्यानें त्यानें आत्म्याच्या रक्षणासाठीं आत्मकल्याणासाठीं, आत्म्याच्या हक्कांसाठीं, त्याचें श्रेष्ठत्व रहावें म्हणून झगडायला पुढें आलें पाहिजे. हें सर्वांत थोर कर्तव्य आहे. लेखक, शिक्षक, धर्मोपदेशक, तत्वज्ञानी सर्वांनीं मानवांतील मानव्याचें समर्थन करायला धावून आलें पाहिजे. मनुष्य यथार्थ असा ध्येयभूत आदर्शभूत, मनुष्य ! हा खराखुरा मनुष्य, हें सर्वांचें ध्येय असावें, ब्रीदवाक्य असावें, घोषवाक्य असावें. ज्या ज्या गोष्टींमुळें मानव अधःपतित होतो, त्याला कमीपणा येतो, त्याचे स्वरूप अवनत होतें, लघुतम केलें जातें, त्या सर्वांशीं लढाई पुकारली पाहिजे. ज्या ज्या गोष्टीमुळें हृदयाचे, मनोबुद्धीचे, संरक्षण होईल, आत्म्याची उन्नति होईल, त्याची प्रगति होईल, त्या त्या गोष्टीचा कैवार घेतला पाहिजे. धार्मिक राजकीय किंवा शैक्षणिक पद्धतींची एकच कसोटी आहे. मानवाचा विकास कितपत होतो, त्याची उन्नति किती होते, ही ती कसोटी होय. जर मनुष्याचें ज्ञान दूषित होत असेल तर ती पद्धती त्याज्य; जर शील बिघडत असेल तर ती पद्धति अनैतिक आणि वाईट; जर सद्सद्विवेक बुद्धीस धोका पोंचत असेल तर ती पद्धति केवळ गुन्हेगारीची.

× × ×

४२

प्रत्येक विवक्षित जीवन उन्नत होऊं पहात असतें, वरतीं जाण्यासाठीं धडपडत असतें, " ज्या उन्नत प्रदेशाकडे आपण जात असतों त्याची आपणांस आगाऊ कल्पना असतें; त्याचें थोडेसें तरी आविष्करण आपणांस झाले असतें. व्यक्तीच्या जीवनापेक्षां उच्चतर असें तें जें दिव्य जीवन, त्याची

आगाऊ जी कल्पना आपण करतों, ती कल्पना म्हणजे ध्येय. या ध्येयाकडे प्रत्येक व्यक्ती जात असते. आणि उदात्ततर, श्रेष्ठतर असें जें हें जीवन तें अधिकांशानें आंतरिक स्वरूपाचें असतें. म्हणजेच अधिक आध्यात्मिक असतें. ज्याप्रमाणें ज्वालामुखी पृथ्वीच्या पोटांतील गूढें प्रकट करतात, त्याप्रमाणें आत्म्याच्या अंतर्जगांतील स्फोट-मधून मधून जे होतात-म्हणजेच उत्साह नि आनंद होत. हें मानवी जीवन त्या सच्चिदानंदाकडे, त्या आध्यात्मिक जीवनाकडे जाण्याकडे जाण्याचें साधन आहे. त्या जीवनाकडे जाणारा सोपान अनंत आहे. पायरीपायरीनें आपण चढत असतों, हे जीवनाच्या अभ्यासका ! तुझ्यांतील दैवी अंशाच्या विकासासाठीं अहर्निश खटपट कर. दक्ष रहा, सावध अस. संधि दवडूं नको. जीवनाचें हें महाकाव्य तयार होत असतें. जीवनाचें रामायण महाभारत रचिलें जात असतें. त्यांत अनेक स्थित्यंतरें असतात, वायूप्रमाणें चंचल अशा अनेक घटना घडत असतात. परंतु प्रत्येक नवीन गोष्ट मागील गोष्टींतून आलेली असतें. सतत मरणानें स्वर्गीय जीवन लाभत असतें. प्रत्येक नवीन मरणाचें वेळेस आपण आपली दुर्बलता, अपूर्णता सोडून देत असतो. आणि बुद्धीचा नि प्रेमाचा तो जो सूर्य त्याच्या अपरिहार्य आकर्षणाच्या वाढत्या सामर्थ्यानें आपण त्याच्याकडे खेंचले जात असतो. आपापल्या ध्येयाकडें जाणारे हें मुमुक्षू जीव म्हणजे आकाशगंगेतील तारकापुंजाप्रमाणें वाटतात. हळुहळू ते दिव्यत्वाप्रत जात असतात. क्रमाक्रमानें प्रभूच्या त्या सिंहासनासमोर देदिप्यमान वेषानें सजून ते जाऊन उभे राहतात. त्यांनीं धारण केलेली ती दिव्यता म्हणजेच प्रभूचें परम वैभव होय. अति उदात्त सुंदरता होय. ईश्वर सर्व जीवात्म्यांचा पिता आहे. तो परमात्मा आहे. अमर अशा त्या स्वर्गीय राज्यांत प्रेमाची खंडणी द्या आणि सामंतवत् सुखानें नांदा.

× × ×

४३

आज माझें एकतिसावें वर्ष संपले.

जगांतील अत्यंत सुंदर व उदात्त असें काव्य कोणतें असेल तर तें जीवन होय. जें जीवन स्वतःचा विकास जाणतें, आपण कसकसे बनत आलों, वाढत आलो हें ज्याला नीट माहीत आहे, स्फूर्ति नि स्वतःची जाणीव ज्या जीवनांत हातांत हात घालून अविरोधानें नांदतात, परस्परांस साहाय्य करतात, आपण लहान जगांत आहोंत, याची जाणीव ज्या जीवनाला असते, आणि त्या विश्वव्यापक दैवी अशा विराट् जीवनाचीच आपण लहानशी आवृत्ति आहोत, ही श्रद्धा जेथें असतें तें जीवन खरोखरच काव्यमय आहे, खरेंच, तुम्ही सारे मनुष्य व्हा--म्हणजेच निसर्गासारखे व्हा. देवदूतासारखे व्हा. ईश्वराची प्रतिकृति तुम्ही बना. जें अति उदात्त आहे, महनीय आहे, सत्य, शिव नि सुंदर असें आहे, तें तुम्ही व्हा. जीविताच्या सर्व क्षेत्रांत जें परमोच्च असेल तें तुम्ही व्हा, तुम्ही अनंत विचार बना, अनंत इच्छाशक्ति बना. संपूर्णाची नवआवृत्ति बना. सर्व कांहीं नसून सर्व कांहीं व्हा स्वतःला पुसून टाका. स्वतःला शून्य करून विश्वात्मक बना. रिकाम्या जागेत, पोकळींत हवा ज्याप्रमाणें घुसते, त्याप्रमाणें तुम्ही निरहंकार झाल्त कीं परमात्मा तुमच्यांत शिरेल. तुम्ही त्या अनंताला मग स्वतः कोंडाल. तुम्ही स्वतःला रिक्त पात्र करा आणि तें दैवी तत्वानें भरा. नम्र व्हा, भक्तिमय व्हा, निःस्तब्ध व्हा, मूक व्हा म्हणजे तुमच्या हृदयांतील सूक्ष्म असा तो खोल ध्वनि तुम्हांला ऐकूं येईल. दैवी वृत्तीचे पवित्र असे व्हा, म्हणजे परमपवित्र परमात्म्याशीं तुम्हांला एकरूप होतां येईल, त्याच्याशी सुखसंवाद तुम्हांला करतां येईल. आपल्या अंतःकरणांतील अत्यंत खोल अशा जाणीवेच्या पवित्र गाभाऱ्यांत स्वतःला नेत जा. त्या अंतःशिवालयांत वसत जा. दिक्कालातीत हो. प्रकृतीपासून मुक्त हो. मोह, नाना उपाधि, यांतून सुटका व्हावी म्हणून तूं एक बिंदु हो, परमाणु हो. म्हणजेच वरचेवर मरायला शीक. या मरण प्रसंगीं स्वतःला नीट परीक्षीत जा. त्या अखेरच्या मरणाची तयारी म्हणून आपण रोज मरत आहोंत असें मनांत भरावित जा.

निष्कंप वृत्तीनें शांतपणें जीवनांतील सर्व आधिव्याधि जो सहन करतो, डोळे आंधळे होवोत, कान बहिरे होवोत, आंग लुळे होवो; कोणी वंचना करो; दारिद्र्य येवो, सर्व गोष्टींना जो तोंड देतो, तोच त्या परमथोर न्यायाधीशासमोर, प्रभूसमोर निर्भयतेनें उभा राहूं शकेल. तोच मरणाचे स्वागत करायला थोडा फार सिद्ध आहे असें म्हणतां येईल.

मी स्वतः या स्थितीपासून किती बरें दूर आहे ? सुखदुःखाना, मानापमानांना समभावानें मिठी मारण्याची माझी कितपत तयारी आहे ? निदान आपण इतकें तरी शिकूं या कीं ज्या वस्तू आज ना उद्यां आपणापासून नक्की हिरावून नेण्यांत येणार आहेत, त्यांच्या आसक्तींत तरी गुंगायचें नाहीं. जें जें जीवनांत मिळेल तें कोणाची तरी ठेव आहे, हें ऋण आहे असें समजून घ्यावें. परंतु जें अविनाशी आहे त्याला मात्र हृदयाशीं सदैव धरून ठेवावें. एवढा तरी प्रयत्न आपण करूं या. तो प्रभू आपला वत्सल पिता आहे तो परम कारुणिक आहे अशी श्रद्धा बाळगणें; तो आपणांस शिकवीत आहे, अशी कल्पना करणें; लोंकर कातरून टाकलेल्या कोंकरासहि गार वारा लागू नये म्हणून जो योजना करतो; निरुपाय म्हणूनच जो शासन करतो; परत घ्यायचें झालें तर जो दुःखानें व जड अंतःकरणानें घेतो; असा तो प्रभू आहे. हा विचार आपल्या मनास धीर देतो. आपण त्या परमेश्वराचीं लेकरें उसूनहि अमर आणि सार्वभौम असूनहि आपणांस सहानुभूतिची, प्रेमाची, दयेची, कोमलतेची किती जरूरी भासत असते! किती अगतिक आणि अशरण आपणांस वाटत असतें! आपण ईश्वराचे आहोंत, अनंत अशा त्या परमात्म्याचा आपणांस आधार आहे या श्रद्धामय विचारानें आपणहि विश्वाप्रमाणें प्रबळ नि अजिंक्य होतों. परंतु आपण केवळ स्वतःवर विसंबू, देव वगैरे सब झूट आहे असें म्हणूं, तर आपण केवळ क्षुद्र जंतु बनूं. नैतिक आध्यात्मिक, गंभीर अशी खरी धार्मिक वृत्ति असेल तरच जीवनांत अपार उत्साह आपण अनुभवूं. जी श्रेष्ठता प्राप्त होणें शक्य आहे, ती मिळवूं शकूं. धर्म तुम्हांस अजिंक्य नि विजयी करतो. तो तुम्हांस निष्कलंक राखतो. ईश्वराच्या नांवानें ही सारी पृथ्वी तुम्हांस जिंकून घेतां येईल. ज्याला केवळ न्यायाची नि सत्याची अपेक्षा आहे त्याला प्रभु

त्या तर देतोच परंतु त्याहूनहि कांहीं अधिक देतो. निःस्वार्थता हें बळ आहे. ज्याला ही पृथ्वी मोह पाडूं शकत नाहीं, त्याच्या पायाशीं पृथ्वी येऊन लागते. असं कां बरें होतें ? कारण आत्मा प्रकृतीचा स्वामी आहे आणि हें जगत, ही पृथ्वी ईश्वराची, त्या परमात्म्याची आहे. "आनंदानें जगा; उत्साही रहा; साऱ्या जगाला मी जिंकून घेतलें आहे" असे स्वर्गीय ध्वनि सांगत असतो.

प्रभो, ज्यांचीं मनें तयार आहेत, परंतु ज्यांचीं शरीरें दुर्बळ आहेत, त्यांना तुझें सामर्थ्य दे.

× × ×

४४

**बागेंत** अर्धा तास फिरत होतों, मजेदार पाऊस पडत होता. आसमंताचें दृश्य शरदृतूंत दिसावें त्याप्रमाणें दिसत होतें. भुऱ्या रंगाच्या अनंत छटांनीं आकाश ओथंबल्यासारखें दिसत होतें. दूरच्या पर्वतांभोंवतीं धुकें घिरट्या घालीत होतें. सृष्टि खिन्न दिसत होती. तारुण्यांतील शेवटचीं स्वप्नें अपरिहार्य दुःखानें गळणाऱ्या अश्रुभरांत ज्याप्रमाणें वाहून जातात. त्याप्रमाणें चोंहोंबाजूस झाडांचीं पानें गळून पडलीं होतीं. चिंवचिंव करणारी पाखरांचीं पिलें झुडपांतून एकमेकांस पकाडित होतीं; झाडाच्या फांद्यांतून लपंडाव खेळत होतीं, पिंगट, पिवळसर नि तांबूस अशा वर्णांनीं पृथ्वी झाकोळली होती. झाडें जवळ जवळ उघडीबोडखीं दिसूं लागलीं होतीं. त्यांचे पर्णमय पोषाख हिरावून घेण्यांत आले होते. त्यांच्या खोडांचें काळसर, मधून शेंदरी नि पिवळट असे रंग दिसत होते. कांहीं फुलें अजूनहि रेंगाळत होतीं. निघून जायला कां कूं करित होतीं. कांहीं फुलांच्या पाकळ्या इतस्ततः पडल्या होत्या. शेतें उघडीं, उजाड होतीं. कुंपणें विस्कळित नि विरळ दिसत होतीं. फक्त देवदार वृक्ष मात्र हिरवेगार दिसत होते. मरणाला दाद न देणाऱ्या अमर यौवनाप्रमाणें धैर्यशौर्यानें ते उभे होते. हे नानाविध आकार

नि रंग, या लतावेली, हे वृक्ष, हीं झुडपें, ही चराचर सृष्टि, स्वर्ग नि नरक, या सर्वांपासून अनंत नि आश्चर्यकारक तत्त्वें नि सूचना आपणांस प्राप्त होत असतात. ज्या डोळयाला ही विविधता बघायची संवय आहे, त्याला ही अपार संपत्ति मिळत असते. मला हें सारें दृश्य पाहून अपार आनंद झाला. मी मोहून गेलो. मी माझ्या हातांत काव्याची यक्षिणीची कांडी जणुं कांहीं घेतली होती. या कांडीनें स्पर्श करतांच ती ती वस्तु स्वतःतील नैतिक स्वारस्य मला दाखवी, समजवून देई. आसमंतातले हें दृश्य म्हणजे अंतरात्म्याच्या स्थितीचेंच निदर्शक होतें. जो बाहेर पाहील नि डोकावून बघेल त्याला बाह्य नि आंतरसृष्टींतील अपूर्व साम्य पाहून आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाहीं. शास्त्रांनें सत्याचें तितकें यथार्थ आविष्करण होत नाहीं, जितकें काव्यानें होतें. सकल शास्त्रांच्या समुच्चयानें जें सत्य शेवटीं कदाचित् सांपडण्याचा संभव, तेंच सत्य काव्याला ऐक्यात्मक समरसदृष्टीमुळें तत्काळ आकलन करतां येतें. कवि सृष्टीच्या आत्म्याला जाणुं शकतो; परंतु शास्त्रज्ञ त्या आत्म्याच्या अविष्करणार्थ, सिद्धी करणार्थ अपरंपार साहित्य तेवढें गोळा करून ठेवतो.

× × ×

४५

**सर्व** विकारांची माझ्यांत शक्यता आहे, कारण माझ्या मनांत मी सर्वांना कोंडून ठेवलें आहे. रानटी पशूंना माणसाळवावें त्याप्रमाणें या वासनाविकारांना पिंजऱ्यांत घालून मी माणसाळवूं पहात आहे. हे वासनाविकार गुरगुरत असतात. त्यांची ती गुरगुर मला ऐकूं येत असते. अंकुरणाऱ्या प्रेमाला मी शतदां खुडून टाकलें आहे; उपजतांच त्याच्या गळ्याला पुनः पुन्हां नख लावलें आहे. कां? कारण मला नक्की माहीत आहे कीं या प्रेमांत खरें जीवन नाहीं. माझ्यापेक्षां हें प्रेम कमी जगणारें, कमी टिकणारें आहे. नैतिक अशा अंतःप्रेरणेला

ही गोष्ट ताबडतोब समजून येते. ती शाश्वत प्रीति, ती परमोच्च प्रीति एक दिवस माझ्या जीवनांत येईल या आशेनें हीं साधी क्षणभंगुर प्रेमें मी सदैव गुदमरवित आलों आहे. इंद्रियगम्य प्रीति, काल्पनिक भावनात्मक प्रीति हिची मी परीक्षा केली आहे. पारखल्यावरच तिला मी फेंकून दिलें. मानवी जीवनाच्या खोल अंतरंगांतून जन्मणारें जें विश्वमूलक प्रेम, विश्वव्यापक प्रेम, त्याचा मी शोध करीत आलों आहे, अद्यापहि ह्याच उच्चत्तम प्रेमावर माझी श्रद्धा आहे. वाळलेल्या गवताप्रमाणें पटकन् पेटणारें नि क्षणांत विझणारें तें क्षणभंगुर वासनामय प्रेम मला नको, जें प्रेम उदात्त आहे, विशुद्ध आहे, उत्कंठेचें आहे, जें प्रेम आत्म्याच्या रोमारोमांत भरून राहतें नि कार्य करीत असतें, त्या प्रेमाची मी आराधना नि उपासना करीत असतों. त्याची मी वाट पहात आहे, आशा करीत आहे. आणि मरेपावेतों मला जरी एकाकी रहावें लागलें तरी माझ्या मनानें क्षुद्र व संकुचित प्रेमक्यानें संतुष्ट होण्याऐवजीं, माझीं स्वप्नें माझ्याबरोबर संपलीं तरी हरकत नाहीं.

४६

कोणती एक गोष्ट पावलोपावलीं मला भिववीत असेल, कोणत्या गोष्टीचा बागुलबोवा मला सतावीत असेल, तर ती गोष्ट म्हणजे जबाबदारी ही होय. स्वतःच्या चुकांमुळें सहन करायला लागणें यासारखी नामुष्कीची गोष्ट दुसरी कोणतीहि नाहीं. अशा माणसाला आशाच नाहीं. अशा माणसाला होणारें दुःख अधिकच विषमय होतें. कारण त्यांत उपहास असतो. फजीती असते. सर्वांत वाईट कोणती फजीती असेल तर ती स्वतःच्या चुकीमुळें खालीं मान घालायला लागणें ही होय. बाहेरून येणारे आघात नि संकटें सहन करण्याची ताकद माझ्याजवळ आहे. परंतु स्वतःच्याच चुकांनीं जें अपरिहार्य दुःख मी माझ्यावर ओढवून घेतों, जेथें दुसरा उपाय नसतो, जेथें धड कांहीं सुधारतां येत नाहीं, तेथें माझ्या मनाची सारी शांति मी गमावून बसतों. कारण मीं माझें स्वातंत्र्य त्यामुळें नाहींसें करीत असतों, या दुःखाच्या-कल्पनेनेंहि मी वेडा होईन असें मला वाटतें. हक्क बजवायला जाईन आणि भरपूर प्रायाश्चित्त भोगावें लागेल. जगांतील माझें सधर्मकर्म एवढेंच आहे कीं

स्वतःच्या जीवनाचें शोकान्त वा सुखान्त नाटक स्वतः प्रेक्षक बनून पाहणें; आपल्या नशीबी जें कांहीं आहे तें साक्षीरूपानें बघणें, आणि ह्यापेक्षांहि त्या सुखदुःखांतील गुप्त गोष्ट म्हणजे आपणच स्वतः तेथें नट म्हणून कार्य करीत असणें-म्हणजे एकंदरींत काय ? तर जीवनांत ज्या वंचना होतील ज्या निराशा पदरीं येतील, जे मायामय पसारे दिसतील, त्यांना फारशी किंमत न देणें; समोर बसून आपणच आपणांला नाटकांत काम करतांना बघत आहोंत असें मानणें; किंवा मृत्यूच्या पलीकडच्या स्थितींतून या जीवनाकडे पाहणें, हें माझें मुख्य स्वधर्मकर्म आहे. माझ्या दैनंदिन उद्योगांत माझा आत्मा नसतो. त्यांत मला ना रस, ना आनंद. तरीहि ती भूमिका मला पार पाडावी लागते. परंतु माझी वृत्ति त्या कवीप्रमाणें असतें. महत्त्वाच्या वाटणाऱ्या त्या त्या पात्रांशी त्या त्या वेळेस कवि खेळत असतो; परंतु त्या पात्रांना माहीत नसणाऱ्या सर्व गोष्टी त्याला मात्र माहित असतात. मोठी चमत्कारिक अशी ही स्थिति आहे. आणि दुःखानें जेव्हां माझी क्षुद्र भूमिका मला पार पाडणें भाग पडतें, तेव्हां तर अधिकच वेदना होतात. काव्यांत फार रमूं नको. जरा खालीं ये. तुझी नोकरी चाकरी आहे तें विसरलास वाटतें. असें जेव्हां कोणी दरडावून सांगतें आणि काव्यप्रांतांतून खालीं यावें लागतें, तेव्हांची वेदना खरोखर असह्य असते. शेक्सपिअरला या गोष्टीचा पुष्कळदा अनुभव आला असला पाहिजे. आणि हॅम्लेटनें कोठेंतरी या गोष्टींचा उल्लेख केलाच असेल. जर्मन लोकांच्या स्वभावांत ही गोष्ट आहे. जर्मन विचारवंतांना प्रत्यक्षांचा तिटकारा वाटतो. सार्वजनिक जीवनाची जणुं त्याना घाण वाटते. परंतु अशा रीतीनें आपले पंख मिटून आपल्या व्यक्तिगत घरट्यांत जाऊन बसणें म्हणजे अधःपात नाहीं कां ? हा धार्मिक विनाश नव्हे का ? मनुष्य पतंगाप्रमाणें आहे आणि दुःख ही त्याची दोरी आहे. हा दुःखरूप दोरा पुन्हां पुन्हां त्याला खालीं न खेचता, तर मनुष्य झटकन उड्डाण करून वर गेला असता. ईश्वराचे लाडके लोक झपाट्यानें त्याच्याकडे निघून गेलें असते आणि आपणांस लाभते ना. पृथ्वीचें आकर्षण नसतें तर बलून ज्याप्रमाणें वर जात राहिलेलें असतें, त्याप्रमाणें देवाचे लाडके जीव त्या परमधामीं जाऊन कधींच खालीं येते ना.

तर मग या जगांत प्रत्यक्ष कार्य करायला जें धैर्य लागतें तें मानवानें कसें मिळवावें ? त्यानें थोडें बेफिकीर रहायला शिकावें. स्वतःच्या वृत्ति-प्रवृत्तींना स्थान द्यावें. म्हणजे या संसारांत राहणें फारसें जड जाणार नाहीं. विशेषसें सहन करावें लागणार नाहीं. आपलें मन नीट जमेल आणि जगालाहि थोडेंफार उपयोगी असें आपलें जीवन होईल.

दुसरा मार्ग म्हणजे क्षमासागर प्रभूवर जिवंत श्रद्धा ठेवून वागणें. तिसरी गोष्ट म्हणजे लहान मुलाप्रमाणें आपल्या मानवी जीवनाच्या मर्यादा आनंदानें पत्करणें. दुःखाला फार भिऊं नये; त्रासाची फिकीर करूं नये; फार हिशेबीपणा नसावा; आशा भरपूर असावी. फार खोल आणि फार दूर पाहूं नका. म्हणजे फार अवघड वाटणार नाहीं. आणि फार अवघड वाटलें नाहीं म्हणजे भयहि कमी वाटेल. चौथी गोष्ट म्हणजे जीं संकटें सोसावीं लागतील, ज्या चुका होतील. जी नुकसानी होईल, त्यांतून अनुभवाचें श्रेष्ठ असें सार काढून घेऊन शहाणें होणें. अशा या चतुर्विध मार्गांनीं जगांत कर्मे करायला आपणांस धीर येईल.

× × ×

४७

( Chrestomathic Francaise ) हें पुस्तक आणि त्याच्या आरंभीचें व्हिनेटचें मार्मिक पत्र यांचें वाचन करण्यांत एक दोन तास मोठे आनंदांत गेले. व्हिनेट हा ख्रिश्चन धर्माचा भक्त आहे तो नामवंत विचारकर्ता आहे. आणि भला मनुष्य आहे. त्याचें एक विशिष्ट स्थान आहे. तत्त्वज्ञान, धर्मशास्त्र, सौंदर्यशास्त्र इत्यादि विषयांवर त्यानें जें कांहीं लिहिलें, त्याहून अधिक चांगलें किती तरी जणांनीं लिहिलें आहे. परंतु व्हिनेटचें आचरण निष्कलंक होतें. त्याचें व्यक्तिमत्व आदरणीय आहे. त्याचें मन थोर होतें. बुद्धि कुशाग्र होती. परंतु परिस्थितीमुळें, त्याच्या गुणांचा जितका उपयोग व्हायला हवा होता,

तितका झाला नाहीं. प्रतिभासंपन्न आणि चांगला लेखक जरी तो असला तरी त्याला महान् लेखक असें म्हणतां येणार नाहीं. खोल दृष्टि, गंभीरता नि विशुद्धता हे गुण बऱ्याचशा प्रमाणांत जरी त्याच्या लिखाणांत असले, तरी मोठेपणा म्हणून जो म्हणतात तो त्याच्याठायीं नाहीं हें खरें. कारण एक तर तो वांझ पृथक्करणें फार करीत बसतो. सूक्ष्म वादविवादांत रंगतो. कोळयाच्या जाळ्याप्रमाणें सारखें विणीत बसतो. तो कुशल कारागीर आहे. त्याच्या विचारावर सटरफटर गोष्टींचाच अधिक पगडा आहे; क्षुद्र गोष्टींचें अधिक दडपण आहे. आणि म्हणून उत्कटता, अस्खलितपणा, दिव्य वाणी, कल्पना, हृदयाचा ओलावा, प्रेममय भावनांची ऊब, विशालता, या गोष्टींचा त्याच्या ठिकाणीं अभाव आहे. तो विशेषतः चिंतनशील, बुद्धिवादी लेखक आहे. स्वतःच्या बाहेरील पाहण्यास त्याला फारसा अवसर नाहीं. सद्सद्विवेक बुद्धीतील नैतिक झगडे, हें बरोबर कीं तें बरोबर याची अखंड विवंचना, आपलें चुकत तर नाहीं, असा चिरसंशय, सारखें आत्म-पृथक्करण, यांतच त्याची मति चालते. त्याच्या बुद्धिशक्तीच्या ह्या मर्यादा आहेत. व्हिनेटपाशीं भावनांचा उमाळा नाहीं; अभिजात आंतरिक जोर नाहीं; विपुलता नाहीं; कोठें नेत आहे तेंहि कळत नाहीं. म्हणून तो लोकप्रिय नाहीं. त्याचा मोठेपणा त्याच्या व्यक्तिनिष्ठेंत आहे व यांतच त्याचा कमी-पणाहि आहे. एकान्तवासांतील हा यति आहे असें वाटतें. त्याचे विचार पुनः पुन्हां धर्मावर येऊन केंद्रित होतात. ते विचार पुनः पुन्हां शुद्ध होऊं बघतात, सत्यपरीक्षेंतून जाऊं इच्छित असतात. त्याचें विचार अति उंच गेले तरी तेथेंहि संशय व चिंता बरोबर असतातच. चुकत तर नाहीं ना असा सूर तेथेंहि हळूच निघत असतो. त्याच्याजवळ नैतिक उत्साह आहे. परंतु आशांस नि नाजूक वृत्ति त्या उत्सहास फार उफाळूं देत नाहीं. चांगला जोरदार उमदा गडी, परंतु त्याची प्रकृति जरा बिघडलेली असावी, तसें व्हिनेटचें आहे. ही व्हिनेटची मी निंदा करीत आहे कीं स्तुति? व्हिनेटचें बौद्धिक सामर्थ्य स्वतःवरच सदैव प्रतिक्रिया करीत असतें असें जर म्हटलें तर त्याच्या बुद्धीचा तो गौरव होईल कीं अपमान? व्हिनेटला, त्याचप्रमाणें अधिक विचार करायला लावणाऱ्या लेखकांना जर कशाची जरूर असेल तर स्वतःचा

विसर पाडायला लावणारी प्रेमळ वृत्ति. ज्ञानतंतूच्या भोंवती जरा अधिक दणकट स्नायु, व्यक्तिविषयक वर्तुळाच्या भोंवती ऐतिहासिक नि बौद्धिक वर्तुळें, यांची जरूरी असते. हे गुण असते तर व्हिनेटचें जीवन लिखाण अधिक प्रभावी असतें. त्याची लेखनशैली समृद्ध आहे, तिच्यांत विविधता आहे; नाना विचार नि कल्पना आहेत; परंतु सामर्थ्याचा अभाव आहे. आत्मपृथक्करण कमी असतें, स्वतःपेक्षां बाह्य जगावर लेखणी अधिक खिळती, जरा लवचीक असती, तर व्हिनेटची शैली थोर गणली गेली असती; भव्य वाटली असती. व्हिनेट म्हणजे मानवाच्या नि लेखकाच्या रूपानें मूर्त झालेली सद्सद्विवेकबुद्धीच होय. व्हिनेटसारख्या दोनतीन व्यक्ति ज्या समाजाला दाखवतां येतील, तो समाज धन्य होय, व्हिनेटच्या तोलाचे नसले तरी त्याच्यासारखे दोनतीन पुरुष समाजाला दाखवतां येणें ही लहानसहान गोष्ट नाहीं.

× × ×

४८

ग्रीक लोक हे आपले अमर पूर्वज आहेत. आपणांत नसलेलें असें कितीतरी त्यांच्यापासून आपणांस शिकतां येईल. ग्रीकांनीं स्वतःचे समकालीन प्रश्न जितक्या कौशल्यानें सोडविले, तसे आपण आपले सोडविले नाहींत. ग्रीकांचा आदर्श पुरुष आपला नाहीं ही गोष्ट खरी. तरीहि त्यांची प्रज्ञा, समजून घेण्याची शक्ति आपल्याहून शतपटीनें श्रेष्ठ होती असें म्हणावें लागतें. जो मानव त्यांना दिसत होता, समजत होता, त्याच्याविषयीं ते आदर दर्शवीत, पूज्यभाव दाखवीत. त्या मानवाचा विकास करण्यासाठीं, त्याला अधिक प्रगत नि उन्नत करण्यासाठीं, त्यांची धडपड असे. या गोष्टी त्यांना आपल्यापेक्षां अधिक कळत. ग्रीकांच्या शेजारीं आपण जर उभे राहिलों तर कितीतरी बाबतींत आपण केवळ रानटी आहोंत असें

दिसेल. १८४३ मध्यें विरेंजर हीच गोष्ट माझ्याजवळ बोलले. शिक्षण, वक्तृत्व सार्वजनिक जविन, कला, काव्य, इत्यादि बाबतींत आपण अप्रगल्भ नि जंगली आहोंत. हाताच्या बोटांवर मोजतां येण्याइतक्या थोर विभूति आपणांत जन्मायला कोट्यावधि लोकसंख्येची आपणांस जरूर असते, परंतु ग्रीक लोक हजारच असले तरी तेवढ्यांतच कितीतरी असामान्य व्यक्ति निपजत. आपणांमध्यें लाखोंत एखादा निघतो. पूर्ण पुरुष, सर्वांगीण विकास झालेलीं माणसें समाजांत किती निर्माण होतात, यावर जर त्या समाजाच्या सुधारणेची परीक्षा करायचें ठरविलें तर आपण अनुत्तीर्ण होतों. ही कसोटी लावूं तर ग्रीक आपल्यापेक्षां सहस्र पटीनें अधिक पुढारलेले नि सुधारलेले, असें म्हणावें लागेल. आतां आपणांहून कनिष्ठ आणि कमदर्जाचे गुलाम दूर कोठें रहात नसून, कोठें सरहद्दीजवळ रानावनांत नसून, आपणांतच सर्वत्र आहेत. आपण सारेच जणूं कमदर्जाचे झालों आहोंत. गुलामांचा निराळा वर्ग करायची आतां जरूरी नाहीं, ग्रीक लोकांपेक्षां पुष्कळ चांगल्या चांगल्या गोष्टी आपण मनांत बाळगतों, परंतु आपण कृतीनें फार लहान आहोंत. मोठी आश्चर्य करण्यासारखी एक गोष्ट आहे ती ही कीं, ग्रीक संस्कृति व्यक्तिनिष्ठ नसूनहि किती तरी थोर व्यक्ती तिनें दिल्या आहेत. आपली आजची संस्कृति व्यक्तीला महत्त्व देते. परंतु समाजांतील व्यक्तीशी दशा अप्रगल्भ आणि अविकसित अशीच आहे. व्यक्तीची सर्वत्र दुर्दशा आहे, रडकथा आहे. आजकालचें जें ध्येय आहे, ज्याच्यासाठीं सारे खटाटोप चाललेले दिसतात, त्या ध्येयाच्या विपरीतच परिणाम सर्वत्र दिसून येत आहेत; असें कां व्हावें ?

आपल्या नसांत पुष्कळ रानटी रक्त आहे. प्रमाणबद्धता, एकतानता, सहृदयता, सुभगता ह्या गोष्टींचा आपणांत अभाव आहे. खिश्चन धर्मानें बाह्य जविन नि आंतर जीवन, पृथ्वी नि स्वर्ग, नरक नि नंदनवन अशी विभागणी केली. मानवी ऐक्याची ही विभागणी खिश्चन धर्मानें कां बरें केली ? ही विभागणी करून जास्त गंभीर, अधिक सत्यमय अशी पुनर्रचना करण्याचा खिश्चन धर्माचा हेतु होता, परंतु हें प्रचंड कार्य खिश्चन धर्माला अद्याप पुरें करतां आलें नाहीं. ही केलेली विभागणी, पाडलेला हा फरक,

या गोष्टी ख्रिस्ती धर्माला पचवतां आल्या नाहींत. ख्रिस्ती धर्म खरी माणुसकी अजून शिकला नाहीं. तेथें वर, येथें खालीं, पाप नि पुण्य. यांच्या घोटाळ्यांतच हा धर्म अजून गोंधळलेला आहे. ख्रिस्ती धर्म ख्रिस्ताच्या अंतरंगांत अद्याप शिरलाच नाहीं. ख्रिस्ती धर्म अद्याप गुन्हेगाराप्रमाणें उभा आहे. आपण पापात्मे आहों, हेंच तो पटवित आहे. ईश्वराजवळ अजून जाणें नाहीं, आनंद नाहीं. सारा सुतकी प्रकार. ही धार्मिक स्थिति झाली.

इकडे, सामाजिक दृष्टीनें पाहिलें तर श्रमविभागणीस सीमाच राहिली नाहीं. शिक्षण देण्याची आपली पद्धतीहि मूर्खपणाची नि अप्रगल्भ अशी आहे. मनुष्याची सर्वांगिण वाढ म्हणून होत नाहीं. दारिद्र्याचे नि बेकारीचें प्रश्न आ पसरून उभे आहेत. आपण गुलामगिरी नाहींशी केली. परंतु श्रमाचा प्रश्न आपण सोडवलाच नाहीं. श्रमजीवींचा, कामगारांचा प्रश्न कसा सोडवायचा ? कायद्यानें आतां कोणी गुलाम नसला तरी प्रत्यक्ष वस्तुस्थिति काय आहे ? सर्वत्र गुलामगिरीच दिसत आहे. बहुजन वरपांगी, बाह्यतः स्वतंत्र दिसला, तरी खऱ्या अर्थानें स्वतंत्र असे कितीसे लोक आहेत ? जवळ जवळ नाहींतच. या बाबतींत तर ग्रीकांपेक्षां आपण फारच मागे आहोंत.

× × ×

४९

धुक्याच्या दिवसांना आरंभ झाला आहे. अंगांत थोडी उष्णता यावी, शरीराचें चलनवलन नीट व्हावें म्हणून बागेंत पळत प्रदक्षिणा घातल्या. पंधरा मिनिटें पळत होतों. शेवटच्या गुलाबाच्या कळ्या ! खरोखर त्यांच्याहून अधिक सुंदर असें काय आहे ? तशींच स्ट्राबेरीची तीं नाजुक कडांचीं पानें, धुक्याची त्यांच्या भोंवतीं रमणीय वेलबुट्टी; आणि देवदाराच्या हिरव्या गार फांद्यांतून चमकणारीं, लोंबणारीं कोळ्यांची नाजुक जाळीं; जणुं जरींची तीं नाजुक नि रमणीय नृत्यमंदीरेंच; मोत्यांच्या भुकटीचें जणुं तेथें गालिचे काढलेले आहेत; हजारों दंवमय धाग्यांनीं सर्व बाजूंनीं

त्यांचा आधार दिलेलं, तणावे दिलेलें दिव्याच्या सांखळया असाव्यात त्या-प्रमाणें, ते धागे दिसत होते. गलबताला नांगराचा आधार त्याप्रमाणें खालूनहि हजारों तंतूंनीं त्यांना टेंके दिले होते. हवेंतील ही छोटीं छोटीं तंतुमय मंदिरें एकप्रकारचें जरीचें विश्व जणूं तेथें निर्माण करीत होतीं. सारें कल्पनामय वाटत होतें. आणि पहाटेच्या ताजेपणाची हवा पुन्हां त्यांत मिसळलेली, उत्तरेकडील काव्यसृष्टि माझ्या डोळ्यासमोर उभी राहिली, आइसलंड वगैरे भागांतील झुळका माझ्या भोंवतीं आहेत असें वाटतें. स्वीडनचें वातावरण सभोंवतीं उभें आहे असा भास झाला. उत्तरेकडील तीं सारीं दंतकथात्मक काव्यें, त्या कल्पनारम्य अद्भुत कथा, सारें समोर दिसूं लागलें.

हिवाची नि धुक्याची ती सृष्टि; अलौकिक स्वयंभू प्रज्ञेची नि समाधीची सृष्टि, ज्या सृष्टींत सूर्यापासून ऊब न मिळतां हृदयापासून मिळत असतें, जेथें सृष्टीपेक्षां मनुष्याला अधिक महत्त्व असतें, जेथें मनुष्याकडें अधिक लक्ष जातें, असें तें विशुद्ध व जोरदार जग; जेथें भावनापेक्षां, संवेदनापेक्षां इच्छाशक्ति अधिक कार्य करते व उपजत प्रवृत्तीपेक्षां विचाराला अधिक प्राधान्य असतें, असें जग–थोडक्यांत जर्मनीची नि उत्तरेकडील सर्व सृष्टि-सारें हळुहळु माझ्या मनांत जागृत झालें. माझी सहानुभूति या काव्यस्मृती-कडे वळली. हे सारें काव्य उत्साहवर्धक आहे. शक्तिवर्धक, नैतिक रसायन मिळावें तसा माझ्या मनावर परिणाम झाला. ही सारीं कल्पनाशक्तीची लीला आहे. देवदार वृक्षाची एखादी लहानशी फांदी, कोळ्यांची दोनचार जाळींहि अनेक युगें नि राष्ट्रें कल्पनाशक्तीसमोर उभीं करायला पुरे असतात.

× + ×

५०

आमच्या धर्मशास्त्रांतील, ख्रिस्ती धर्मांतील पुष्कळशा गोष्टींना मी फांटा देत असतों. ख्रिस्ताकडे अधिक सुकरतेनें सहजपणें मला जातां यावें म्हणून हें मी करीत असतों. माझें तत्त्वज्ञान असें करायला मला प्रतिबंध

करीत नाहीं. माझें तत्त्वज्ञान "तत्त्वज्ञान कीं धर्म" असा सवाल मला करीत नाहीं. धर्माचा अनुभव आहे का, धर्माचें स्वरूप समजलें आहे का, असा प्रश्न माझें तत्त्वज्ञान मला करीत असतें, एखाद्या धर्माचा मी आहे असें म्हणणें निराळें आणि त्या धर्माचा अनुभव येणें निराळें, एकाद्या धर्माचा आहे म्हणणें निराळें आणि त्याचा अर्थ नीट समजणें ही गोष्ट निराळी. वस्तूचें स्वरूप नीट समजावें, सत्याची नीट जाणीव व्हावी, अनुभूति यावी, ह्यासाठीं तत्त्वज्ञान मला हवें आहे. तत्त्वज्ञान निसर्गाला, मानवाला किंवा ईश्वराला निर्मीत नसतें; तर त्यांना समजून घेण्याचा त्यांना शोधायचा प्रयत्न करीत असतें. तत्त्वज्ञान म्हणजे जाणीवेनें स्वतःचें व स्वतःमधील सर्व गोष्टींचें सम्यक्ज्ञान करून घेणें, त्याचा उलगडा करणें. आणि आपल्या या जाणीवेंत नवजीवनांचीं, पुनरुद्धाराची, मोक्षाची म्हणजेच खिश्चन धर्माच्या अनुभूतींचीं स्वप्नें असतील; या गोष्टी, या कल्पना जर जाणीवेंत असतील तर त्या समजून घेणें हें तत्वज्ञानाचें काम आहे. खिश्चन जाणीव म्हणजे धर्माच्या जाणीवेचें स्वरूप होय, आणि धार्मिक जाणीव आपल्या जाणीवेचें महत्वाचें अंग असते.

× × ×

५१

चूक जितकी खरी तितका धोका अधिक.

× × ×

५२

तुम्हांला जें हवेंसें वाटतें, त्याविषयीं दोनदां विचार करा. परंतु पाहिजे असणारी वस्तु सौंदर्यविषयक असेल तर एकदांच विचार करा.

× × ×

५३

आपण त्याच गोष्टी समजूं शकतों, ज्या मुळांत आपणांमध्यें असतात.

× × ×

५४

व्यवहारावरूनच शक्याशक्यतेचें माप करायचें असतें. व्यवहारज्ञानांत अनुभव आणि दूरदर्शीपणा या दोन गोष्टी असतात. जीवनाच्या बाबतींत हिशेबी असणें म्हणजेच व्यावहारिक ज्ञान.

× × ×

५५

किती विविध दृष्टींनीं मनुष्य पाहूं शकतो, किती विविध क्षेत्रांत त्याची निरंकुश गति चालते, यावरून मनुष्याचें बुद्धि वैभव, त्याच्या मनाची श्रीमंती ओळखावी.

× × ×

५६

आपल्या शेजाऱ्यापेक्षां आपण अधिक स्वतंत्र आहोंत असें वाटणें हें टीकाकाराचें पारितोषिक होय.

× × ×

५७

विनय म्हणजे मनांतील गुढतेचें लक्षण नि रक्षण. विनयाच्या उलट जी वृत्ति असते तिच्यावरून विनयाचें स्वरूप अधिक नीट समजून येतें. लाजाळूपणा किंवा विनय याचा उगम कशांत आहे? आपल्या स्वभावांत जें कांहीं गुप्त असतें तें कोणाला कळूं नये, असें व्यक्तिनिष्ठ माणसाला वाटत असतें. आपलें स्वरूप, आपल्या मनांतील गुप्त गोष्ट जगाला कळूं नये, अशा प्रकारची अस्पष्ट जाणीव, अर्धवट जाणीव म्हणजे विनय होय. आणि आपल्या जीवनांतील अत्यंत गंभीर नि गूढ अशा गोष्टी, तितक्याच मोलाच्या गहन गंभीर नि गूढ गोष्टी दुसऱ्यापासून कळल्याशिवाय सांगणें म्हणजेच अविनय होय.

× × ×

५८

तुम्हांला लहान मुलांवर सत्ता गाजवायची असेल तर आधीं स्वतःचे स्वामी व्हा. मुलांवर देखरेख करायची असेल, त्यांना वळण लावायचें असेल, तर आधीं स्वतःवर देखरेख करा, स्वतःला वळण लावा, मुलाला तुमच्यामधील वासनाविकार, तुमच्यामधील असंयम दिसतां कामा नयेत. तुमचें दौर्बल्य मुलांना दिसलें तर त्याचा अनाठायी फायदा करून घेतल्याशिवाय ती राहणार नाहींत! आपल्यावर देखरेख करणारांना आपण फसवूं शकणार नाहीं किंवा सतावूं शकणार नाहीं, असें मुलांना नक्की समजून आलें पाहिजे, तरच आपणांवर देखरेख करणारे आपल्याहून थोर आहेत, श्रेष्ठ आहेत, असें मुलें मानतील. आणि मगच आपण दाखविलेल्या कनवाळूपणाला मुलें किंमत देतील. कारण तीं आपणांस मान देत असतात. आपल्या दयाळुपणाविषयीं त्यांना मग आदर वाटेल. आईला मनांत असें वाटलें पाहिजे कीं, माझ्या मुलाचा सूर्य म्हणजे मी. ज्या सृष्टींत कधींहि

बदल होत नाहीं, जी सदैव तेजस्वी नि प्रसन्न असतें, अशी मुलांची सृष्टि म्हणजे मी. लहान बालक तर अल्लड असतें; त्याला शान्ति नसतें; तें क्षणांत पडतें, क्षणांत हंसतें; त्याचें मन हळुवार असतें; त्याच्या भावना प्रबळ असतात, परंतु क्षणिक असतात, त्याच्या मनांत वाटेल तेव्हां वादळें उठतात. असें हें लहान मूल नवीन प्रकाश, प्रेम, धीर, शान्ति यांचा ठेवा घ्यायला आईकडे येत असतें. मुलाला या सर्व गोष्टींचा नीट पुरवठा करणारी आई असली पाहिजे. तिनें स्वतःची ही जबाबदारी ओळखायला हवी, आई म्हणजे अधिकार, चांगुलपणा, कायदा. बाळपणांत मातेच्या रूपानें ईश्वरच मुलाला मिळत असतो. आई लहरी असेल तर ती विश्वाची आईहि अशीच लहरी असेल, असें मुलाला वाटेल. आई भांडखोर असेल तर देवहि भांडखोर असतील, असा ठसा मुलाच्या मनावर उमटेल. मुलाचा धर्म आईबापांवर अवलंबून आहे. आईबाप जें सांगतात, शिकवितात त्यावर नसून, तीं कशीं वागतात यावर अवलंबून आहे. आईबापांच्या जीवनांतलें जें एक ध्येय कळत वा न कळत मुलांना दिसून येत असतें, त्याचा स्पर्श त्यांच्या हृदयाला होत असतो. आईबाप जे शब्द उच्चारतात, ज्या धमक्या देतात, ज्या शिक्षा करतात—आईबापांच्या भावनांचे उद्रेक—हें सारें मुलांना मेघगर्जनेप्रमाणें वाटतें, त्यांना गंमत वाटते. आईबाप कोणत्या गोष्टीला महत्व देतात, कशाची पूजा करतात, हें मुलांची उपजत वृत्ति समजून घेते, जाणून घेते.

आपणांला असें असें आपण व्हावें, असें वाटत असतें. परंतु तुम्हीं काय व्हायची इच्छा करतां, इकडे मुलांचें लक्ष नसून तुम्हीं प्रत्यक्ष खरोखर काय आहांत, इकडे त्यांचें डोळे असतात. मुलें तुमचें मन, तुमचें रूप बरोबर ओळखतात. तीं मोठीं मार्मिक परीक्षक असतात. मुलांना मनुष्यस्वभावाचें चांगलेंच ज्ञान असतें. मुलें आपली ही शक्ति सर्वांच्या बाबतींत शक्य तों लावून बघत असतात. मुलें म्हणजे अतिहुशार नि सूक्ष्मदृष्टि मुत्सद्दी. सभोंवतालच्या प्रत्येक माणसाचा त्यांच्यावर कळत वा नकळत परिणाम होत असतो. आणि स्वतःच्या स्वभावानुसार सभोंवतालच्या परिस्थितीचें प्रतिबिंब त्यांच्या जीवनांत पडत असतें त्या सभोंवतालच्या परिणामांना तो

आपल्या प्रवृत्यानुसार बदलून, रंगरूप देऊन घेत असतो. म्हणून शिक्षण-शास्त्रांतील पहिलें तत्व हें आहे कीं, आधीं स्वतःला सुधारा, शिकवा, वळण लावा. मुलांची इच्छाशक्ति जर तूं ताब्यांत घेऊं इच्छित असशील तर स्वतःच्या इच्छाशक्तीचा आधीं स्वामी हो !

× × ×

५९

प्रभातकाळची वृत्ति नि सायंकाळची वृत्ति यांतील फरक पाहून पुष्कळ वेळां मला विस्मय वाटतो. सायंकाळीं जे विचार किंवा विकार मनांत प्रामुख्यानें उद्भवतात, त्यांचा प्रभातकाळीं मागमूसहि नसतो. प्रभातकाळीं चिंतनशील असें मन असतें. तें देवाजवळ असतें. स्वार्गाजवळ जातें. परंतु सायंकाळीं दिवसभरच्या यतायातींनीं आपण थकून गेलेलों असतों. मनावर अपार ताण पडलेला असतो. आपली शक्ति जणूं संपत आलेली असते. परंतु पहांटेच्या वेळेस रात्रीच्या झोपेनंतर आपण शांत झालेलों असतों. आपण एखादा निश्चय करून तो प्रभातकाळीं व सायंकाळीं तराजूंत घालून पहावा. आपल्या मानसिक आंदोलनाची सरासरी काढून चूक शक्य तितकी कमी करण्याची जर इच्छा असेल तर आपण आपला विचार, आपला संकल्प प्रभातकालीन नि सायंकालीन प्रकाशांत पारखून, मोजून घ्यावा. आपल्या आंतरिक जीवनाचाहि नियमित आलेख निघत असतो. वासनाविकारांचीं कितीहीं वर वादळें उठलीं, तरी या क्षणिक उत्पातांनीं फारशी अंदाधुंदी न माजतां आपल्या अंतरंगांतलि बॅरॉमीटरचा बरोबर फोटो निघत असतो. प्रत्येक जीवात्म्याची विशिष्ट हवा आहे. त्या त्या विशिष्ट वातावरणांत तो असतो. किंबहुना प्रत्येक जीव म्हणजेच एक विशिष्ट हवामान आहे, असें म्हटलें तर अधिक बरें. आत्म्याच्या सर्वसामान्य हवामानांत व्यक्तिगत आत्म्यानें स्वतःच्या वैयक्तिक हवामानासंबंधीं बोलणें प्राप्त असतें. म्हणून पृथ्वीवरील प्राणिमात्रांचीं कार्यें नि व्यापार यांचें शास्त्र जोंपर्यंत नीट विकसित

झालें नाहीं, तोंवर मानसशास्त्र अपुरेंच राहणार. प्राणिमात्रांचीं कार्यें, त्यांचे व्यापार, यांच्या शास्त्राला पृथ्वीचें सृष्टिशास्त्र असें अपुरें नांव कधीं कधीं देण्यांत येत असतें.

× × ×

६०

आज सकाळीं एक गोष्ट मला समजून आली; ती ही कीं एकादी गोष्ट अशक्य असें जेव्हां आपण म्हणतों, तेव्हां तें आपण आपल्या दृष्टीनें म्हणत असतों. विकारांच्या भाराखालीं दडपलेलें आपलें मन काल्पनिक संकटें उभीं करीत असतें. आणि त्यामुळें अशक्य शब्द उच्चारून आपण थांबतों, थबकतों. परंतु तुमचे विकार पळवून लावा, म्हणजे पर्वतप्राय संकटांची ही मृगजळें क्षणांत नाहींशीं होतील ! मृगजळें निर्माण करण्याची आपणांत जी एक शक्ति वा प्रवृत्ति असते, तिच्यामुळें आपणच आपणांस फसवीत असतों, मोहांत ढकलीत असतों. मृगजळें निर्मिण्याची ही वृत्ति ही एक नैतिक चमत्कृति आहे आणि तिचा नीट अभ्यास करणें आवश्यक आहे; उचितहि आहे. खरें म्हटलें तर आपणच आपली भलीबुरी सृष्टि निर्माण करीत असतों. आपलें आध्यात्मिक जगत्, आपले देवदानव, आपलीं भुतेखेतें, धोके, संकटें-साऱ्यांचे आपणच विधाते असतों. जें मनांत स्फुरतें तें आपण बाहेर मूर्त करतों. कवीला सारेंच आश्चर्यकारक वाटत असतें. संताला सारें दैवी दिसत असतें. धीरोदात्त पुरुषाला सारें धीरोदात्त दिसत असतें. परंतु दुबळ्या क्षुद्राला सारें तुच्छ नि हीन, दुःखमय नि कुरूप असें वाटत असतें. दुबळा मनुष्य स्वतःभोंवतीं स्मशान निर्मीत असतों. तर कलावान् स्वतःभोंवती स्वर्ग निर्मीत असतो. संत स्वर्ग निर्मितो; असंत नरक उभा करतो. सारांश, जो तो आपल्या प्रकाशांत पाहतो. आपण सारे आपलींच स्वप्नें पाहणारे आहोंत. आपणच आपलें स्वरूप वस्तूंत पहात असतों. नकळत आपणच आपणांस शासन करीत असतों. आपण आपणांस

पारितोषिकहि देत असतों. आपणांत बदल झाला म्हणजे सारें बदललें, असें आपण समजतों.

आपलें मन, आपला आत्मा हीं निष्क्रिय नसून सदैव कार्यव्यापृत असतात. या कर्माची आपणांस जाणीव असते. तें कर्म म्हणजे आत्म्याच्या नि मनाच्या अनंत नि अखंड चाललेल्या कर्मांचा एक अल्प अंश असतो. सगळीं मानसशास्त्रें नि नीतिशास्त्रें यांचा पाया या गोष्टींत आहे. मनुष्य स्वतःचें आंतरिक जगच बाहेर निर्मीत असतो. स्वतःचें शासन करीत वा स्वतःला धन्यवाद देत स्वतःच्याच आंतरसृष्टिला बाहेर मूर्त करून मनुष्य आपल्याभोंवतीं नानाप्रकारचीं बंधनें घालून घेत असतो. हें विश्व दैवी स्वरूपाशीं एकरूप असावें असें वाटतें आणि आपणांस प्राप्त झालेल्या परिपूर्णतेच्या प्रमाणांत आपणांस दैवी शक्तीच्या पूर्णत्वाचें आकलन होत असतें, आंतरिक निष्पापतेचा नि निर्मलतेचा मोबदला म्हणजेच अंतःस्फूर्ति, अंतर्ज्ञान होय. चांगुलपणाचा परिणाम म्हणजेच शास्त्र. एक नवीनच चमत्कारविद्या जन्माला येते. जेथें वस्तूचें अंतरंग पूर्णपणें दैवी होतें, अशी एक किमया उपलब्ध होते. अत्यंत निर्दोष आणि नैतिक अशी ही स्थिति असते. या स्थितींत आत्म्याचें केवळ सोनें होतें. सारी पार्थिवता जणुं दैवी होतें.

उन्हाळ्यांत मला जीं व्याख्यानें द्यावयाचीं आहेत, तीं याच विषयावर देईन. या गोष्टींत खरोखर केवढा अर्थ भरून राहिला आहे ! आंतरिक शिक्षणाचा अखिल प्रांत येथें आहे. आपल्या जीवनांतील सर्व गूढ नि अप्रमेय अशा गोष्टींचा येथें विचार आहे. सृष्टीचा आत्म्याशीं संबंध, ईश्वर व ही सारी सृष्टी यांचा मानवाशीं संबंध, थोडक्यांत सारींच शास्त्रें येथें येतात. विश्वाची उत्क्रांति, धर्मशास्त्र, दंतकथा नि आख्यायिका यांचें स्वरूप, मनाची वाट नि विकास, सर्वांचा येथें उहापोह आहे. एका शब्दांत म्हणायचें म्हणजे जें कोडें उलगडायचा मी हजार वेळां प्रयत्न केला, परंतु हजारों गोष्टी सभोंवतीं येऊन उभ्या रहात म्हणून मी हजारों वेळां ज्या प्रश्नापासून माघारा गेलों, असा हा प्रश्न आहे, असें हें महत्तम कोडें आहे. शास्त्राचा खरा विजय येथें आहे. निर्भयपणें या खोल दरीच्या तोंडाजवळ मीं येतों

आणि आंत डोकावून पाहतों. सारें ब्रह्मांड तेथें दिसतें. या दरीची खोली अजमावणें हें कर्तव्य आहे. ईश्वर प्रेमाच्या नि प्रकाशाच्या पांघरुणांत लपलेला असतों. "तुम्ही देवदूत व्हा, आध्यात्मिक वृत्तीचे व्हा" असें तो आपणांस सांगत असतो. आपण आपल्या शक्तीप्रमाणें स्वतःला अनुभवावें, प्रभूला मिळवावें. आणि आपला दुबळेपणा, कमकुवतपणा जर कशांत असेल तर तो अश्रद्धेंत आहे, आध्यात्मिक गोष्टीबद्दलच्या भित्रेपणांत आहे, असें मला कळून चुकलें आहे.

डान्टेनें जें पाहिलें, स्वर्ग-मृत्यु-पाताळांत दृष्टि फेंकून त्यानें जें कांहीं पाहिलें, जी दिव्यता अनुभवली, एका मूर्तीच्या द्वारा, एका मूर्तीच्या रूपानें जो कांहीं त्याला साक्षात्कार झाला, त्याच्याहून अधिक शुद्धतर नि अधिक आनंददायी दिव्यतेचा साक्षात्कार मला होऊं शकेल. परंतु डान्टे हा कवि होता. आणि मला कांहीं म्हणायचेंच झालें तर थोडाफार तत्त्वज्ञानी, असें म्हणतां येईल. कवि सर्व मानवजातीला सर्वसाधारण जनतेला आपले विचार समजावून देऊं शकतो. तत्वज्ञान्याचें तसें नाहीं तो आपले विचार दोनचार लोकांना फार तर सांगूं शकेल.

दिवस उगवला. माझ्या कर्ममय विचारांत अडथळा आला. विचारांची गति थांबली. माझ्यांतील विद्युत् गेली असें वाटलें. दिव्य चिदानंद सोडून रुक्ष अभ्यासाकडे आतां वळावें लागेल. ध्यानानंदाचा सूक्ष्म नि विशुद्ध मेवा जाऊन आतां क्षणिक वस्तूंच्या पसाऱ्यांत लक्ष देऊन बसावें लागेल. ती अनंत गंभीरता गेली नि संकुचित सृष्टि समोर उभी राहिली. परंतु याचें वाईट वाटून काय होणार ? एवढें तरी सिद्ध झालें कीं, तत्त्वज्ञानाच्या गंभीर विचारांसाठीं प्रभातकालापूर्वीचा काल हाच अधिक समुचित असतो.

× × ×

६१

आत्म्याच्या राज्ययंत्रांतहि अनियंत्रित सत्तेला महत्त्व नाहीं. एकतंत्री सत्तेनंतर सामुदायिक लोकसत्ताच तेथें येत असते. प्रातिनिधिक सत्ते-

लाच हृदयाच्या राज्ययंत्रांत वाव मिळतो, प्राधान्य मिळतें. सुविचार, सद्-सद्विवेक बुद्धि, इच्छा, बुद्धि, भूत आणि वर्तमान, जुना व नवा, आप-आपले मुद्दे मांडतात. शेवटीं गोंधळ जाऊन कांहींतरी ठरतें, व्यवस्था लागते. अंधार जाऊन शेवटीं प्रकाश येतो. मनांत येतांच करून टाकणें, असली एकतंत्री इच्छाशक्ति हीं कार्यप्रवण असते. व मनांत सारखा वादविवाद चालणें चर्चा चालणें या पद्धतीनें ज्ञान मिळत असतें. एक प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनें श्रेयस्कर. तर दुसरी विचाराच्या दृष्टीनें, शास्त्राच्या दृष्टीनें श्रेयस्कर. एका पद्धतीनें कर्म होतें, तर दुसऱ्या मार्गानें ज्ञान प्राप्त होतें.

परंतु सर्वांत उत्कृष्ट गोष्ट म्हटली म्हणजे आत्म्याच्या तीन शक्तींचा विकास होणें ही होय. सल्ला देणारा मनुष्य पाहिजेच, परंतु कर्म करणारा पार्थ व कर्मयोग शिकविणारा भगवानहि पाहिजे. मी नुसता विचारच करीत बसतों, परंतु आचाराकडे जात नाहीं. मी वादविवाद व चर्चाच अंतःकरणांत करतों. निरनिराळे मुद्दे मांडतो. परंतु निश्चित सांगणारा ज्ञाता मजजवळ नाहीं, हुकूम सोडणारा सेनापतीहि मजजवळ नाहीं.

आपल्या एकता निर्माण करणाऱ्या वृत्तीवर जर पृथक्करण करणारी वृत्ति कुरघोडी करील तर त्यांत नाश आहे. आपल्या सहजस्फूर्तीच्या विचारानें नाश झाला तर तें वाईट आहे; चिकित्सेनें जर श्रद्धेचा खून होईल तर ती चिकित्सा हानिकर आहे; पृथक्करणांतून शेवटीं जीवनच बाहेर पडलें पाहिजे. विघटनेंतून घटना निर्माण झाली पाहिजे. जर आत्म्याच्या शक्ति केवळ भेद पाडणाऱ्या व विच्छेद करणाऱ्याच असतील, जर त्या सर्व शक्तींना एकत्र करून एका ध्येयाकडे खेंचता येणार नसेल तर तें मरणच होय. आत्मा जर इकडे तिकडे खेंचला जाऊं लागला, नुसती ओढाताणच जर असेल, तर त्यांत काय अर्थ ? राजाधिराज आत्मदेव जर शक्तिहीन होईल, सर्वांचे लगाम खेंचून एका दिशेनें रथ हांकलणार नाहीं, तर हृदय प्रदेशांत सारा गोंधळ माजून राहील.

माझ्याजवळ हाच धोका आहे. जीवनांतील एकता मजजवळ नाहीं; हेतूची ऐक्यता मजजवळ नाहीं. माझ्या शक्ती, माझीं कर्में, माझे आचार

उच्चार यांच्यांत एकसूत्रता रहात नाहींशीच जणुं झाली आहे. मी विस्कळित झालेला आहे. शतखंड झालेल्या ढगाप्रमाणें आहे. मी केवळ पृथक्करण करणारा, भोंकें पाडणारा झालों आहे. विचार व पृथक्करण एवढेंच माझें काम. सूक्ष्म चर्चा करणें, मुद्दे काढणें, तर्क शक्ति चालविणें यांतच मी दंग होतों, व यांतच माझ्यां दुबळेपणाचें बीज आहे. मला निर्दोषत्व सर्वत्र पहावयाची इच्छा असते व तेंच तर मला दिसत नाहीं. विवेचक शक्तिचा मी दुरुपयोग चालवला आहे. प्रत्येक कर्म मला सदोषच दिसतें. व म्हणूनच कार्यापासून दूरदूर रहावें असें मला वाटतें. सहज मनांत येणाऱ्या भावना, विचार, हृदयांत उसळणाऱ्या वृत्ति, ओठांवर येणारे शब्द यांच्यावरचा विश्वासच माझा उडून गेला आहे. जीवनांतील साधेपणा व एकता हीं हरपून गेलीं; जीवनांतील विश्वास व सहजतां हीं लोपलीं; यामुळेंच मी कर्म करण्यास दिवसेंदिवस असमर्थ होत आहे.

सर्वज्ञ होण्याचा, निर्दोषत्व पहाण्याचा प्रयत्न सोड. सर्वविश्वाला, परिपूर्णतेस गांठण्याचा हेका सोड, स्वतःला थोडी मर्यादा घालण्यास आतां शीक, कांहींतरी निश्चित गोष्ट आतां ठरव व समाधान मानावयास शीक; कांहींतरी निश्चित काम ठरव. निश्चित कार्यक्रम आंख, जें तुझें खरें स्वरूप आहे तें दाखविण्यास कां भितोस? खरें तुझें रूप तें प्रकट करण्याचें धैर्य दाखव, जें तुझ्यांत नाहीं ते न दाखविण्याची सुजनता व सत्यता शीक; जें आपणांस साधावयाचेंच नाहीं, त्याच्यासाठीं कां बरें अट्टाहास? त्या बाबतींत शांत रहावयास शीक. स्वतःचें जें व्यक्तित्व त्याच्यावरच विश्वास ठेव. आत्मविश्वासाच्या अभावामुळें तुझा नाश होत आहे, अनिश्चितपणामुळें तुझें नुकसान होत आहे. स्वतःवर विश्वास ठेव, ईश्वराला शरण जा; सारखा स्वतःचा विचार करीत बसणें या गोष्टीस रजा दे. "श्रद्धा ठेव तूं सुखी होशील; तुझी वेदना शमेल." अश्रद्धा म्हणजे मरण होय; पदोपदीं निराश होणें व स्वतःला कमी लेखणें म्हणजेहि अश्रद्धाच होय.

सुखाच्या दृष्टीनें पाहिलें तर जीवीताचें कोडें सुटणें अशक्य आहे. कारण आपल्या थोर आकांक्षाच आपल्याला दुःखी करतात, आपल्या समाधानाच्या आड येतात. कर्तव्याच्या दृष्टीनें पाहिलें तरी तोच प्रश्न उभा राहतों.

कर्तव्याच्या पालनानें समाधान होतें. शांति होते. परंतु सुख मिळत नाहीं. ईश्वरी प्रेम, दिव्य, निरपेक्ष प्रेम, अत्यंत पवित्रतम वस्तूंचें प्रेम, ईश्वराला मिळवून घेणें, श्रद्धेनें आपल्या जीवनांत त्याला एकरूप करणें यानेंच हा प्रश्न सुटेल. यज्ञ म्हणजेच आनंद झाला पाहिजे. त्यागांतच चिरंतन, उत्तरोत्तर वर्धमान होणारा अमर आनंद वाटला पाहिजे. हा आनंद कंद मिळाला म्हणजे आत्म्याला कायम टिकणारें व कधीं न संपणारे खाद्य मिळालें.

× × ×

६२

आपल्या जीवनाचें स्वरूप कशानें बदलतें, कसें बनतें हें कांहीं सांगतां येणार नाहीं. एखादी साधी क्षुल्लक चूक होते व तिचा मोठा वृक्ष होतो व त्यावर आपण व इतर फांशीं दिले जातो पावसाच्या एका थेंबानें झाडाला फळ यावें, त्याप्रमाणें एकाद्या क्षुल्लक चुकीनें मरण पदरांत येतें. आपण मनांत योजीत असतों एक व होतें निराळेंच. आपण आशीर्वाद देऊं इच्छितों, परंतु तो शाप ठरतों. कधीं काय होईल याचा नेमच नाहीं. भवित-व्यता-नागीण जीवनाला विळखा देऊन बसली आहे. बारीकशा गोष्टी साठींही ती चावा घेते. आपले सारे बुद्धिवाद व योजना फोल ठरतात. दुर्दैवाची लीला अगाध आहे. आपणांस स्वतःच्या हातानें दुःख आपल्या पात्रांत वाढायला लावते; मनांतून दुर्गुणी व्हायचें नसून आपणांस व्हावयास लावते. शेण खाण्याची इच्छा नसून आपण आपल्या हाताने शेण घेऊन खातों ! आपल्यामधील वासनांचीं गिधाडें मारून टाकावीं, पिटाळावीं अशी आपली इच्छा असतांही, त्याना आपण घरटीं बांधून देतों, त्यांना आपले लचके तोडूं देतों. आपण पदोपदीं रडतों व पडतों-पडतों व रडतों. चूक करतों व प्रायश्चित्त घेतों. आपल्या साऱ्या शक्ति, सारे सद्गुण सारे गुणधर्म, साऱ्या मनोवृत्ति या सर्वांचा पडणें व रडणें या भट्टींत स्वाहाकार होत असतों. आपण म्हणजे कोणी नाहीं केवळ परतंत्र आहोंत,

प्रचंड शक्तीच्या हातांतील खेळणें आहों असें वाटूं लागतें. आपण परावलंबी आहोंत, बाहुलें आहोंत व सृष्टीचा कायदा सर्वंकष आहे. ही गोष्ट हृदयावर ठसते; सृष्टिनियमाची ईश्वरीइच्छेची अभेद्यता व अभंगता प्रतीत होते. त्या ईश्वरी शक्तीवर श्रद्धा जर असेल तर शिक्षा सौम्य वाटते, दुःख हलकें होतें. जगन्नाथाच्या रथाचीं चाकें प्रथम आपला चुराडा उडवतातच, कारण योग्य न्याय त्याला द्यावयाचा असतो, मानव जातीला उदाहरण घालून द्यावयाचें असतें, आणि मग रथांतून तो जगन्नाथ हात पुढें करतो, आपणांस धुळींतून उठवतों, त्याच्या शिक्षेखालीं, त्याच्या न्यायाच्या पाठीमागेंही प्रेम आहे हें तो दाखवून देतो. लाल लाल झालेल्या दृष्टीच्या पाठीमागें प्रेमाचा सागर उचंबळलेला दिसतो. पश्चात्तापाच्या आधीं क्षमा होत नसते व नम्रतेशिवाय पश्चात्ताप नाहीं. नम्रता हा पश्चात्तापाचा आरंभ आहे. जोंपर्यंत आपणांस आपला अपराध क्षुद्रच दिसतो, जोंपर्यंत आपल्या अपराधाचें चुकीचें समर्थनच मनांत वा जनांत आपण करीत असतों. आपला अपराध दंडार्ह नाहीं असें दाखविण्याची खटपट आपण करीत असतो; जोंपर्यंत आपण आपणांस होणाऱ्या शिक्षेबद्दल कुरकुरच करतों व ईश्वर हा परमनिष्ठुर म्हणतों-जोंपर्यंत दैवाच्या विरुद्ध हृदयांत बंड आहे, ईश्वराच्या निर्दोष न्यायाबद्दल हृदयांत शंका आहे, तोंपर्यंत खरी नम्रता, खरा पश्चात्ताप नाहीं. ज्यावेळेस शिक्षा घेण्यास मान वांकवूं, त्यावेळेसच ती न मिळण्याचा संभव असतो. अंतःकरण पूर्वक ईश्वरासमोर गुडघे वांकवूं, शरणागति जेव्हां खरीखुरी असेल तेव्हांच ईश्वराची कृपा मिळेल. दुःख हें कांहींतरी कार्यासाठीं आलेलें असतें— त्याचें तें कार्य होतें— तेव्हांच ईश्वर तें दूर करतो. कसोटी होऊन गेली म्हणजे तिची उपयुक्तता संपली; उपयुक्तता संपली म्हणजेच कसोटी थांबते, तोंपर्यंत ती चालूच असते. या जीवनांतील सर्व आपत्ती सहन करण्याचा उत्कृष्ट उपाय म्हणजे—ईश्वराच्या न्यायावर व प्रेमावर श्रद्धा ठेवणें हाच होय. आपल्या सर्व दुःखांचा उगम अश्रद्धेंत आहे, नास्तिक्यांत आहे; आपल्या बाबतींत जें जें होतें तें व्हावयास नको होतें कीं व्हावयास पाहिजे होतें याबद्दल आपण साशंक असतों. जगच्छक्तीपेक्षां आपण स्वतःस शहाणे समजतों; दैववाद आपणांस आवडत

नाहीं व आकस्मिकवाद पसंत करतों. शरण जाण्यांत स्वातंत्र्य आहे— काय मना! परंतु त्याशिवाय गत्यंतर नाहीं. नम्रतेशिवाय मुक्ति नाहीं— मोक्ष नाहीं.

× × ×

६३

रोझेन क्रँट्झनें लिहिलेला काव्याचा इतिहास हा ग्रंथ दिवसभर मी वाचित होतों. अशाप्रकारें वाङ्मयेतिहासाचें भराभर विहंगावलोकन करणें फायद्याचें असतें. आपली दृष्टि पटपट अनेक व्यक्तींवर नि विषयांवर फिरत अशी जाते. त्यामुळें कंटाळा येत नाहीं. सारखें नवीनच वाटतें, ताजें वाटतें.

विषय नि विचार यांत ताजेपणा वाटतो. असा हा वाङ्मयीन अनुभव प्रसन्न असतो. वाङ्मयाच्या इतिहासाचें चिकित्सक आणि व्युत्पत्तिशास्त्रदृष्ट्या केलेलें विवेचन वाचण्यांत एक प्रकारचा माझ्यासारख्याला तरी विवक्षित आनंद वाटतो. असें विवेचन लिहिण्यांत आणि वाचण्यांत एक प्रकारचें मला आकर्षण आहे. परंतु फ्रेंच पद्धती याच्या अगदीं विरुद्ध आहे. विषयांतील मोठ्या मोठ्या शिखरांकडेच फ्रेंच पद्धतीचें लक्ष असतें. हीं शिखरें परस्पराशीं जोडायला मधून कांहीं सैद्धान्तिक विवेचन करतात. शिखरें आणि विवेचनाच्या या आधूनमधून भरलेल्या आकृति, काढलेल्या रेघा यांनीं सारें चित्र पुरें झालें असें फ्रेंच टीकाकार म्हणतील. वाढ कसकशी झाली, लोकांची अभिरुचि कशी वाढली, बदलली, सर्वसामान्य परंपरा कशी सुरू झाली, शैली कशी बनली, या सर्व गोष्टी केवळ तात्त्विक नि अमूर्त रीतीच्या विवेचनांत आढळणार नाहींत. अशा विवेचनांत एकदम फळांकडे, उत्तुंग शिखरांकडे लक्ष दिलें जातें. परंतु ती फळें मिळावीं, शिखरें उभीं रहावीं म्हणून तयारी कसकशी होत होती या गोष्टी येथें दडपून टाकलेल्या असतात. सविस्तर इतिहास येथें नसतो, तर ठळक रेषा फक्त दाखविण्यांत येतात. तेथें परिणामांची पूजा असते, केलेल्या श्रमाची, उद्योगाची उपेक्षा असते. निवडलेल्या नमुन्यांची

अर्चा असते, इतरांकडे दुर्लक्ष असतें. परंतु ही फ्रेंच पद्धती वैशिष्ट्यपूर्ण अशी आहे. रूढी, चालीरीती यांच्याविषयीं त्यांना जी आदरबुद्धी असते, तिच्याशीं या पद्धतीचा अभिजात संबंध आहे. फ्रेंचांची उपजत्वृत्ति कॅथॉलिक आहे, द्वैती आहे. दोन सत्यें ते मानतात. दोन परस्परविरोधी जगांचा ते स्वीकार करतात. आणि असें करतांना त्यांना अस्वाभाविक असें कांहीं वाटत नाहीं. ईश्वर, राजा किंवा भाषा यांच्यांत जें जें आश्चर्यकारक आहे, अज्ञेय असें आहे, अनियंत्रित असें आहे, त्या सर्वांचा सहजपणें ते स्वीकार करतात, अकास्मितांचें हें तत्त्वज्ञान आहे, परंतु त्याचीच फ्रेंचांना संवय झाली आहे. हा जणुं त्यांचा उपजत स्वभाव झाला आहे. या गोष्टीवर विश्वास आहे. त्यांचा हा प्रेमाचा धर्म आहे.

जगांत निरनिराळे सनातन विरोध आपणांस निरनिराळ्या ठिकाणीं दिसून येतात, आणि त्या विरोधांमुळें जगांत एकंदरींत समतोलपणा राहतो. रोमन लोकांत असाच एक शाश्वत विरोध आहे. रोमन लोक व्यवहारांत कुशल, परंतु जीवनाच्या तत्वज्ञानाच्या बाबतींत अगदीं बेफिकीर. याच्या उलट जर्मन लोक व्यवहारांत अडाणी परंतु तत्वज्ञानाचे थोर आचार्य.

प्रत्येक प्राणमय व्यक्ती आपल्या स्वधर्मानुसार स्वतःची परिपूर्णता करून घेऊं पहात असते. हा गूढ कायदा आहे. या कायद्यानुसार ज्या राष्ट्रांत अपरंपार चैतन्य असतें तें राष्ट्र गणिताकडे जातें; गणितांतील अभंग नियम, सिद्धान्त शोधून काढण्यासाठीं तें राष्ट्र वहात जातें. वस्तु आणि आकार यांचा शाश्वत विरोध आहे ज्यांची गणिती बुद्धि असते तें जीवनांतील गोष्टींकडे, हजारों पसाऱ्याकडे ओढले जातात. आणि संवेदनाक्षम माणसें अमूर्त सिद्धान्ताच्या अभ्यासाकडे वळतात. असे हे विरोध कां ? आपणांस आपणांमध्यें जें आहे म्हणून वाटतें तेंच आपणांमध्यें नसतें आपण अमुक व्हावें असें जें आपणांस वाटत असतें, तें आपणांस हितकारक नसतें, योग्य नसतें, साजेसें नसतें. आपण मांडलेले विचार आपणांवरच टीका करतात. कारण आपलें आचरण आपण मांडलेल्या तत्त्वज्ञानास खोटें ठरवित असतें. हा विरोध एकाअर्थी फायदेशीरच आहे. कारण यामुळें झगडा, चळवळ, हालचाल हीं होत राहतात. आणि त्यांतच प्रगतीचें बीज आहे. प्रत्येकाचें

जीवन म्हणजे अंतस्थ झगडा आहे. प्रत्येक झगड्यांत दोन विरोधी तत्त्वें, दोन विरोधी पक्ष असतात. जे सत्य आहे तें साधें नसतें. ज्याला आपण फार साधेभोळे आहोंत असें वाटतें तो सत्यापासून दूर असतो. म्हणून शेवटीं म्हणावें लागेल कीं अखंड गतिरीति सुरू आहे आणि प्रत्येक स्थिति तिच्यांतील एक क्षण आहे, परंपरेच्या अनंत प्रवाहांत ती ती स्थिति क्षणभर तेथें असते. प्रत्येक व्यक्ति म्हणजे विरोधी गोष्टींचा समन्वय आहे, असें हें प्रत्यक्ष विरोधविकासी तर्कशास्त्र आहे. व्यक्तींच्या अनंत रांगेतील त्या त्या व्यक्तींचें स्वरूप समजून घ्यायला या विरोध विकासी पद्धतीचा अवलंब करायला हवा. गतींतच समतोलपणाचें उत्तर आहे. प्रत्येक स्थिति म्हणजे अनेक शक्तींचा समतोलपणा. प्रत्येक जीवन म्हणजे विवक्षित समतोलपणाच्या मर्यादेंत राहून कार्य करणाऱ्या परस्परविरोधी अनेक शक्तींचा झगडा. हीं दोन तत्त्वें मला कधींपासून स्पष्ट झालेलीं आहेत. परंतु मी त्यांचा जितका अधिक उपयोग करायला पाहिजे होता, तितका केला नाहीं. तीं व्यापक प्रमाणांत सर्वत्र लावून पाहिली नाहींत.

× × ×

६४

पुरुष असो वा स्त्री असो. त्यांची राष्ट्रीयता त्यांच्या जीवनांत प्रकट झाल्याशिवाय राहणार नाहीं. रशियन स्त्रियांचीं मनें त्यांच्या देशांतील सरोवरांप्रमाणें असतात. त्यांच्या ठिकाणीं बराच वेळ टिकणारी निष्क्रियता एकदम--एकाएकीं येतें. त्यांच्या एकंदर वागणुकींत पाण्याप्रमाणें चांचल्य नि आसक्ति अधिक, परंतु त्यांत अदृश्य धुक्याचीहि भीति असते. तें धुकें कधीं येईल त्याचा नेम नसतो. मास्कोच्या स्त्रियांवर त्यांच्या भौगोलिक परिस्थितीचा खोल ठसा उठलेला दिसेल. प्रखर हवामान, जीवनांतील कष्ट, अनियंत्रित पोलादी राजसत्ता, भारावलेलें खिन्न आकाश या सर्वांचा त्यांच्या स्वभावावर परिणाम झाला आहे. एक प्रकारचा उग्र

हट्टीपणा, प्राथमिक अवस्थेंतलि माणसांत असेल असा निष्ठुरपणा, क्रूरपणा, निर्दय आणि दुर्दम्य अशी रानटी कठोरता त्यांच्याठायीं दिसेल; कठोर शक्ति वज्रमान निर्धार, सारें जग बुडालें तरी चालेल परंतु शरण जाणार नाहीं अशी निग्रही वृत्ति, रानटी लोकांची अमर उपजत वृत्ति-जी अर्धवट सुधारलेल्या लोकांतहि दिसून येतें—हें सारें मास्कोच्या स्त्रियांत आढळेल. या सामर्थ्य संपन्न लोकांतील तरूण स्त्रींतहि—तिच्या निष्पाप आणि निरुपद्रवी लहरींत स्वच्छंदपणांतहि हे विशेष दिसून आल्याशिवाय राहाणार नाहींत. पराभवांतहि स्वतःची शहरें जाळून ते मागें जातील परंतु शरण जाणार नाहींत. सेनापति म्हणाला "मेलेल्या शिपायांच्या पलटणींनाहि ते चालायला लावतील!" असा हा प्रखर नि आयसी रशियन स्वभाव आहे. शरणांगति त्यांना माहीत नाहीं.

रशियन लोकांची सत्ता जर दक्षिणेकडे पसरली तर किती भयंकर राज्यकर्ते ते होतील? रशियनांची सत्ता रात्रीच्या अंधाराप्रमाणें आहे. ध्रुवाजवळील थंडी जशी कडक, त्या प्रकारची अनियंत्रित, हम करेसो कायदा राज्य पद्धती मग आपणांवर आली असती. रशियनसत्तेसारखी जुलमी राज्यसत्ता जगांत कोठें नसेल. अंधःकाराप्रमाणें गुप्त, बर्फाप्रमाणें थंड व कडक, तांब्या पितळेप्रमाणें भावनाशून्य अशी ही राज्यपद्धती पसरली असती. एक प्रकारची केवळ गुलामगिरी. ना सुख ना आधार. परंतु असें वाटतें कीं त्यांच्या या अर्धवट रानटी अवस्थेतलि त्यांचे दोष आणि गुणहि पुढें बदलतील. अनेक शतकें लागतलि. शेंकडों वर्षांनंतर हे उत्तरेकडील मानव जगांतील इतर लोकांच्या मेळाव्यांत येतील आणि केवळ विरोधी आणि भयप्रद असे राहणार नाहींत. त्यांच्या निष्ठुरतेचें सामर्थ्यांत मन परिणत होईल. त्यांच्या धूर्ततेचें सौम्यतेंत, सुभगतेंत रूपान्तर होईल. त्यांची मास्को येथील राज्यपद्धती जर माणुसकीची झाली, लोकांमध्यें भय नि तिरस्कार उत्पन्न करण्याऐवजीं, प्रेम उत्पन्न करणारी जर होईल तर किती चांगले होईल!

× × ×

६५

जर्मन लोकांचें आकारावर प्रेम असतें, परंतु त्यांची अंतःस्फूर्ति तिकडे फारशी जात नसते. त्यांची अंतःप्रेरणा बहिःसृष्टींत रमणारी नाहीं. जर्मन मनोरचना ग्रीकांच्या विरुद्ध आहे. जर्मन लोक विवेचक आहेत, पृथक्करणें करणारे आहेत. ते महत्त्वाकांक्षी आहेत, आशावादी आहेत. परंतु सौंदर्याची निर्मिति त्यांना फारशी करतां येत नाहीं. सौंदर्यावर त्यांची प्रशांत धीरगंभीर अशी अधिसत्ता नाहीं. दक्षिणेकडील लोकांत कलावित्पणा अधिक आहे. ते अधिक समाधानी आहेत. त्यांना कोणतीहि गोष्ट नीट करतां येतें. आपण वाटेल तें करूं शकूं या कल्पनेंत त्यांना अपार आनंद वाटतो. जर्मनांजवळ विचार नि कल्पना आहेत; दाक्षिणात्यांजवळ प्रत्यक्ष कृति आहे, कर्मबुद्धि आहे. जर्मन प्रदेश ढगांपलीकडच्या आकाशाकडे पाहणारा; तर दक्षिणेकडील भाग पृथ्वीला अधिक जवळचा. जर्मन लोक कल्पनांत रमतात, विचारांत आनंद मानतात. दक्षिणेकडील लोकहि विचारांत कल्पनांत रमणारे असले तरी ते विचार, त्या भावना कलांच्या रूपानें मूर्त करण्यांत त्यांना आनंद वाटतो. आणि ते अँग्लोसॅक्सन लोक ! ते मनांत अमुक एक ठरवतील आणि तसें वागतील. जाणून घेणें हा जर्मनांचा विशेष, कल्पनांशीं रमणें हा इटलीचा विशेष तर कृति हा इंग्लंडचा विशेष होय. आणि फ्रान्स सर्वांचें मिश्रण आहे. फ्रान्स सिद्धान्त मांडील, कर्म करील, बोलेल, हंसेल, खेळेल, मजा करील तिन्ही राष्ट्रांचे गुणधर्म फ्रान्स सर्वत्र नेईल. दुसऱ्या शब्दांत जर्मनी म्हणजे विचार, इटली म्हणजे कलात्मक बुद्धि, इंग्लंड म्हणजे इच्छाशक्ति, फ्रान्स म्हणजे वाणी असें म्हणतां येईल.

× + ×

६६

पुन्हां मी माझ्या गांवांतलि खोल्यांत आलों. माझ्या मित्रांचा रामराम घेऊन मी आलों. खेड्यांतील फुलें मुलें, तेथील हिरवेगार गालिचे, तेथील

आनंद व सौख्य सर्वांची रजा घेऊन मी परत आलों. कां बरे त्यांना सोडून मी परत आलों ? माझा चुलता आजारी आहे म्हणून मी आलों. परंतु दुसरीं आणखी कारणें नाहींत कां ? हो. किती तरी आहेत. जीं दोनतीन मित्रांचीं कुटुंबें माझ्यावर फार प्रेम करतात, ज्यांना मी कांहींच मोबदला देऊं शकत नाहीं, त्यांच्यावर उगीच माझा फार भार पडूं नये या भीतीनें मी आलों शिवाय माझ्या येथील ग्रंथांनीं मला परत हांक मारली. स्वतःशीं सत्य रहा. स्वतःस मोहांत पाडूं नकोस ही इच्छा—तीहि एक कारण आहे. परंतु या सर्व कारणांच्या मुळाशीं एक खोल वृत्ति आहे. मला नेहमीं भटकावेसें वाटतें. कोठेंहि आसक्त व्हावें असें मला वाटत नाहीं. परिव्राजकाची वृत्ति आहे, माझी झऱ्यासारखी वृत्ति आहे. एकाच ठिकाणीं फार वेळ रमावें असें मला वाटत नाहीं. या वृत्तीमुळेंच मी तोंडाला सुखाचा पेला लावत नाहीं तोंच तो मी खालीं ठेवतों; मित्रांकडे गेलों नाहीं तोंच परत आलों ! मनांत कोणीतरी म्हणतें "ठेव, पेला खालीं ठेव पुढें जा" कोणीतरी मला सांगते "निजूं नकोस, थांबू नकोस, रेंगाळू नकोस, या किंवा त्या वस्तूला चिकटूं नकोस. सुटा, मोकळा रहा." माझ्यामध्यें ही अशांतता आहे. मला नेहमीं हवापालट थारेपालट, बदल पाहिजे असतो असा याचा अर्थ नाहीं. ज्यावर मी प्रेम करतों, त्या वस्तूची मला शंका येतें, ज्या वस्तूनें माझें मन मोहतें, त्या वस्तूवर माझा विश्वास नसतो. सुखाची ही अशांतता आहे सुखासाठीं अशांतता आहे. काय विचित्र माझा स्वभाव! निःशंकपणें कोणत्याही गोष्टीचा उपभोगच मला घेतां येत नाहीं. ताटांतील संपेल म्हणून पाटावर बसण्याचीच इच्छा होत नसेल ! परस्पर विरुद्धता, गूढ स्वभाव ! मी म्हणजे एक कोडें आहे. कदाचित् वस्तूचा दुरुपयोग माझ्या हातून होईल. म्हणून उपयोगच करावयाचा नाहीं ! आपण पुष्कळ वेळ राहिलों म्हणून जावयाचें असें नाहीं, तर थोडा वेळ थांबलों म्हणूनच पुढें जावयाचें ! माझा स्वभाव सर्वत्र तोच आहे. भटकण्याची जरूर नसतांहि मी भटकत राहतों; मी स्वतःच्या इच्छेनेंच वनवासी राहतों; चिरंतन मुशाफर ! मला शांति मिळणें अशक्य आहे, विश्रांति अशक्य आहे. मी कोठेंच बांधीत नाहीं घरटा; कोठेंच जागा खरेदी करीत नाहीं, काम सुरू करीत नाहीं. मी पाहतों,

क्षणभर उभा राहतों, निघून जातों. हृदयांत कोणीतरी सांगतें. पुढें जा–पुढें जा.

ही जी अशांतता आहे तिला आणखी एक कारण नाहीं का ? मला सर्वत्र शून्य शून्य असें वाटतें; कांहींतरी मी हुडकतों आहें, कांहींतरी हरवलेलें सारखें धुंडीत आहे. मला खरीखुरी शांति पाहिजे आहे, पुरें निर्दोष समाधान पाहिजे आहे. शेजारीपाजारी, सखेसोबती, आप्तमित्र यांच्यावर मी प्रेम करीत कां नाहीं ? मी प्रेम करतों व जोंपर्यंत हें प्रेम जीवनांत सर्व व्यवहारांत प्रकट होत असतें तोंपर्यंत मला शून्यता भासत नाहीं. कसली उणीव राहात नाहीं. परंतु माझें सारें हृदय भरून टाकीत नाहींत ते. सर्व हृदयाचा कबजा, कायमचा कबजा ही मंडळी घेऊं शकत नाहीं, म्हणून ते माझें हृदय स्थिर करूं शकत नाहींत. जी स्त्री, जें कार्य, जें ध्येय माझ्या आत्म्याला संपूर्णपणें व्यापून टाकील त्यासाठीं मी वाट पहात आहें. मी अजूनपर्यंत माझें हृदय कोणाला देऊन टाकलें नाहीं; म्हणून मी जिवाची तगमग ज्या वस्तूनें माझें सारें हृदय भरून जाणार नाहीं, माझ्या साऱ्या हृदयाचें समाधान होणार नाहीं, त्या वस्तूला माझ्या हृदयाचें हरण मी करूं देणार नाहीं. म्हणून तर मी निष्ठूरपणें क्षणभर मोह पाडणाऱ्या वस्तूंपासून दूर होतों. मी त्या वस्तूंना मला कायमचें बांधूं देत नाहीं. मला जी सारखी भटकण्याची आवड वाटते ही माझी अस्थिरता, ही चंचलता ही अहेतुक नाहीं, लहरी नाहीं. या अस्थिरतेच्या मुळाशीं संशोधन आहे. ध्येयाचा सतत शोध, ध्येयाची आशा, ध्येयाची इच्छा, ध्येयाची चिंता–हा रोग मला आहे. शाश्वताचा शोध मीं चालवला आहे. नेति नेति करील पुर्णतेकडे डोळे ठेवून चाललों आहे.

ध्येय व व्यवहार यांच्यांत तडजोड झाली तरच जीवनाला अर्थ प्राप्त होईल. ध्येयानें आपली ध्येयता सोडूं नये, तरीहि व्यवहारासाठीं खालीं यावें, दृष्टि उंच ठेवून खालीं यावें. परंतु ध्येय व व्यवहार यांचें असें लागलेलें लग्न हें पवित्र आहे का ? हा विवाह म्हणजे सौदा नव्हे का ? हा विवाह म्हणजे हृदयांचा मिलाफ नाहीं, व्यावहारिक दृष्टीनें केलेलें लग्न, लावलेला विवाह यांत दिव्यता कोठें राहिली ? परंतु दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें तर जें ध्येय जीवनाला वाढवीत नाहीं, जीवनाला परिपूर्ण करीत नाहीं, जें ध्येय विचारांतच

राहतें, जें साऱ्या कुटुंबाला, जीवनांकुराला मारतें, तें ध्येय काय कामाचें ? तें ध्येय दुष्ट नाहीं का ? माझ्या ध्येयांत अधिक अभिमान अहंकार नाहीं का ? सामान्य लोकांच्या जीवनाप्रमाणें आपलें जीवन नसावें असा अभिमान नाहीं कां माझ्या हृदयांत ?

माझें डोकें माझ्या हातावर ठेवून मी सारखा स्वप्नसृष्टींत वावरत होतों, विचार करीत होतों, कसला विचार ? सुखाचा. जणुं पिता समजून मी ईश्वराच्या वक्षःस्थलावर मुलांप्रमाणें झोंपी गेलों होतों. आईच्या कुशींत निजलों होतों. देवाची इच्छा विजयी असो. तुहि, तुहि, तुहि.

× × ×

६७

मी उशिरां घरीं आलों. आकाश फार सुंदर दिसत होतें. त्या विशाल अंबरांत अनंत तारे चमचम करीत होतें. मध्येंच कुठें एखादे वेळेस वीज चमके. जणुं मी काव्यामृताचे पेले पीतपति येत होतों; जणुं भरल्या पोटानें आस्ते आस्ते येत होतों. शेंकडों मधुर संवेदना हृदयाकाशांत शिरत होत्या. जीवनेश्वराला मी धन्यवाद देत होतों, अनंततेच्या आनंदांत बुडून गेलों होतों. एकाच गोष्टीची उणीव होती. या माझ्या आनंदांत भाग घेण्यास दुसरा जीव माझ्याबरोबर कोणी नव्हता. माझ्या हृदयांतील भावना व उत्साह यांना पूर आला होता. अंतरंगाचा पेला भरपूर भरून सांडत होता. ती सुंदर आकाशगंगा, बाजूचीं उंच झाडें, काळी, काळी दिसणारी वनराजी ते शततरंग, ते तुटणारें तारे, दुरून ऐकूं येणारीं गाणीं, दुरून दिव्यांच्या लखलखाटानें नटलेलें दिसणारें शहर-हें सारें दृश्य काव्याच्या भाषेंत मजजवळ बोलत होतें. जणुं मी कवीच झालों होतों. कौतुकाचा आनंद-पूज्यतेचा आनंद-त्या आनंदाच्या जादूच्या स्पर्शानें कपाळावरील शास्त्रज्ञाच्या आंठ्या वितळून गेल्या. पुनः एकदां माझा आत्मा आनंदी, मोकळा, जीवनरसानें थबथबलेला आहे असें वाटलें; मी वितळून गेलों; श्रद्धावान् झालों. मला

मी तरुण आहे असें वाटलें. मीं त्यागोन्मुख आहे असें वाटलें मला. मी प्रेम करूं शकेन, प्रेमासाठीं यज्ञ करीन असें मला वाटलें. मी नीरस नसून रसाळ आहे असें मला वाटलें, माझी शुष्कता नाहींशी झाली. माझ्या हृदयाला स्वर्गीय दृश्याच्या दंवबिंदूंनीं ओलावा दिला, सुपीक केलें; वठलेल्या झाडाला अंकुर फुटले; काष्टाचा तरु झाला–हिरवेगार पल्लव त्याला फुटलें, फुलें आलीं, परमेश्वरा, हे देवा, सौंदर्याशिवाय हें जीवन किती भिकारडें होईल ! आम्ही किती दरिद्री व दुःखी होऊं ! सौंदर्याच्या दर्शनानें पुनः आम्हीं ताजेतवानें होतों, सर्व कांहीं चैतन्यमय होतें, हृदयाला नवजीवन लाभतें. इंद्रियें, हृदय, कल्पनाशक्ति, प्रतिभा, बुद्धि, धृति, हीं विखुरलेलीं न राहतां एकत्र येतात व त्यांचें एक दिव्य कमळ होतें. जीवनांतिल ही दिव्यशांति जर नसेल ही एकता जर नसेल, विश्वात्मक जें दिव्यजीवन त्याच्याशीं परिपूर्ण मीलन, समरसता जर होणार नसेल, तर सुखाला अर्थ काय ? आज अर्धा दिवस मी अशा दिव्य सुस्थितींत काढला ! त्या परमानंदाचाच मी विचार करीत होतों, माझें सारें जीवन, सारी जाणीव त्या आनंदांत मी डुंबत होतों, चुबकळून घेत होतों.

× × ×

६८

संसारांत आपणांस हळुहळूं विरक्ति शिकावयाची आहे; आस्ते आस्ते संन्यस्त व्हावयाचें आहे. आपल्या आकांक्षा, आपल्या आशा, आपल्या शक्ति, उड्या, आपलें स्वातंत्र्य यांना दिवसेंदिवस मर्यादित करावयास आपणांस शिकावयाचें आहे. आपल्या भोंवतालचें वर्तुळ कमी कमी करीत शेवटीं तें स्वतःशीं स्थिर करावयाचें आहे ! प्रथम सर्व शिकण्याच्या उमेदीनें आपण जीवनांस आरंभ करतों; आपण सर्व पाहूं, सर्व शिकूं, सर्व पादाक्रांत करूं, जिंकूं, मिळवूं अशी आपणांस धमक असते. प्रथम निराशा माहीत नसते. अनेक दिशांनीं आपण जातों व शेवटीं गोंधळून जातों. संपत्ति,

कीर्ति, मान, प्रेम, शक्ति, सत्ता, आरोग्य, सुख, दीर्घायुष्य-या साऱ्या गोष्टी आपणांसहि मिळतील असें आपणांस वाटतें. या गोष्टी इतरांजवळ असलेल्या आपण पाहतों व आपणहि त्यांच्या पाठीस लागतों; परंतु हें स्वप्न ही असोशी शेवटीं दूर ठेवणें भाग पडतें. हळुहळूं जगावरचे आपले हक्क एका पाठीमागून एक आपण सोडून देऊं लागतों, हळुहळूं आपली पिछेहाट होत जाते. आपण कदम मागें घेऊं लागतों. आपण शेवटीं लहान होतों; विनम्र होतों. आपण मर्यादित आहोंत, क्षुद्र आहोंत, हतबल आहोंत, परावलंबी आहोंत, अज्ञानी आहोंत, गरीब दीनदुबळे आहोंत हें कळून येतें व आपण मान वांकवतों. शेवटीं अगतिक होऊन सारा भार परमेश्वरावर सोंपवतों; आपणांस आपली अपात्रता पूर्णपणें कळून येतें. या जगांत कशावरहि आपला हक्क नाहीं हें आपणांस कळून येतें. या अकिंचन स्थितींतच कांहींतरी जीवितांश मिळण्याचा संभव असतो.|दरिद्री होऊन देवाच्या दारांत जाणाऱ्यालाच एकदोन खऱ्या जीवनाचे कण मिळण्याचा संभव असतो, या दरिद्री शून्य जीवनाच्या खालीं दिव्यत्वाची ठिणगी असते. शेवटीं शरणागति व ईश्वराच्यावर हवाला, त्याच्या प्रीतीवर श्रद्धा यानेंच खरा मोठेपणा आपण मिळवितों. लहान होऊन मग खरे मोठें होतों.

× × ×

६९

जीवनाच्या सर्व महत्त्वाच्या बाबतींत आपण एकटे असतों. आपला खरा इतिहास हा क्वचितच कोणाला माहीत असतो, क्वचितच कोणाला समजतो, वाचतां येतो. आपल्या जीवनाच्या नाटकांतील महत्त्वाचा भाग आत्मगत भाषणांनींच बनलेला असतो; किंवा देव व आपलें अन्तःकरण यांतील ती परम एकांतांतील चर्चा असते. आपली सद्सद्विवेक बुद्धि व आपण यांच्यामध्यें जो संवाद चाललेला असतो, तोच या नाटकांतील महत्त्वाचा भाग. आपले अश्रु, आपलीं दुःखें, आपल्या आशानिराशा,

आपल्या चिंता, सुविचार वा कुविचार. आपले निश्चय, आपली चंचलता, अनिश्चितता, आपले बेत सारें आपल्या अंतरंगालाच माहीत. तेथें कोणाची आंत डोंकावण्याची छाती आहे ! याची दुसऱ्यांस पूर्ण कल्पना शब्दांनीं वा इतर साधनांनीं आपणांस करून देतां येणें शक्य नाहीं; वाणीनें वा लेखणीनें त्यांची यथार्थ कल्पना दुसऱ्यांस देतां येणार नाहीं. आपल्या जीवनांत जें अत्यंत मोलवान् आहे तें बाहेर कधीं प्रकट होत नसतें. अत्यंत प्रियतम व जवळच्या माणसांसहि तें दिसत नाहीं. आपल्यांतील मोलवान् वस्तु-तिचें आपणां स्वतःसहि पूर्ण दर्शन होत नाहीं, आपणासही त्याची अर्धवट ओळख असते. तें कृतींत प्रकट होत नाहीं. फक्त प्रार्थनेच्या वेळेस तें दिव्यत्व आपलें मुखमंडळ देवास, त्या प्रियकरास दाखवतें ! ईश्वरालाच फक्त ती दिव्यता दिसते, तोच कदाचित् ती पाहूं शकत असेल. आपलें गतजीवन अत्यंत जलदीनें-वेगानें आपणांस पारखें होत असतें. आपल्या जीवनांतील अणुरेणूंवर इतरांच्या जीवनांतील अणुरेणूंचा परिणाम होत असेल; तरी शेवटीं आपल्या जीवनाचा अणु अभेद्य व अदृश्यच राहतो. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे आपण आपल्या सत्यस्वरूपाच्या बाहेर भटकत असतों, त्याच्या अंतःपुरांत आपण शिरत नाहीं. आपल्या ज्ञानमय जाणीव शक्तीचें हृदय अजाणीवेनें भरलेलें आहे. आपली जाणीव दुसऱ्यास जाणते, दुसऱ्यावर प्रकाशकिरण फेंकते, परंतु स्वतःच्या बाबतींत नेणीव असते; अंधार असतो. सूर्याचा मध्यभाग—अन्तर्गर्भभाग अंधारभीरत आहे ! आपण जे वरवर मिरवतों, दिसतों, आपल्या वरवरच्या वासना कामना, आपलीं नाना कर्में, आपलें ज्ञान सारें उथळ आहे. तें खोल गंभीर यथार्थ नाहीं. या वरच्या विजेच्या क्षणिक लखलखाटाच्या खालीं चिरंतनाचा अंधार—अनंत अंधार आहे.

× × ×

७०

निर्णय करणें याचा अर्थ काय ? स्पष्ट रीतीनें पाहणें, विवेकपूर्वक काळजीपूर्वक पाहणें, जें न्याय्य आहे—पक्षपाततीत आहे तें पाहणें, कोठ-

त्याहि प्रकारचा स्वार्थ व पूर्वग्रह सोडून पाहणें—म्हणजेच स्वतःला विसरून पाहाणें.

× × ×

७१

दुसऱ्यास जें असाध्य तें करून दाखवणें हें बुद्धीचें द्योतक आहे; बुद्धीला अशक्य असणारें करून दाखवणें म्हणजे अपूर्वता, लोकोत्तरत्व—थोर विभूतिमत्त्वाचें दर्शन होय.

× × ×

७२

आपल्या इच्छानुरूप नव्हे तर आपल्या शक्तीनुरूप इतरांच्या उपयोगी पडणें हें आपलें कर्तव्य होय.

× × ×

७३

जर राष्ट्रीयतेला संमति द्याल, तर सरकारला संमति दिलीतच. राष्ट्र म्हटलें म्हणजे सरकार आलेंच.

× × ×

७४

आपल्यांतील पशुत्वाचें चिन्ह म्हणजे स्वार्थ होय. ज्यावेळेस मनुष्य निरहंकार होतो, तेव्हां त्याच्यामध्यें माणुसकी येण्यास सुरवात झाली असें समजावें.

× × ×

७५

आपण निश्चय करण्यापूर्वी सर्व साधकबाधक गोष्टी पाहूंच असा जो हट्ट धरतो, त्याला कधींच निश्चय करतां येणार नाहीं. जीवनाचा स्वीकार केलात, कीं थोडीफार दुःखासाठींही तयारी ठेवलीच पाहिजे.

× × ×

७६

भावनाहीन मनुष्य केवळ सुप्तशक्ति आहे. त्याच्या आंत अप्रकट पुष्कळ असेल परंतु तें भावनेशिवाय प्रकट होणार नाहीं. गारेंतून चमक बाहेर पडावयास, ठिणगी बाहेर पडावयास गारेवर लोखंडाचा तडाखा द्यावा लागतो.

× × ×

७७

मुक्ति म्हणजे गंमत नाहीं, मौज नाहीं. केव्हांहि व कोठेंही पहा मोक्ष म्हणजे मरण आहे. मेल्यानें स्वतंत्रता मिळते, यशानें शांति प्राप्त

होते. जर ईश्वरानें क्षमा करावी अशी इच्छा असेल तर अग्निदिव्य करावयास तयार असलें पाहिजे. जीवन म्हणजे दुःखपरंपरा आहे. ठेंचाळलेल्या व जखमी झालेल्या गुडघ्यांनींच मोक्षमंदीर चढावयाचें आहे. आपण यांतून पळून जाऊं पाहतों. आपणांस इकडे तिकडे अळंटळं करण्याची इच्छा होते, आपण भटक्या मारतों. आपण आरडा ओरडा करतों, स्वतःला स्तंभित करतों. कसोटीपासून सूट मिळावी अशी इच्छा असते. दुःखापासून दूर पळूं इच्छितो—परंतु कितीहि आरडाओरडा केला गोंगाट केला तरी दुःख शेवटीं येतेंच! तें चुकवतां येत नाहीं. आपणांस फांसावर चढविणारा मांग आपल्यांत हृदयांत असतो; आपल्या पापांतच आपला मांग आहे, आपला नरक आहे, आपला सैतान आहे. आपलें पाप आपण पूजीत असतों. ही पापदेवाची मूर्ति जी आपल्या हृदायस मोह पाडते, ती आपणांस शापित असते. ही गोष्ट प्रत्येकानें समजून घेतलीच पाहिजे.

पापाच्या बाबतींत मर, पापापासून दूर रहा—हें ख्रिस्ती धर्मांतील महावाक्य आजहि आंतरिक जीवनाचा प्रश्न सोडवण्यास समर्थ आहे. या वाक्यानेंच सद्सद्विवेक बुद्धीला शांति मिळण्याचा संभव आहे. या शांतीशिवाय खरी शांती नाहीं.

मी बायबलमधील सात अध्याय वाचले. हें वाचन मला जितकी शांति देतें तितकी शांति अन्य कशानेंहि मला मिळत नाहीं. प्रेमानें व ईश्वरी आज्ञेनुसार स्वतःचें कर्तव्य करणें, जें रास्त आहे, न्याय्य आहे तें करणें, याच विचारांनीं आज माझें हृदय भरून आलें आहे. ईश्वरी विचारांत राहणें, त्याचें काम करणें, म्हणजेच धर्म, म्हणजेच मोक्ष, म्हणजेच चिरजीवन. ईश्वरावर ज्याचें प्रेम आहे, ख्रिस्तावर ज्याची श्रद्धा आहे, तो असेंच जीवन आचरेल. हाच आपला पुनर्जन्म होय. असें जीवन प्राप्त होणें म्हणजेच नव मानवाचा संभव होय. पुनः पुनः जन्मणें, नवीन जन्म घेणें म्हणजे जुनें जीवन फेकणें; जुनें पाप, आपल्या वासना व मोह, सांसारिक मनुष्य समाप्त होणें; जीवनाचें नवीन स्वरूप उराशीं धरणें,

दुसरें स्वरूप घेऊन, दुसरी इच्छाशक्ति, थोर दिव्य प्रेम यांनीं सजून ईश्वरासाठीं जगणें म्हणजे पुनर्जन्म होय.

× × ×

७८

ज्याची आपल्यांत उणीव असतें, त्याच गोष्टीस आपण फार प्राधान्य देतों, ती महत्त्वाची मानतों. जें मिळविण्यासाठीं त्याला असोशी वाटते, त्या गोष्टीचें महत्त्व तो अतिशयोक्तीनें गातो. ज्याच्या ठिकाणीं कर्तव्यशक्ति नसते, तो तिचें महत्त्व गातो व जो कर्मप्रधान असतो, तो चिंतन व विचार यांचे गोडवे गातो. एकाच गोष्टीनें पूर्णता येत नसते. सर्व गोष्टींच्या समुच्चयाला जीवनांत महत्त्व असतें. जेव्हां एकादाच भाग आपण अलग करतों व त्याला महत्त्व देतों तेव्हां आपली इच्छा तत्सदृश गुणाबद्दल असते, किंवा त्यापासून विरुद्ध असलेल्या गुणाबद्दलहि असते. जो अत्यंत प्रेमी आहे-तो कठोरतेची इच्छा करील किंवा अत्यंत प्रेमळ स्वभावाचीं माणसेंही त्याला आवडतील! आपलें स्वरुप संपूर्णतेनें पाहावें-असें अलग पाहूं नये. एखाद्या भारतवासी योग्याप्रमाणें आत्मचिंतन मला वेडे करतें; मी त्यांत रममाण होतों. अ त्याच्या पाळण्यांत मी जाऊन बसतों व तेथें डोलतों, झोकें घेतों-तेथें मला शांति व समाधान मिळतें. जगांतील सारें कांहीं, यच्चयावत् सारी सृष्टि, माझें हें जीवन मला केवळ मायामय, बुब्दुदसम, छायेप्रमाणें, धुराप्रमाणें. अभ्राप्रमाणें चंचल सारहीन असें दिसूं लागतें. सूर्याचे हजारों किरण जसें नाचतात व जातात-परंतु ती वनस्थली जशीच्या तशीच-त्याचप्रमाणें हजारों गोष्टी घडतात, परंतु त्या भराभरा माझ्या आत्मदेवासमोर क्षणभर चकाकून निघून जात असतात. पर्वत स्थिर व अचल. या आजुबाजूच्या पसाऱ्याचा जणुं माझ्यावर कांहींच परिणाम होत नाहीं! विचार म्हणजे एक प्रकारचा कैफ आहे. अफूच ती. आपण जागे असून, डोळे उघडे असून झोंपी जातों. जें जें आहे, हें पर्वत, या नद्या,

सर्व वस्तूंच्या आंत आपण डोकावतों. सर्व पारदर्शक दिसतें व त्या त्या वस्तूंत काय आहे तें दिसून येतें.

प्रेमामुळेंच जीवनाची यथार्थता अनुभवतां येतें. प्रेमानें जीवनाला अर्थ प्राप्त होतों. प्रेमानें मनुष्य कर्मप्रवण होतो, स्वतःचें जागतिक स्वरूप तो ओळखतो. प्रेमानें तो जीव होतो, एक विशिष्ट व्यक्ति बनतो. प्रेम-प्रेम मला वाटेल तसें खेळवतें, नाचवतें. मला जर स्वतःला विचाराल कीं, तुला काय व्हावेसें वाटतें तर मी सांगेन ' शून्य ' !

माझी कल्पना नेहमीं निराशामय असतें. खिन्न असतें. आनंदी व आशावादी नसतें. माझी दृष्टी स्वच्छ व नीट पाहतें मी नेहमी विचार करीत असतों, मी सर्व वस्तूंचा जणूं साक्षी होऊं पाहतो, कशांत अडकून जाणें मला आवडतच नाहीं. जें मला कधीं मिळण्यासारखें नाहीं त्या वस्तूवर माझी आसक्ति जडतें.

× × ×

७९

रात्रीं दहा वाजलेलें होते, आकाशांत नक्षत्रानें चमचम करीत होतीं. त्या एका घराच्या खिडकीखालीं अडाणी लोक अमंगळ अश्लील गाणीं गात होते. वाटेल तसे आरडाओरडा करीत होते. आपलें हें बेसूर संगीत, हा धांगडधिंगा या लोकांना कां आवडतो ? ही गलिच्छ आणि घाणेरडी पद्धत त्यांना कां आवडते ? या ओंगळपणांत. किळसवाणेपणांत त्यांना काय मजा वाटते, गोडी वाटते ? अशा प्रशान्त आणि एकान्तपूर्ण निःस्तब्ध निशाकाळीं—कां बरें ही वाच्यता ही काय विचित्र आत्मविनोदनाची रीत ? त्यांना हें कां आवडतें ?

याचें कारण खोल आहे. हृदयांतील गूढ खिन्नता हें याचें कारण आहे. आपण कोणीतरी व्यक्ति आहोंत याचा अनुभव त्यांना घ्यावयाची इच्छा असते. आपण कोणीतरी आहोंत, आपल्याला स्वतंत्र अस्तित्व आहे

ही गोष्ट त्यांना अनुभवून घ्यावयाची असते. बाहेरच्या सर्व जगाहून मी निराळा आहें, जी सृष्टि व्यापून राहिली आहे—तिच्याहून मी निराळा आहे—हा विरोध—हा अहंकार त्यांना अनुभवायचा असतो, जें सृष्टींतील काव्य जोडतें, जी पूज्यवृत्ति ईश्वराजवळ आपणांस नेते, त्या सर्वांविरुद्ध ते बंड करून उठतात. बस्स. मी फक्त मी-पुरे मला. दुसरें कांहीं एक नको. मी कसाही असो, कुरूप असों, अश्लील असों, विचित्र असों, भेसूर असों. सर्व सृष्टी नसून मीच आहे. मी शून्य असेन, तरी मला मीच खरा आहे. माझें व्यक्तित्व मला प्रकट करूं दे. माझ्या चंचलपणांत, लहरीपणांत, माझ्या बे-लगामी वृत्तींत, माझ्या बेजबाबदार साम्राज्यांत माझें अस्तित्व मला अनुभवूं दे.

× × ×

८०

जेव्हां आपला स्वतःचा आपणांस कंटाळा येतो, आपल्या स्वतःचाच 'आपणांस वीट येतो. स्वतःवर संतापतों, तेव्हां दुसऱ्यांचाही आपण तिरस्कार करतों, आपण कांहींतरी चुकीचें केलें ही जाणीव आपणांस चिरडखोर बनवते, या चुकीमुळें आपण चिरचिरे होतों आणि आपलें लबाड हृदय मग बाहेरच्यांजवळ भांडतें. अन्तःकरणांतील ओरड बंद करण्यासाठीं आपण दुसऱ्यावर आदळ आपट करतों.

× × ×

८१

स्वतःची बौद्धिक छाननी करण्याची वृत्ति ही टीकाकाराला अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. तिच्याशिवाय तो टीकाकार होऊंच शकत नाहीं. या वृत्तीशिवाय, आत्मपरीक्षणाच्या देणगीशिवाय त्याला दुसऱ्यांचीं मनेंही

समजणार नाहींत; आणि जर सत्यावर त्याचें प्रेम असेल तर त्यानें टीकाकार न होतां गप्प बसावें हें चांगलें. खऱ्या टीकाकारानें प्रथम स्वतःवर टीका केली पाहिजे; जें आपणांस समजत नाहीं, त्याच्यावर मत देण्याचाही आपणांस अधिकार नाहीं. ज्यांचीं हृदयें कळण्यास आपण नालायक आहोंत त्यांच्यावर टीका करण्याचा हक्क आपणांस पोंचत नाहीं.

× × ×

८२

खिन्नता व चिंता यांचा बोजा वाढत आहे. आग लागलेल्या गोठ्यांतील गुरांप्रमाणें, मला जाळणाऱ्या भाजणाऱ्या वस्तूंनाच मी धरून बसतों चिकटून बसतों. एकान्तजीवन हें मला मारीत आहे, तरी त्यालाच मी अधिक कवटाळून बसतो. माझें आंतरिक दुःख मला खात आहे. त्या दुःखाला मी मला स्वतःला खाऊं देत आहे.

ही जी मारक वृत्ति, तिच्याशीं काल मीं खूप झगडा केला. मी खेड्यांत फिरावयास गेलों. मुलांच्या मुक्यांनीं पुन्हां मला शांति दिली—गंभीरता दिली. बाहेरच्या मोकळयावर जेवणें झाल्यावर तिघां जणांनीं गाणीं म्हटलीं, शाळेंतील प्रार्थना म्हटल्या; ऐकायला आनंद वाटत होता. वासंतिक देवता रानांवनांत मुक्तहस्तांनीं फुलें विखरीत होती. लहानसें नंदनवनाचेंच दृश्य होतें तें. आणि सर्प—मोह पाडणारा सर्पहि खरोखर लांब नव्हता. घराशेजारीं काल चोरी झाली होती आणि दुसरा एक शेजारी मृत्युमुखीं पडला होता. प्रत्येक नंदनवनाशेजारीं पाप व मृत्यू लपलेलीं असतात. आणि म्हणूनच मानवी जीवनाला एक प्रकारचें करुण सौंदर्य आहे, मानवी जीवन म्हणजे शोकपूर्ण काव्य आहे. फुलेंफळें, तरु, तरुच्छाया सूर्यास्त, आकाश, आनंद, सुभगता, सुजनता, भावना, विपुलता, गंभीरता कोमलता, गान--यांत जीवनाचें सौंदर्य आहे. वर्तमानकाळांतील धोके व भविष्यकाळांतलि फसवणुकी व निराशा यांत जीवनांतलि विलाप आहे. या

जगाचें बाह्यरूप सदैव अस्तंगत होत असतें, चाली बदलत असतात. अनंततेला पकडल्याशिवाय, चिर जीवनाला मिठी मारल्याशिवाय, जीवनाची परमार्थिक व धार्मिक बाजू लक्षांत घेतल्याशिवाय- हीं जाणारीं सुंदर झगमगीत क्षणें यांनीं मनाला भय मात्र वाटतें. प्रार्थना--सुख म्हणजे प्रार्थना वाटली पाहिजे आणि दुःखही. नैतिक जीवनावर श्रद्धा, सांभाळ करणाऱ्या त्या जगज्जनकावर श्रद्धा-ही मला आज फारच थोर गंभीर व मधुर वाटली.

× × ×

८३

आज गतस्मृतींनीं हृदय भरून आलें होतें, आनंद होत होता. मी गहिंवरून गेलों होतो. तो पूर्वीचा मी, जर्मनीत असतां मनांत घोळणारी स्वप्नें, भावनाप्रधान विचार, थोर आकांक्षा-अनपेक्षित स्फूर्तीनें या सर्व गोष्टी एकाएकीं डोळ्यासमोर उभ्या राहिल्या. माझें हृदय थरारलें. मी ध्येयच्युत झालों का ? मी ज्यासाठीं जन्मलों आहे, तें मी गमावलें का ? मी माझ्या खऱ्या स्वरूपाच्या गळ्याला फांस लावला का ? हा विचार मनांत येऊन माझा थरकांप झाला. अज्ञात जें आहे त्याची तहान, जीवनावर निस्सीम प्रेम, अनंत असें जें निळें आकाश त्याच्याबद्दल वाटणारी उत्कंठा, पाहणाऱ्यांच्या मनांत ध्येय जो खिन्न महानंद निर्माण करतें, तो आनंद-या सर्वांनीं मला भावनांच्या वातचक्रांत दूर दिगंत नेणें-मला त्याचें वर्णन करतां येत नाहीं. ही सूचना होती धोक्याची, कां शिक्षा होती, कां मोह होता ? हा गुप्त प्रतिकार होता का, अतृप्त अशा स्वभावाचें हें एक प्रकारचें जोरदार बंड होतें का ? सुखाचीही शेवटची वेदना होती का ? न मरणाऱ्या आशेचें हें अंतिम दुःख होतें का ?

हें वादळ कोणीं उठवलें ? एका पुस्तकानें, कांहीं जुने आवडते विषय हें पुस्तक वाचून डोळयासमोर आलें-ते आठवले. मी मधलीं फुकट दवडलेलीं दहा वर्षें विसरून एकदम युनिव्हर्सिटींत शिकत होतों, त्यावेळच्या काळांत गेलों. ते दिवस आठवले. मनांत आले कीं हा जिनेव्हीं पोषाख फेकून

द्यावा आणि हातांत कांठी घेऊन वाटेल त्या देशांत जावें. पाय नेतील तिकडे जावें; फकीर होऊन वस्त्रहीन धनहीन होऊन- परंतु मनानें तरुण, उत्साही, जिवंत, श्रद्धेनें व उत्कटतेनें भरभरलेला असा-जावें.

खिडकीजवळ अशा स्वप्नांतच गढून बसलों होतों. आकाशांतील ढगांतून तारे चमकूं लागले. शेजारच्या घरांतून दिवे हळुं हळूं सारे माळवले गेलें -दिसेनासे झाले, मी कोणत्या स्वप्नसृष्टींत होतो ? सुखदुःखमय जीवनाच्या अर्थाचा विचार मी करीत होतों. जीवन म्हणजे ट्रॅजिडीहि आहे व कॉमेडीहि आहे खरेंच मी अगदीं खिन्न झालों होतों. शंभर वर्षे म्हणजे मला स्वप्नाप्रमाणें वाटूं लागली; जीवन म्हणजे बुडबुडा, प्रत्येक वस्तु म्हणजे अवस्तु असे दिसूं लागलें. मनाच्या व हृदयाच्या किती वेदना, किती शल्यें किती झगडे आणि शेवटीं काय तर दोनचार मिनिटांत मातींत मिळायचें या जगांत कोणती वस्तु सुख देईल, समाधान देईल, कोणत्या वस्तूनें मनाला रिझवावें- कां रिझवावें ?

मी स्वतः या जगांतील एक वस्तु आतां होणार नाहीं. तें अशक्य आहे. मी व्यवहारांतील वस्तु- व्यक्ति होणें शक्य नाहीं. आशा करणें, धडपड करणें हें अधिकाधिक अशक्य मला दिसत आहे, चकित करणारें, स्तिमित करणारें वाटत आहे. विशीच्या वेळीं मी जिज्ञासा मूर्तिमत जिज्ञासा होतों, चपळ व उत्साही होतों, वाटेल तेथें एकरूप होतां येत होतें. आध्यात्मिक विश्वव्यापित्वाची मूर्ति होतों. आणि आज सदतिसाव्या वर्षी- माझ्यांत इच्छाशक्ति, क्रियाशक्ति नाहीं, मला कसली इच्छा नाहीं, कसली बुद्धि नाहीं, कसला नाद नाहीं. माझ्या तारुण्यांतील दारुकाम--नळेचंद्रज्योती--यांचें आज मजजवळ काय राहिलें आहे ? कांहीं नाहीं. चिमूटभर राख.

× × ×

८४

तूं स्वतःला ज्याला सुधारावयाचें आहे असा विद्यार्थी मान; या विद्यार्थ्याची जबाबदारी स्वतःवरच घे. याचा शिक्षक—याचें मन सुधारणारा

तूंच हो. स्वतःचा विद्यार्थी व स्वतःचा गुरु तूंच हो. स्वतःचा पापी स्वभाव पवित्र करणें, हळुहळूं त्याला हृदयांतील देवदूताच्या ताब्याखालीं आणणें, पवित्र ईश्वराच्या साहाय्यानें हा स्वभाव निर्मळ निष्पाप करणें—म्हणजेच धार्मिक शिक्षण. ख्रिश्चन धर्मातील, साऱ्या नीतींतील-धार्मिक नीतींतील शिक्षण तें हेंच. आपलें काम-माझें काम स्वतःतील पशुवृत्तीला माणसाळवून नियंत्रित करून दैवी करणें हें आहे. माझ्यांतील सद्वृत्तीशीं मेळ साधणें, ऐक्य साधणें हें आहे. हृदयांतील दिव्य तत्त्वावर अधिष्ठित होऊन, त्याचा आधार घेऊन स्वतःमध्यें जीं भुतें पिशाच्चें आहेत त्यांच्या शेजारीं धैर्यानें व धर्मानें रहावयाचें—आणि हळुहळूं या पिशाच्चांना कमी बंडखोर करून सत्कर्मांचीं साधने बनवावयाचें—असत् हें चिरंतन नाहीं—असत् हें सत् होतें ही श्रद्धा बाळगावयाची. आपल्यामधील संतानें असंताचा-आपल्यांतील खलाचा उद्धार केला पाहिजे. हें काम अंगावर घेणें म्हणजे नवधर्म स्वीकारण्याप्रमाणें आहे. हें निराळें जीवन सुरू करणें आहे. प्रत्यहीं असा हा नवधर्म नवा करीत राहिलें पाहिजे. जें बरोबर आहे, रास्त न्याय्य व सत्य आहे तें करणें म्हणजे एका दृष्टीनें अत्याचार करणें आहे. कारण त्या कर्मात दुःख आहे, प्रायश्चित्त आहे, सूळ आहे, फांस आहे, मरण आहे, कारण हें कर्म म्हणजे स्वतःला जिंकून घेणें आहे. दुसऱ्या दृष्टीनें दैवी वस्तूंबद्दलची ही उमेदवारी आहे—मधुर व स्वसंवेद्य आनंद, समाधान, शांती—यांच्याजवळ जाणें आहे. स्वतःला पवित्र करणें म्हणजे निरंतर स्वतःचें बलिदान करणें. पावित्र्य म्हणजे चिर यज्ञ-परंतु हा यज्ञ भाग्यशाली करतो, ऊर्जस्वल करतो. कांट्याचा मुकुट हें संतांच्या जीवनांचें करुण गंभीर चिरंतन लक्षण आहे. पापाचा विचार व त्यापासून मुक्तता यासंबंधीं धर्मानें जें सांगितलेलें असेल, याकडे पाहण्याची धर्माची जी दृष्टि असेल तीवर धर्मातील तत्त्वांची गंभीरता व खोली अजमावली पाहिजे. हेंच एक माप लावलें पाहिजे.

× × ×

८५

ज्या क्षणीं कर्तव्य बंधनकारक वाटूं लागतें, त्याच क्षणीं तें आपणांस समजलें—आधीं नाहीं.

× × ×

८६

सुप्त शक्ति हीं एक भ्रांत कल्पना आहे. जें शक्य आहे, तें अस्तित्वांत आलेंच पाहिजे. तें कधीं बाहेर येत नाहीं तें नाहींच मुळीं.

× × ×

८७

मी पुन्हां गटेचें फौस्ट वाचलें. फौस्ट ही व्यक्ति उदास व गंभीर आहे. दरवर्षी पुनः पुन्हां नव्यानें फौस्ट मला मोह पाडतों. माझें मन ओढवतों फौस्ट म्हणजे अशान्त जीवन, फौस्टचें दुःख, त्याची वेदना अशा प्रकारची आहे कीं ज्याकडे मी ओढला जात आहे. या काव्यांतील शब्द एकदम माझ्या हृदयास जाऊन भिडतात, जणुं मीच उद्गारलें— माझेंच तें शब्द वर्णन करीत आहेत. ही वेदना खुनशी आहे, दुष्ट आहे, अमर आहे, माझ्याच सद्सद्विवेक बुद्धीचें भूत, माझ्याच दुःखाचें पिशाच्च, चिरंतन चाललेल्या जिवाच्या धडपडीची ही मूर्ति-- ज्या जिवाला स्वतःचें खरें रूप सांपडलें नाहीं. स्वतःची शांति, स्वतःची श्रद्धा मिळाली नाहीं, अशा जिवाची ही मूर्त धडपड ! माझें जीवन म्हणजे एक विशिष्ट नमुना आहे. माझें जीवन स्वतःलाच खातें. मन मनाला खातें-- कारण स्वतःचा देव त्याला अजून मिळाला नाहीं. हें माझें मन सर्व दुनियेंतून भटकून आलें, सर्व

ब्रह्मांडाला धुंडाळून येतें-- या त्याच्या भटकण्यांत त्याच्याबरोबर स्वतःचा धूमकेतु असतोच वासनेची न विझणारी ज्वाला आणि न दूर होणारी यथार्थ सत्याची वेदना, मी जणूं शून्यमय झालें आहे. मी नाहींच जणुं, माझ्या आंतरिक जीवनाच्या रित्यादरीच्या कांठावर मी थरथरतों, अज्ञाताच्या तहानेनें तळमळतों, अनंताबद्दलच्या तहानेनें जळतो-गुदमरतों, न नष्ट होणाऱ्यासमोर मी लोटांगण घालतों. कधीं कधीं जगण्याच्या प्रखर इच्छेनें अंध इच्छेनें माझ्या हृदयाची ओढाताण होते– कुतरओढ होते. सुखासाठीं मरणांतिक धडपडी करून शीर्णविदीर्ण होतों; जरी होतांहोईतों मी अगदीं गळून गेल्यासारखा पडून राहतों, दृढ निराशेंत गढून राहतों. या साऱ्याचें कारण काय ? संशय ! स्वत.बद्दल संशय, विचाराबद्दल, मानवजातीबद्दल जीवनांबद्दल संशय ! हा संशय, इच्छाशक्तीला मारून टाकतो, आपल्या सर्व शक्ति निष्प्राण करतो; हा संशय ईश्वराला विसरावयास लागतो-- हा अशांत प्रक्षुब्ध संशय जीवन अशक्य करतों व आशेची सदैव टर उडवून उपहास करतो.

× × ×

८८

केव्हांही व कोठेंहि उद्धार म्हणजे हाल, मुक्ति म्हणजे मरण, शांति म्हणजे यज्ञ असेंच आढळेल. जर क्षमा मिळवायची असेल, ईश्वरानें क्षमा करावी असें वाटत असेल तर कष्टांना, हालांना कवटाळलें पाहिजे, यज्ञाला मिठी मारली पाहिजे. जीवन म्हणजे कष्टपरंपरा. जीवनाच्या डोंगरावर ठेंचाळलेल्या व रक्तबंबाळ झालेल्या गुढघ्यांनींच चढावें लागेल. आपण यापासून दूर जाऊं पाहतों--हे दिव्य चुकवूं पाहतों. आपण दूर हिंडत राहतों ही कसोटी आपणांस लावूं नये ह्मणून आपण बधिर होतों, दुर्लक्ष करतों-- चकित होऊन उभे राहतों, आपण या दिव्यांकडे डोळे करीत नाहीं-- परंतु या दिव्यांतून पार गेलेंच पाहिजे. त्याशिवाय चालणार नाहीं.

आज ना उद्यां शेवटीं या डोंगराकडे आलेंच पाहिजे--यावेंच लागेल. एक गोष्ट आपण सदैव ध्यानांत धरणें अगत्याचें आहे. आपणांस फांशी देणारा आपल्याच हृदयांत आहे. आपला सैतान, आपला नरक आपल्या हृदयांतच आहे; आपले पाप म्हणजेच तो मांग. म्हणजेच तो सैतान, तो नरक. हें पाप आपला देव आहे. आपली प्रिय वस्तु आहे; ही पापाची मोहमयी मूर्ति हृदयाच्या इच्छांना भुलवते- आणि यांतच सारा नाश आहे.

पापाच्या बाबतींत मर! तूं मेलेला आहेस असें वाटून पाप दूर जाऊं दे. ख्रिश्चन धर्मांतलि हें महावाक्य आजही सत्य आहे. आंतरिक जीवनांतील गुंतागुंत सोडवण्यास हाच उपाय आहे, यांतच सद्सद्विवेक बुद्धीला शांति मिळाली तर मिळण्याचा संभव. या शांतिशिवाय दुसरी शांती नाहीं. केलेल्या पापाची विस्मृति पडणें!

बायबलांतील सात प्रकरणें--सात अध्याय वाचलें. यानें जशी मला शांति मिळतें तशी कशानेंही मिळत नाहीं. प्रेमानें व ईश्वराला मानून आपलें कर्तव्य करणें, जें न्याय्य व योग्य आहे तें करणें--हेंच विचार माझ्याजवळ राहतात. ईश्वरांत राहणें व त्याचें काम करणें–म्हणजेच धर्म, म्हणजेच मुक्ति, चिरजीवन! हीच प्रेमाची खूण, प्रेमाचा परिणाम, हाच पवित्र आत्म्याचा धर्म, हेंच लक्षण येशु ख्रिस्तानें सांगितलेला नवमानव तो हाच पुनर्जन्मानें या नवजीवनांत आपण प्रवेश करतों. पुनर्जन्म म्हणजे जुनें जीवन सोडणें, पहिलें जीवन सोडणें; आपलें पाप आपलें बाह्य भौतिक जीवन [ natural ] सोडणें, आणि जीवनाचें नवीन तत्त्व स्वीकारणें, हें तत्त्व म्हणजे नवीन मन, नवीन इच्छाशक्ति, नवीन प्रेम घेऊन ईश्वरासाठीं जगणें हें होय.

× × ×

८९

निसर्ग हा विसरविणारा आहे. सृष्टि विसराळु आहे. आपला स्वभावही विसराळू आहे--हें जग तर जास्तच आहे. आपण विसरावयाचा प्रयत्न

न केला तरीही विस्मृति आपणांस कफनाप्रमाणें वेढतेच. या विशाल विश्व-जीवनाचा जोरदार वेगवान्, अदम्य प्रचंड प्रवाह व्यक्तीला बुडवतो, गिळतो आपलें जीवन पुसून टाकतो, आपली आठवणही नाहींशी करतो. ह्या विचारानें असह्य अशी उदासीनता व चिंता मनांत उद्भवते. जन्माला येणें, धडपडणें व नाहींसें होणें- बस्स संपलें क्षणभंगुर जीवनाचें नाटक! बहुतेकांच्या हृदयांत एखादें हृदय अपवाद असेल--आपली स्मृति म्हणजे सागरावरचा एक तरंग, वाऱ्याची एक झुळुक अशीच असते. आपणांत न मरणारें असें कांहींच जर नसेल, तर जीवन ही किती तुच्छ वस्तु आहे! एखाद्या चंचल स्वप्नाप्रमाणें-जें पहांटेची पहिली प्रभा येतांच थरथरतें व मरतें—त्याप्रमाणें माझा सर्व भूतकाळ, माझा वर्तमानकाळ माझ्यांत विरून जातो. ज्याक्षणीं माझी जाणीव स्वस्वरूपीं विलीन होते, त्यावेळेस सर्व गळून पडतें. माझें सर्व हिरावून घेतलें आहे, माझें वस्त्रहरण झालें आहे असें मला वाटतें. मी रिता असतों. एखाद्या रोग्याला ज्याप्रमाणें कांहीं आठवत नाहीं तसें माझें होतें- तसें मला वाटतें. ही एक अपूर्व स्थिति आहे. एखाद्या वस्त्राप्रमाणें, कवचाप्रमाणें माझ्या सर्व शक्ति, वृत्ति गळून पडल्या आहेत असें वाटतें. माझ्या मुशाफरी, माझें वाचन, अध्ययन, माझे बेत, माझ्या आशा, माझ्या मनांतून अस्तास गेल्या आहेत असें मला वाटतें. मी मुलभूत रुपांत परत मिळत आहे असें मला वाटतें. मी माझें स्वतःचें वस्त्रहरण पाहतों, मला लोक विसरतात, त्यापेक्षां मी जास्त विसरतों.जिवंत असतांच हळूंच मी थडग्यांत शिरत आहे असें मला वाटतें. निर्वाणाची निरुपम शांति- निर्वाण परमा शांति जणुं मी अनुभवित आहे असें मला वाटतें. निर्वाणाची अंधारमय शांति मी अनुभवतों. माझ्यासमोर आणि माझ्यांत वाहणारी कालसरिता तिचा ओघ मी ऐकतों; तिची जाणीव आहे, संज्ञा आहे. जीवनाच्या अंधुक छाया माझ्या शेजारून हळुहळू जात आहेत. याची मला जाणीव असते. तथापि मला वाटणाऱ्या ह्या निर्वाण शांतीचा भंग मात्र होत नाहीं.

बुद्धांचें निर्वाण, तुर्कांचें kief, पौर्वात्यांची समाधि-हीं मला समजलीं परंतु सारखी मला जाणीव होतीं कीं या स्थितींतील सुख हें

भयंकर आहे, धोक्याचें आहे. अफू खाणाऱ्याप्रमाणें ही एक आस्ते आस्ते केलेली आत्महत्या आहे. कर्माच्या आनंदापेक्षां, प्रेमाच्या माधुरीपेक्षां, उत्साह व स्फूर्तीच्या रमणयतेपेक्षां, पार पाडलेल्या कर्तव्याबद्दल वाटणाऱ्या आंतारिक समाधान-पवित्र गोडी-त्यापेक्षां हें सुख तुच्छ आहे.

× × ×

९०

स्वतःच्या सर्व साधनसामग्रीचा स्वामी व योग्य वेंचक नि परिणाम-कारक शब्दांचा धनी—मग वक्त्याला आणखी काय पाहिजे? उत्कृष्ट माहिती व उत्कृष्ट शब्द यांनीं भरलेलें व्याख्यान-म्हणजे स्वतः त्या वक्त्यालाही आनंद होत असतो, त्याला धन्य होत असतें. परंतु असे वक्ते आधीं घरीं ठरवून वगैरे येतात—तें समयस्फूर्त व्याख्यान—वक्तृत्व नसतें.

संस्फूर्त वाणी कांहीं औरच असते. श्रोतृवृंद पाहतांच ह्याचा जन्म होतो, व श्रोत्यांना तें वेडें करतें, एका क्षणांत बिजलीप्रमाणें तें नाचतें, चमकतें, शोधून काढतें, दाखवतें. असें वक्तृत्व असणें चांगलें का? मला माहीत नाहीं.

× × ×

९१

जी गरज खरी आहे, ती पुरवल्यानें तृप्त होते, शांत होते, परंतु दुर्गुण शांत केल्यानें तृप्त केल्यानें जास्तच वाढतो—उत्तेजित होतो.

× × ×

९२

स्वतःचें समर्थन करतां येत नसूनही आपलेंच म्हणणें धरून बसणें, आपलेंच मत खरें मानणें म्हणजे दुराग्रह होय. कांहीं योग्य सबब, कारण नसतांही धरलेला तो हेका होय. बुद्धीच्या सद्सद्विवेक बुद्धीच्या चिकाटीच्या नांवाखालीं प्रकट झालेली ही आत्मश्लाघेची अहंतेची चिकाटी होय.

× × ×

९३

मनुष्याजवळ काय आहे, एवढेंच नव्हे तर तो काय करतो यावरून त्याची योग्यता प्रत्यक्ष प्रकट होत नाहीं, तर तो काय आहे यावरून होते.

× × ×

९४

व्यवस्थितपणांत किती सुख आहे, सोय आहे; किती बळ आहे, काटकसर आहे- बाह्य व्यवस्था, बौद्धिक व्यवस्था, नैतिक व्यवस्था. आपण कोठें जात आहोंत, आपण काय इच्छित आहोंत हें जाणणें म्हणजे व्यवस्था; आपला शब्द पाळणें, केलेले करार पाळणें--म्हणजे व्यवस्था. सर्व कांहीं हाताशीं सिद्ध असणें, आपल्या सर्व शक्तींचा, बळाचा योग्य उपयोग करतां येणें, त्यांची नीट वासलात लावतां येणें, कोणत्याही प्रकारचीं असोत आपलीं स्वतःचीं सारीं साधनें तीं आपल्या हुकमतीखालीं असणें—म्हणजेही व्यवस्थाच ! आपल्या स्वतःच्या संवयींना, स्वतःच्या यत्नांना, स्वतःच्या इच्छावासनांना नीट वळण लावणें, शिस्त लावणें. आपल्या जीवनाची नीट संघटना करणें,

घडी बसवणें, आपल्या वेळेचा नीट उपयोग करणें, योग्य कामांना वांटून देणें, आपल्या कर्तव्यांचें नीट मोजमाप करणें. आपल्या हक्कांची पायमल्ली न होतां ते मानले जातील असें करणें; आपलें भांडवल व साधनसामग्री हीं नीट कामांत गुंतवणें, आपली बुद्धि व मिळणारी संधि यांचा नीट रीतीनें- हितकर दृष्टीनें उपयोग करणें हें सर्व कांहीं व्यवस्था या शब्दांत अन्तर्भूत होतें. व्यवस्था म्हणजे प्रकाश व शांति, व्यवस्था म्हणजे आन्तरिक स्वातंत्र्य. स्वतःवर स्वतंत्र ताबा, व्यवस्था म्हणजे महान् शक्ति आहे. सौंदर्य शास्त्र म्हणजे व्यवस्थेचें सम्यक्‌दर्शन. नीतिशास्त्र व्यवस्थेला शरण जातें व व्यवस्थेचा स्वतः स्वतांत व सभोंवतीं साक्षात्कार करून घेतें.

× × ×

९५

आलेलें ढग वितळलें. मी आतां बरा आहे. मी नेहमींप्रमाणें आज फिरावयास गेलों होतों. फिरावयास जाण्याइतकीं ताकद आली आहे. सर्व कळया फुलत होत्या; साऱ्या फांद्यांवर नवीन पल्लव हिरवेगार दिसत होते. स्वच्छ पाण्यावरचे तरंग आणि मधूर असा शब्द, पांखरांची मजा, झाडांची नवीन तजेलदार पालवी, मुलांचा खेळ व गोंगाट, या साऱ्यांचा आजाऱ्याच्या मनावर विलक्षण परिणाम होतो. आजाऱ्याच्या डोळयांनीं, मरणोन्मुख माणसाच्या डोळयांनीं या गोष्टींकडे पाहणें म्हणजे विचित्र होतें असें म्हणा वाटलें तर. अनुभवाच्या एका नवीन दशेशीं माझा परिचय होत होता. या अनुभवांत एक प्रकारची गंभीर खोल खिन्नता होती. आपण सृष्टीपासून कापून अलग केलेलें आहोंत असें वाटे; सृष्टीशीं एकरूप होण्यापासून आपण दूर लोटलेलें आहोंत असें वाटें. निसर्ग-ही सृष्टि म्हणजे सामर्थ्य, आनंद, चिरंतन आरोग्य. सृष्टि उच्च रवानें सांगते—"जिवंत आहेत त्यांना जागा आहे. त्यांनीं यावें, तुमच्या सुगाव्यांनी तुमच्या दुःखांनीं माझें निळें आकाश काळवंडायला येऊं नका; प्रत्येकाची पाळी येतं, जा." परंतु आपलें धैर्य

दृढावण्यासाठीं बळकट करण्यासाठीं आपण स्वतःशीं म्हणावें "नाहीं. आम्ही येणार. कष्ट, हाल, दुःखें, क्लेश जगाला बघूं दे. त्यांत नुकसान नाहीं तर भलेंच आहे. जे सुखी व निश्चित आहेत त्यांच्या सुखाला आमचें दुःख पाहून एक प्रकारची उत्कटता येईल, स्पृहणीयता येईल व विचारी आहेत त्यांना सूचना पण मिळेल. हें जीवन आम्हांला ऋण म्हणून दिलेलें आहे; आणि शेवटपर्यंत या देण्याचा आम्ही कसकसा उपयोग करीत आहोंत हें आमच्याबरोबर प्रवास करणारे जे सोबती आहेत, त्यांना दाखवणें हें आमचें कर्तव्य आहे. कसें जगावें व कसें मरावें दोन्ही गोष्टी आमच्या बंधूंना आम्ही दाखविल्याच पाहिजेत. हीं आजाराचीं पहिली वहिलीं आमंत्रणें, यांत त्याशिवाय एक प्रकारची दिव्य सुंदरता आहे, यांत एक दिव्यमोल आहे. जीवनाच्या देखाव्या पलीकडच्या अनंत जीवनाची चुटमुटकी ओळख होते, अंधुक दर्शन होतें. आजारीपण जीवनाची भयकर सत्यता व अपरिहार्य शेवट शिकवितें; आजारीपण आपणांस सहानुभूतीचे धडे देतें. अजून दिवस आहे तोंच वेळ वांचव, सार्थकीं लाव असें तें सुचवतें; जीं सुखे आपलीं आहेत त्यांच्याबद्दल कृतज्ञ रहा, ज्या देणग्या अजून आपल्यामध्यें शाबूत आहेत त्यांबद्दल विनम्र रहा असें आजारीपण सांगतें. कृतज्ञता व नम्रता यांना तें जन्म देतें, जागृत करतें. आजारीपण जरी वाईट दिसलें, तरी देवाघरून वरून आलेलें तें हृदयाला हांक मारणें आहे. वरून आलेली ती जागृति आहे. ईश्वराच्या पितृंवत्सल तडाक्याचा तो स्पर्श आहे.

आरोग्य म्हणजे किती सुकुमार व भंगुर वस्तु आहे ! आपण बाहेरून गिळंकृत केलें जाऊं नये व आंतून ढांसळूं नये म्हणून किती बारीकसें एक कवच—पातळ कवच आपणांस सांभाळीत असतें ! जरा वारा यावा आणि ही नाव बुडावी, रेतींत रुतावी ! कांहीं होतही नाहीं, तरी सर्व एकदम संपलें असें वाटूं लागतें; एखादा जाणारा ढग, आणि सारा अंधार पसरतो. सकाळीं उमलून लगेच कोमेजणाऱ्या फुलाप्रमाणें जीवन हें सुकुमार आहे. हें जीवन उडणाऱ्या पाखरांच्या पंखांच्या फडफडण्यानेंहि

तुटून पडणाऱ्या फुलाप्रमाणें आहे. वाऱ्याची येणारी बारीकशी झुळुक आणि दरिद्री विधवेचा दिवा मालवला जातो, तसें हें जीवन आहे. सकाळीं फुललेल्या गुलाबांत जें काव्य भरून राहिलें आहे तें अनुभवण्यास शिकावयाचें असेल, तर ज्याला दुखणें म्हणतात त्या गिधाडाच्या झडपेंतून मोठ्या शिकस्तीनें वांचून गेलें पाहिजे. सर्व वस्तूंचा पाया व सर्व वस्तूंचा कळस म्हणजे स्मशान आहे. सर्व धडपडी, निरर्थक आदळआपट, अनंत चिंता व खंता यांनीं भरलेल्या या जगांत एक जर कोणती सत्य आणि खात्रीची गोष्ट असेल तर ती मरणाची खात्री होय. आणि मरणाचीच प्रथम चव देणारें, मरणाचें लहान बदललेलें रूप असें जें दुःख—त्याची खात्री आहे. या न हरणाऱ्या अपरिहार्य गोष्टीकडे जोंपर्यंत तुम्ही डोळेझांक करतां, तोंपर्यंत जीवनाची ट्रॅजिडी तुमच्यापासून लपलेली राहते. परंतु या सत्याकडे एकदां समोरासमोर असें पाहिलें म्हणजे प्रत्येक वस्तूचें खरें मोजमाप दिसूं लागतें, नव्यानें दिसूं लागतें, आणि जीवन—या जगांतील अस्तित्व पुनः गंभीर होतें. आपणांस मग स्पष्टपणें कळून येतें कीं आपण फुलपांखरासारखे नाचलों—बागडलों, नटलों मुरडलों; आपण पथच्युत होतों, विसरून गेलों होतों, क्षुद्रवस्तूंत गुंतलों होतों – आणि म्हणूनच आजपर्यंतचें आपलें चुकत आलें.

आपणांस मरावयाचें आहे हें निश्चित आणि जीवनाचा हिशेब द्यावयाचा आहे. हेंहि निश्चित. हा आजारीपणाचा साधा धडा आहे. " जें करावयाचें आहे, तें अत्यंत काळजीनें कर; विश्वाच्या कायद्याशीं स्वतःचें जमवून घे; स्वतःच्या कर्तव्याचा विचार कर; आणि जाण्यासाठीं स्वतःला सिद्ध राख- जाण्यासाठीं तयार होऊन रहा " असें आपली सद्सद्विवेक बुद्धि घोषणा करून सांगत असते.

× × ×

९६

**मरण्यापेक्षां वृद्ध होत जाणें हें अधिक कठीण आहे; कारण मरण म्हणजे** कायमचें सारें सोडून देणें; परंतु वृद्ध होणें म्हणजे रोज कांहींना कांहीं त्याग

करणें, कांहींना कांहीं सोडणें- एकदम सारें सोडून जाण्यांत कमी त्रास आहे. वृद्ध होणें म्हणजे आपलें मरण आपण रोज पाहणें, आपला क्षय आपण सहन करणें, आपला ऱ्हास पत्करणें, उत्तरोत्तर कमी होत जाणारी क्षमता ती मुकाट्यानें स्वीकारणें ही मृत्यूपेक्षां कठीण व थोर गोष्ट आहे. अकालीं जें मरण येतें तें फार दु:खद करुण असतें व त्या मरणाभोंवती एक प्रकारचें तेजोवलय जणुं असतें; आस्ते आस्ते शक्ति क्षीण होत जाणें यांत दीर्घ खिन्नता आहे. परंतु आणखी नीट पहा-जरा जवळ जाऊन पहा. तुम्हीं जवळ जाऊन पहाल व निरीक्षण कराल, अभ्यास कराल, तर येईल तें शान्तपणें सहन करणारें, होईल तें मुकाट्यानें स्वीकारणारें धर्ममय असें जें वार्धक्य- हें आपणांस तरुणांच्या उत्साह शौर्यापेक्षां अधिक द्रववील यांत शंका नाहीं. मनुष्याच्या शक्तीचा पहिल्या चकमकाटापेक्षां पहिल्या भरापेक्षां, परिपक्व झालेलें जीवन, परिणत झालेला आत्मा हा अधिक मोलवान् आहे. काळाच्या या सर्व स्वाऱ्यांनीं, या लुटालुटींनीं अपल्यांतील जें अमर आहे, आपल्यांत जो अमृतांश आहे त्याचें हितच होतें. या विचारांत समाधान आहे.

× × ×

९७

माझ्या खऱ्या भावनां बोलून दाखवायला मी असमर्थ आहे; ही असमर्थता कां आहे ? ती गुह्य आहे. तसेंच दुसऱ्यांना जें आवडतें तें बोलावयास, चालू काळाला साक्षी राहावयास मी असमर्थ आहे. कधीं कधीं मलाच या माझ्या आंतगांठीं स्वभावाचा राग येतो. गंभीरपणें, बोलावयास माझें हृदय कधींही समर्थ होत नाहीं. तें भितें; आपण योग्य शब्दच बोलूं कीं न बोलूं अशी त्याला भीति वाटतें; योग्य तेंच प्रगट केलें कीं नाहीं याची भीति वाटते. कोणाची खुशामत करीत आहोंत असें स्वत:बद्दल कोणी मानील कीं काय याचीही हृदयास शरम वाटते. जाणाऱ्या क्षणाला मी गंभीर

मानीत नाहीं, त्याला मी तुच्छ लेखतो. माझ्यांतील भावना मागून विचार करणारी आहे, सिंहावलोकन करणारी आहे. ज्या काळीं मी उभा आहे, त्या काळाची, त्या घडीची, त्या क्षणाची थोरवी व गंभीरता मला लौकर समजूं शकत नाहीं. भीतिमुळें माझ्या स्वभावांत एक प्रकारची तिटकाऱ्याची वृत्ति आली आहे, दुटप्पीपणा आला आहे. जणुं दुसऱ्या एखाद्या समयीं दुसरी एखादी वस्तु मिळणार आहे व तिच्यासाठीं मी वाट पाहात आहें. असें ढोंग करीत, सध्यां माझ्या जवळ जें आहे त्याला मी महत्त्व देत नाहीं. भावनांच्या क्षणींहि, मी वाहून तर नाहीं जाणार. ही भीति, आत्मविश्वासाच्या अभावाची भीति, मला सोडीत नाहीं, मला स्वतःची खात्री वाटत नाहीं. स्वतःचा विश्वास वाटत नाहीं, एक प्रकारचा दुर्दमनीय अहंकार मजजवळ आहे व तो असल्यामुळें एखाद्या क्षणाला उद्देशून " थांब, माझ्यासाठीं नक्की कर, तूं परमोच्च धन्यतम माझा क्षणहो, तदेव अशा अनंततेंतून तूं अलग विशिष्ट विलक्षण होऊन रहा; माझ्या जीवनांत अपूर्व अनुभव अद्वितीय अनुभव तूं हो " असें म्हण म्हणून मी स्वतःचें मन कधीं वळवूं शकणार नाहीं. भविष्यकालाबद्दल भरंवसा नसल्यामुळें, मी सुखाजवळ सुद्धां तुच्छतेनें वागतों त्याचीहि मातब्बरी मानीत नाहीं.

× × ×

९८

सकाळीं मी पवित्र आत्म्यावर व्याख्यान प्रवचन ऐकलें. चांगलें होतें. परंतु तें मनाला पुरें वाटेना. त्यांत कांहींतरी उणीव होती. तें प्रवचन ऐकून माझें हृदय उन्नत झालें नाहीं; भरून आलें नाहीं. कारण त्या प्रवचनांत unction नम्रता नव्हती–श्रद्धा नव्हती. कां नव्हती ? कारण केवळ बुद्धीच्या चिकित्सेच्या डोळ्यांनीं ख्रिश्चनधर्माकडे पाहणें म्हणजे तो ख्रिश्चन धर्म श्रेष्ठतेचा होईल, भव्य होईल, परंतु नम्रतेचा होणार नाहीं. प्रतिष्ठित होईल--परंतु विनम्र होणार नाहीं. अशा प्रतिष्ठित धर्मांत पश्चात्ताप, मनाच्या दुबळेपणाचे झगडे, धडपडी, वैराग्य, तपस्या यांना जागा नाहीं. नम्रतेचा कायदा पुसला जातो.

पावित्र्य व गूढता बाफाळून जातात, ख्रिश्चन धर्माचें विशिष्टत्वच उरत नाहीं. माझें नेहमींचेंच म्हणणें—समजूत अजून ठाम आहे-कीं श्रद्धेला केवळ नैतिक मानसशास्त्राच्या जोडीला आणून बसवण्यानें श्रद्धा ही एक नीरस हीनदीन वस्तु बनते. तत्त्वज्ञान जेव्हां धर्माचें सिंहासन घेऊं पहातें, तेव्हां मला तें कसेंसेंच वाटतें, तें अशिष्ट असांप्रत वाटतें. "माझा उद्धारकर्ता, परित्राता घेऊन गेलें हे, त्याला कोठें त्यांनीं पुरला हें मला माहीत नाहीं," असें साधे सामान्य लोक म्हणतील व त्यांना तसें म्हणण्याचा हक्क आहे व त्यांच्याबरोबर मीही म्हणेन. कांहीं केवळ कर्मठ पाहून—विधिनिषेधवाले पाहून मला धक्का बसतो; तसेंच हे नीरस भावनाहीन बुद्धिवादी पाहून मला तिटकारा येतो. मला त्यांच्यापासून दूर जावें असें वाटतें. खऱ्या धर्मोपदेशकाजवळ, प्रवचनकाराजवळ परिपूर्ण नैतिक नम्रता व जोरदार विचारस्वातंत्र्य यांची जोड पाहिजे—पापाबद्दल खोल गंभीर दृष्टि, सत्याबद्दल नितराम् प्रेम, व टीकेबद्दल आदर या गोष्टी पाहिजेत.

× × ×

९९

जो स्वतःचें वर्तन झुगारून देतो, जो निर्बंध, स्वतंत्र होतो-तो सैतानाचा होतो—सैतानाचा गुलाम होतो. नैतिक सृष्टींत अशी एकहि जागा नाहीं कीं, जेथें कोणी धनी नाहीं, स्वामी नाहीं; पडीत जमीनींचा सैतान मालक आहे.

× × ×

१००

बाल्य दशेंतील काव्य भविष्याबद्दलच्या कल्पनेंत आहे, ज्याप्रमाणें परिणत जीवनाचें काव्य भूतकालीन सुवर्णयुगांत जाण्यांत असतें. काव्य हें सदा अंतरांत आहे—दूर असण्यांत आहे. त्या त्या काळाच्या काव्यांतील ध्येयांना

वळण देणारें, आकार देणारें, दिशा दाखवणारें बळ मिळविणें हें साऱ्या नैतिक राज्यघटनेचें काम आहे. नैतिक राज्यघटनेची-नैतिक सत्तेची सारी कला यांत आहे.

× × ×

१०१

**मी** आतांच पहिलें उद्घाटन समारंभाच्या वेळचें भाषण ऐकून आलों. मी आदरानें, विस्मयानें, गोंधळून गेलों होतों. व्याख्यान या दृष्टीनें हें व्याख्यान अनुपम होतें; आधीं तयार केलेल्या मजकुराचें हें पठण असेल तरीहि तें कौतुकावह व गौरवास्पद होतें, जर तें समयस्फूर्त असेल. तर तें आश्चर्यकारकच म्हणावें लागेल. शिलर म्हणतो- "श्रेष्ठता व पूर्णता समोर पाहिली म्हणजे एकच मार्ग आपल्याजवळ राहतो व तो म्हणजे त्यांवर प्रेम करणें" आणि तेंच मीं या वक्त्यांच्या बाबतींत केलें. या तरुण विजयी वीरांकडे पाहून माझ्या मनांत कोणत्याही प्रकारची मत्सराची वृत्ति, छटा नव्हती याचें मला थोडें आश्चर्य वाटत होतें. व आनंद वाटत होता.

तिसरें प्रहरीं एक प्रकारची आत्मघातकी उदासीनता वाटत होती. गळून गेल्यासारखें वाटत होतें, वीट आला होता, जीवनाचा कंटाळा आला होता, मरणांतहि वाईट वाटत होतें, मी कबरस्थानांत शांति मिळेल म्हणून हिंडावयास गेलों, कर्तव्यार्शी मिळतें घ्यावें म्हणून हिंडावयास गेलों, खोटी आशा ! विश्रांती घेण्याची शेवटची जागा, तीच स्वागत करण्यास तयार नव्हती. कबरांवर वाढलेलें गवत मजूर कापून नेत होतें, कबरांचे हिरवे पोषाख हिरावून नेत होते. झाडें वाळून गेलीं होतीं. वारा गार वाहत होता. आकाश धूसर होतें. मृतांची जी विश्रांतीस्थलीं तिचा उपमर्द होत होता. अनादर, हृदयशून्यता, अरसिकता त्या भूमीचा अपमान करीत होतीं. आपल्या राष्ट्रीय भावनांत कांहीं तरी उणीव आहे, कमतरता आहे असें एकदम मनांत आलें. मृतांबद्दल आदर, कबरेचें काव्य, स्मरणाचें पावित्र्य हीं-याची उणीव भासली. आपलीं

मंदिरें फारच थोडीं उघडतात. परंतु कबरस्थानें सताड उघडींच पडलेलीं असतात! परिणाम दोन्हीं बाबतींत सारखाच. रोजच्या रामरगाड्यांतून सुखदुःखांतून जरा दूर जाऊन शांतपणें प्रार्थना करावी किंवा ईश्वरासमोर सारें दुःख ओतावें किंवा चिरंतन वस्तूंच्या सान्निध्यांत ध्यान करावें असें मनांत येऊन दुःखीकष्टी जीव थरथरणाऱ्या हृदयानें एखादें स्थान पाहतो— परंतु तें कोठें त्याला मिळत नाहीं. जिवाच्या या गरजांचा विचार करून त्या पुरवण्याचा विचार करण्याऐवजीं या गरजांकडे चर्च लक्षच देत नाहीं– उपेक्षाच केली जाते. आपल्या मुलांबद्दल सहानुभूतीपूर्ण चिंता चर्चला वाटत नाहीं, हृदयाचीं सूक्ष्म सुकुमार दुःखें, नाजुक वेदना यांबद्दल चर्च कांहींच नीट पोक्त विचार करीत नाहीं; धर्मतत्त्व काय हें चर्चला समजत नाहीं. आध्यात्मिकतेच्या नांवाखालीं खऱ्या व सत्य अशा जीवाच्या आकांक्षा आपण दाबूं पाहतो; गूढता आपण विसरूनच गेलों. गूढतेशिवाय धर्म कोठें उरला? गुढतेशिवाय धर्म म्हणजे वासाशिवाय गुलाब होय.

पश्चात्ताप व पावित्र्य हे शब्द सदैव आपल्या ओंठावर नाचत असतात. परंतु पूजा व सांत्वन हेहि धर्मांतील दोन शब्द आहेत. पूजन व सांत्वन ही धर्माचीं दोन मुख्य अंगे आहेत; आणि या दोन गोष्टींना आज जागा आहे त्यापेक्षां जास्त आपण दिली पाहिजे.

× × ×

## १०२

**माझ्यामध्यें** अशी बुद्धि आहे कीं ती बाह्य वस्तूंस, बाह्य सृष्टीस आनंदानें विसरूं पाहते. परंतु हृदय असें आहे कीं, ज्याला मनुष्यांच्या सहवासांत राहण्याची उत्कंठा आहे. असा हा विरोध माझ्याठायीं आहे. या दोन परस्परविरोधी गोष्टींस जोडणारा दुवा एक आहे व तो म्हणजे स्वतःला विसरणें, स्वतःसाठीं केवळ जगणें केवळ स्वतःचा विचार करणें या गोष्टींना फांटा देणें, स्वतःचें व्यक्तित्व विसरून

जाणें, आणि प्रेम व चिंतन यांत स्वतःला विलीन करणें—यांत स्वतःचा लय करणें—ही वृत्ति होय. माझ्यांतील सर्वांत मोठी उणीव म्हणजे इच्छाशक्ति, चारित्र्याचा अभाव, व्यक्तित्वाचा अभाव; परंतु बहुधा नेहमीं जसें दिसतें तसें खरें नसतें; आणि माझें बाह्य स्वरूप हें माझ्या सत्य व खोल असलेल्या अन्तःस्वरूपापेक्षां, मनांतील खोल खरोखरच्या आकांक्षापेक्षां निराळें आहे, अगदीं उलट, विरुद्ध आहे. मी माझें सारें जीवन-मन आणि बुद्धि-यांना अशी तहान आहे कीं जी यथार्थता आहे, आजुबाजूची प्रत्यक्ष सृष्टि आहे तिच्यांत बुडून जावें; माझ्या साऱ्या वृत्ति शेजारच्या मनुष्यांत, सृष्टींत, ईश्वरांत विलीन होण्यासाठीं हपापलेल्या आहेत. एकान्त माझा नाश करतो—मला भक्षितो. तरीही आश्चर्य हें कीं मी एकान्तांत स्वतःला कोंडून ठेवतों ! मी केवळ माझ्यां पुरता, माझ्या ठायींच मला आनंद आहे असें दाखवितों ! अहंकार व मनाचा नाजुकपणा, हळुवारपणा, हृदयाची भीति, यांनीं मला स्वतःच्या खऱ्या प्रवृत्तींचा व आकांक्षांचा नाश करायला लावलें आहे. यांनीं माझ्या जीवनाची साधी व सरळ स्थिति, नैसर्गिक स्थिति पार उलथवून टाकली आहे. दुसऱ्यांना मी समजत नाहीं, त्यांना माझें कोडें वाटतें यांत आश्चर्य नाहीं. ज्यानें मला आकृष्ट करावें, त्याला मी सदैव टाळीत आलों आहें; मनांतून जेथें असावें असें मला गुप्तपणें वाटे, जेथें असण्याची गुप्त इच्छा असे, त्या स्थानाकडे सदैव मी पाठ फिरविली.

हा दैवदुर्विलास आहे. ही निष्ठुर भवितव्यता जीवनाच्या पाठोपाठ लागलेलीच असते. आपल्यांत मृत्यूची वृत्ति व शक्ति आहे, आणि ही वृत्ति आपल्यांतील जें जें मूर्त होऊं पाहतें, प्रगट होऊं पाहतें, साकार होऊं पाहतें, जिवंत होऊं पाहतें, त्याच्या गळयाला नख लावण्याचा, तें गुदमरवून टाकण्याचा, मारून टाकण्याचा प्रयत्न सतत करीत असते. नाश करण्यातच तिला आनंद वाटतो. आत्महत्येकडेच ती धांवते. स्वसंरक्षणाची जी उपजतवृत्ति, तिच्याशीं ही आत्मनाशाची उपजतवृत्ति जणुं एकरूप होऊन बसते. जें जें सुंदर आहे, सत् व मंगल आहे, शिव आहे त्याबद्दल वाटणारा हा तिटकारा, जें जें संवर्धन करतें, निरोगी व सुखी करतें त्याबद्दल वाटणारी ही जी वैरता, म्हणजे अधिक प्रकाश, नवजीवन देणारें सत्य यांबद्दलच वाटणारा तिटकारा

नव्हे का ? त्याचेंच हें जरा बदलतें रूप नाहीं का ? पापसुद्धां सदैव मृत्युबद्दलच उत्कंठा उत्पन्न करीत नाहीं का ? मृत्युबद्दलचीच तहान निर्माण करीत नाहीं का ?'ज्यानें अपाय होतो, नाश होतो, त्याबद्दल पाप अधिकाधिक आवड उत्पन्न-करीत नाहीं का ? त्याचेंच वेड लावीत नाहीं का ? निरुत्साह करणें,धैर्य न देतां धीर न देतां निराश करणें हें माझें पाप आहे–निरुत्साह, निराशा हें अश्रद्धेचें कर्म आहे अविश्वासाचें अपत्य आहे. याचा परिणाम दुर्बलता दिवसेंदिवस वाढत जाणें हा होत आहे. माझ्यांतील मृत्युतत्त्व, तमोराजाचें माझ्यांतील वर्चस्व दोघें बरोबर वाढत आहेत- वाढलीं आहेत. माझ्या इच्छाशक्तीनें सिंहासनाचा त्याग करून या वृत्तीला राजदंड देऊन टाकला आहे. जें जें उत्कृष्ट आहे त्याला बिघडवणें, ध्येयाबद्दलची निष्ठा व प्रेम, कोमलता, परमार्थ प्रेम, अनासक्तता या सर्वांना कलुषित करणें, गढूळ करणें, याचा परिणाम तर फारच वाईट होतो. या दुष्प्रवृत्तीनें मला अशा दशेला आणलें आहे कीं, आशेपासून मी दचकून मागें सरकतों व स्वतःला मारून टाकावें अशी उत्कंठा वाटतें- असें मनापासून इच्छितों. कर्म म्हणजे मरण आहे.

× × ×

१०३

अकरा दिवस प्रवास केल्यावर मी माझ्या मित्रांच्या घरीं आज आहे. नेकर नदीच्या तीरावरील स्वागत करणाऱ्या त्यांच्या घरांत मी आहे. घराभोंवतीं बाग आहे व ती चढत गेली आहे...प्रखर असा सूर्य तळपत आहे. माझ्या खोलींत प्रकाशाचा पूर भरला आहे. खोलींत भरपूर उबारा आहे. टेंकडीसमोर बसून नेकर नदीला तिच्या मंजुळ मर्मर आवाजाला मी पत्र लिहित आहे. तिच्या तालावर मी लिहीत आहे. हिरव्या निळशा लाटा उसळत आहेत. मधूनमधून रुपेरी चमक झांक मारीत आहे, माझ्या खिडकीच्या अगदीं खालींच हा नदीप्रवाह चालला आहे. ती पहा एक नांव

शांतपणें माझ्या डोळ्यांसमोरून जात आहे; मला न दिसणाऱ्या गाड्यांच्या चाकांचा धडधड आवाज–रस्त्यावरचा हा आवाज मला अस्पष्ट ऐकूं येत आहे. दूर असलेल्या मुलांचे आवाज, कोंबड्यांचें आरवणें, चिमण्यांची चिंव चिंव, तास संपतांच घणघण ठोके पाडणारे चर्चवरील घड्याळ, ही सारीं माझ्या शांततेचा, आजूबाजूच्या शांतीचा भंग न करतां, तिचें मोजमाप करीत आहेत असें वाटतें ! वेळ उडून जाण्याऐवजीं घुटमळत आहे असें वाटत आहे. आपलें तास अगदीं आस्ते हळूंच निसटून जात आहेत असें वाटतें. अवर्णनीय अशी शांति–शब्दातींत शांति माझ्या हृदयांत भरली आहे; प्रभातकाळच्या सौंदर्याची व सौभाग्याची कल्पना, निसर्गाचें खेड्यांतील राहणीतील ताजें काव्य, एक प्रकारची तारुण्याची भावना-जर्मन वृत्ति आहे ही खरीखुरी ... माझे यजमान डॉ. जॉर्ज वेबर मला सांगत होतें कीं त्यांच्या इतिहासाच्या मॅन्युअलचें पोलिश, डच, स्पॅनिश, इटॅलियन, फ्रेंच या सर्व भाषांत भाषांतर झालें आहे. त्यांचें महापुस्तक जगाचा इतिहास (Universal History) याचे तीन भाग प्रसिद्ध झालेही. काम करण्याची केवढी ताकद, किती प्रचंड चिकाटी, किती भरींव काम !

× × ×

१०४

जीवनाचा, एखाद्याच्या आयुष्याचा, मनुष्याचा विचार करणें, हें समजून घेणें याला जी मानसिक प्रक्रिया लागते, तीच नाटक समजून घ्यायलाही आवश्यक असते. पक्षी पुनः अंड्यांत घालण्यासारखें हें आहे; वृक्ष बीजांत घालण्यासारखें आहे, जीवनाच्या सर्व (Genesis) ची ती पुनर्रचना असते. सृष्टीचा निसर्गाचा अज्ञेय विचार प्रकट करणें, स्पष्ट करणें म्हणजेच खरोखर कला होय. जें गुंतागुंतीचें आहे तें सरळ करणें, अदृश्य दिसणाऱ्या गोष्टींना स्थाननिविष्ट करणें. पहिल्यानेंच सृष्टींत सहानुभूतीच्या शाईनें आंखलेल्या योजना दिव्य स्फूर्ति पुनः प्रकट करते. जें गूढ असतें तें विशद

होतें. गुंतागुंतीचें सुवाच्य स्वच्छ दिसूं लागतें, सरळ दिसतें. जें आकस्मिक दिसत होतें, तें आवश्यक कार्यकारणसंबंध असें दिसतें. थोडक्यांत निसर्गाचे हेतु विशद करणें, निसर्गाच्या इच्छा दाखवून देणें हें कलेचें काम आहे. निसर्गाची बुद्धि आणि मन कला मूर्त करते. प्रत्येक ध्येय म्हणजे दीर्घकाळ-पर्यंत असलेलें जें गूढ तें उकलणारी किल्ली आहे. महान् कलावान हा विशद करणारा आहे, उघड करून सांगणारा आहे.

× × ×

१०५

प्रत्येक मनुष्य रानटी पशूंना माणसाळवतो; स्वतःचे विकार हेच ते पशु होत. या मनोविकारांचे दांत पाडणें, आणि नखें काढणें, त्यांना हतदर्प करून माणसाळवणें, त्यांना आपले किंकर करणें, घरांतील प्राणी करणें, ते गुरगुरत असले तरी कह्यांत राहतील असें करणें—यांत स्वतःचें शिक्षण आहे. हेंच मनुष्याचें खाजगी वैयक्तिक शिक्षण होय. ( हें मनुष्यानें स्वतःला शिकवायचें आहे. )

× × ×

१०६

आत्मटीका सर्व साहित्यविषयक वक्तृत्वविषयक स्फूर्तीवर बोळा फिर-विते. जिज्ञासा स्वतःकडे वळतांच तिचें शासन होतें; जी वस्तु पाहिजे ती उठून जाते. ( Like the curiosity of Psyche ) शक्तीनें स्वतःचें रूप पाहण्याच्या भानगडींत पडूं नये. स्वतःचेंच गूढ उकलण्याच्या भरीस ती पडतांच ती स्वतःच नाहींशी होते. सोन्याचीं अंडीं घालणारी कोंबडी—आपलीं अंडीं सोन्याचींच कां हें पाहूं जातांच तिला ती अंडीं होत

नाहींशीं झालीं; ती वांझ झाली. माझ्या जाणीवेची जाणीव म्हणजे सर्व पृथक्करणाचा, सर्व निरीक्षणांचा अंत होय; परमसीमा होय; खरें आहे. परंतु पृथक्करणांची परमसीमा स्वतःलाच खाऊन टाकते. ईजिप्तमधील सर्प स्वतःलाच खाई, तसेंच हें होतें. पृथक्करणाच्या शक्तीला कांहीं बाह्य वस्तु, बाह्य पदार्थ चावायला, खायला द्यावयाला हवा, जर तिच्या विनाशवृत्तीला आळा घालावयाला पाहिजे असेल तर बाह्य वस्तु तिला द्यावी; नाहींतर हा सर्प स्वतःवरच तुटून पडून स्वतःलाच खाईल. गटे म्हणत असे— " आपण स्वतःला अज्ञेय असतों. आपण स्वतःला कोडें असतों, गूढ असतों. आणि तसेंच असलें पाहिजे. आपण बहिर्वृत्तिच असणें बरें. जी सृष्टि सभोंवतीं आहे, जें जग आजूबाजूस आहे त्यासंबंधींच विचार करावा-त्यावरच परिणाम करावा. बहिर्वृत्ति-आरोग्यदायक आहे. किरण बाहेर फेंकीत रहा म्हणजे मन आनंदी शरीर उल्हासित राहील; जें कांहीं आंत आहे त्यावरच सतत जिज्ञासेचे किरण जर जमवले तर आपणांस कांहीं मिळणार नाहीं; केवळ कोरा रिकामा भाग राहील. जीवन सदैव बाहेर तरंगाकार वाढत वाढत जाऊं दे-खेळूं दे. जीवनाचा सदैव संकोच व ऱ्हास करण्याप्रमाणें, तें कमी कमी करून केवळ आपण एवढेंच राहण्यापेक्षां जगांत वाढत जाणें हें बरें; एकान्त बरा नाहीं. उष्णतेनें अधूनमधून गोल निर्माण होतो; आणि थंडीनें गोल असतो-त्याचा परमाणु होतो. पृथक्करणानें, आत्मपरीक्षणानें मी माझा नाश केला आहे, स्वतःला नाहींसें केलें आहे.

× × ×

१०७

फ्रेंच लोकांचें मन आध्यात्मिक भाषा नीट बोलूं शकत नाहीं. फ्रेंच भाषा कमी पडते. ग्रीक, जर्मन, स्पॅनिश लोकांचें हृद्गत फ्रेंच भाषेनें नीट प्रकट करतां येत नाहीं; कांहींतरी फरक किंवा फिरवाफिरव करणें भाग पडतें. फ्रेंच लोकांची चालरीत किती सुंदर आहे, आतिथ्यप्रिय आहे; परंतु विचारांचें

पूर्ण स्वागत त्यांना करतां येत नाहीं. माझा स्वभाव अगदीं याच्या विरुद्ध आहे. समाजासमोर, मनुष्यांसमोर मी व्यक्तिविषयक असतों, आणि जगासमोर, वस्तूसमोर विषमरूप बनतों. मनुष्यासमोर मी अंतर्मुख असतों, वस्तूंसमोर बहिर्वृत्ति होतों. मी वस्तूंवर आसक्त होतों, तिच्यांत लीन होतो; व्यक्तीशीं मीं एकरूप होऊं शकत नाहीं- त्यांच्यापासून दूर राहतो. मी सावध राहतों-त्यांच्याशीं मिळून कदाचित् जाईन म्हणून पाळतीवर राहतो. बहुजनसमाजापासून मी अलग असतों, परंतु विशाल व महान् जो निसर्ग-त्या संपूर्ण निसर्गाशीं मी एकरूप आहे असें मला वाटतें, या विशाल जीवनाशीं सहभावानें एकरूप होण्यांत जो आनंद असतो, तेंच माझें जीवन. या सृष्टीचें स्वरूप समजून घ्यायला मी हापापलेला असतों. क्षुद्रगोष्टींचा, संकुचिततेचा मला तिटकारा वाटतो. जें अनुकरणशील आहे, कृत्रिम आहे-त्याबद्दल मला तिटकारा येतो. माझें मन त्याला नाक मुरडतें. परंतु अगदीं लहानसहान का असेना परंतु खरें व जिवंत असेल-- एखादें तृण, वेल, वृक्ष पशु, पक्षी, मूल-त्यांच्याकडे मी ओढला जातो; माझें मन खेंचलें जातें. (ह्या वस्तु माझें मन मोहून घेतात) गटे, हेगेल, श्लेअर, मॅचरस, लीब्निट्झ् यांच्याशीं माझा स्वभाव, माझी वृत्ति जास्त जुळती आहे. जरी हे परस्परांहून एकमेकांपासून भिन्नभिन्न आहेत—तरी या सर्वांशीं माझी वृत्ति जुळते. परंतु फ्रेंच गणिती, तत्त्वज्ञ, साहित्यशास्त्री, जरी थोर गुण त्यांच्यांत असले तरी, त्यांच्याबद्दल मला ओढा वाटत नाहीं, माझ्या हृदयाला ते विरघळवीत नाहींत पाझरवीत नाहींत. याचें कारण हें आहे कीं त्यांना संपूर्णतेची कल्पना नसते; यथार्थतेची परिपूर्ण कल्पना त्यांना नसते. ते माझ्यांत कांहीं कोंबतात, मला मर्यादित करतात- नाहींतर माझा अविश्वास जागृत करतात. ज्या अन्तः प्रवृत्तीला सर्व वस्तूंचें ऐक्य प्रतीत होतें. ती, एक स्वयंभू अंतःप्रवृत्ति फ्रेंच लोकांत नाहींच. जें पवित्र आहे त्याबद्दल त्यांना फार उत्कट व खोल भावना नसते. जीवनाच्या खोल अंतरंगांत त्यांची दृष्टि जाऊं शकत नाहीं. विशिष्ट शास्त्रांच्या उभारणींत ते अग्रेसर आहेत; एखादा ग्रंथ लिहिण्याची कला, शैली सभ्यता, सुभगता, वाङ्मयविषयक आदर्श, नागरता, अव्यंगता हें त्यांच्या-जवळ आहे. व्यवस्था, शिकविण्याची कला, शिस्त, रुबाब प्रौढता, बारीक-

सारीक गोष्टी नीट रेखाटणें, रचनाकौशल्य- हें त्यांच्याजवळ आहे. सामान्या-बद्दल इच्छा आणि आवड, Proselytesm ची इच्छा आणि कला त्यांच्याजवळ आहे. व्यावहारिक निश्चितता—याला लागणारी शक्ति. नेट त्यांच्याजवळ आहे. परंतु तुम्हांला जर स्वर्गनरकांत मुशाफरी करावयाची असेल तर दुसरें वाटाड्ये तुम्हांला बरोबर घ्यावे लागतील. फ्रेंच लोकांचें घर भूमीवर आहे. जें सान्त आहे, जें बदलणारें आहे, जे ऐतिहासिक, कालमर्यादित आहे, जें विविध आहे—यांत त्यांचें घर आहे. त्यांची तर्कशक्ति यंत्रापलीकडे जात नाहीं; त्यांचें अध्यात्म द्वैतांपलीकडे उडूं शकत नाहीं. याशिवाय दुसऱ्या गोष्टी जेव्हां ते अंगावर घेतात—तेव्हां ते स्वतःवर जुलूम करतात. तें त्यांच्या शक्तीपलीकडचें आहे.

× × ×

१०८

दुपारची वेळ आहे. माझ्या सभोंवतीं गंभीर शांति आहे. जरी घर भरलेलें आहे. शेजारीं सर्व गांव आहे, तरी पर्वतावरील स्तब्धतेचा अनुभव येत आहे. माशांच्या गुणगुणीशिवाय दुसरा आवाज ऐकूं येत नाहीं. या शांततेंत कांहींतरी विशेष आहे. भर दुपार-मध्यान्ह मध्यरात्रीं प्रमाणें आहे, जेव्हां जेव्हां अत्यंत उत्कट आहे तेव्हां तें अत्यंत शांत आहे असें वाटतें, भोंवरा अत्यंत वेगानें फिरत असतां अत्यंत स्थिर वाटतो. अशा वेळीं--या क्षणीं अनंततेचा ध्वनि ऐकूं येत आहे असें वाटतें. जें कधीं पुसलें जाणार नाहीं. त्या अविनाशीला पहात आहोंत असें वाटतें.

व्हिक्टर ह्यूगोचें ' चिंतन, हें पुस्तक मी वाचीत होतों. तो मला या जगांतून त्या जगांत फिरवीत होता. नाचवीत होता. त्याच्यांतील परस्पर विचारविरोध पाहून मला काल त्या ख्रिश्चन मनुष्याजवळ बोलत होतों त्याची आठवण झाली. एकच सूर्यप्रकाशाचा पूर सर्वत्र आहे. या पुस्तकांत आहे, निसर्गांत आहे. सारांश कवींत सश्रद्ध धर्मप्रचारांत, चंचल स्वप्नसृष्टींत

वावरणाऱ्यांत सर्वांत हा सूर्य प्रकाश आहे. व्हिक्टर ह्यूगो या विविध प्रकारच्या जीवनांतून जातो. प्रत्येक जाणाऱ्या वाऱ्याच्या झुळकेचा तो स्वतःवर परिणाम होऊं देतो. त्याच्या जीवनाच्या विमानाच्या सभोंवतीं जे वारे, जे आनंद असतील त्या सर्वांना तो मिठी मारतो-त्यांना या या असें म्हणतो, वातावरणाच्या सर्व प्रकारच्या नादलहरींतून उंचसखल प्रदेशांतून ध्येयहीन असा तो भटकत राहतो. हृदयांत संगीत आणि विसंगीत अनुभवतो; विचार आणि भावना यांतील संवाद, विसंवाद अनुभवतो. निष्क्रियता आणि चिंतन! इच्छाशक्ति--कर्मशक्ति तिची निद्रा; जिवंतपणाचा अभाव, उत्साहाचा व स्फूर्तिचा अस्त, सर्व जीवनांतील स्तिमितता व आलस्य-या सर्व गोष्टी मला किती नीट माहीत आहेत. यांच्याशीं माझा चांगलाच परिचय. मी ओळखतो यांना. प्रेम करणें, स्वप्नसृष्टांत रंगणे सहृदय असणें, समजून घेणें, हें सर्व मला शक्य आहे. फक्त एक गोष्ट नको. ती इच्छाशक्तीची, निश्चयाची. ही माझी वृत्ति आहे, उपजत स्वभाव आहे; विचारांतच रमणें हा माझा दोष आहे, हें माझें पाप आहे. महत्त्वाकांक्षा धडपड, द्वेषमत्सर, स्पर्धा, ज्यानें ज्यानें आत्मा कलंकित होतो, स्वरूपच्युत होतो, ज्यामुळें आत्मा परावलंबी होतो, बाह्य ध्येयावर विसंबतो-त्या त्या गोष्टींची मला भीति वाटते. त्यांपासून मी दूर राहतो. पुनः एकदां माझें जें मूळ स्वरूप-खरा जो मी-तो जागून त्याच्याशी एकरूप होणें काळाचीं पाऊलें ऐकणें, विश्वात्मक विराट जीवनाचा प्रवाहध्वनि ऐकणें-यांतील आनंद मला इतर सर्व इच्छा, विसरून जावयास पुरेसा आहे. कांहीं निर्माण करण्याची इच्छा, कांहींतरी संपादण्याची शक्ति या आनंदानें माझ्यांत शांत होऊन जातात— जिरून जातात. बौद्धिक सुखवाद माझ्यावर स्वार होण्याची भीति मला दाखवीत आहे. कर्तव्याच्या विचारानेंच मी या प्रवृत्तीशीं झगडूं शकेन.

× × ×

१०९

खरें काव्य तें जें तुम्हांला स्वर्गोन्मुख करतें—दिव्यतेकडे वळवितें. तुमच्या हृदयांत दैवीसंपत्ति जें निर्माण करतें, दिव्य भावना उचंबळवितें तें खरें काव्य. खरें काव्य प्रेमाचीं, मृत्यूचीं, आशेचीं त्यागाचीं गाणीं गातें; अनंततेची भावना जागृत करतें. जोसिलीन ( Jocelyn ) वाचलें म्हणजे माझ्या मनांत कोमल भावना जागृत होतात. उपरोधिक वक्रोक्तींनीं या कोमल भावनांचा चुरा झालेला पाहणें मला आवडणार नाहीं. त्याचा मला तिटकारा येईल यांत शोक ( tragedy of feeling ) आहे, भावना आहे; उदात्तता आहे, निर्दोषता आहे. Paul et viryimie याशिवाय दुसरें फ्रेंच पुस्तक याची तुलना करूं शकणार नाहीं. आणि दोहोंत मला जोसिलीनंच श्रेष्ठ वाटतें. योग्य न्याय देण्यासाठीं दोन्ही पुस्तकें बरोबरच वाचलीं पाहिजेत.

× × ×

११०

आणखी एक दिवस आज संपत आला. दिवस मावळणार आतां. मॉटब्लँकशिवाय बाकी सर्व पर्वत रंगहीन दिसत आहेत. तिसरे प्रहरीं उकाडा होत होता. आतां थंडी लागूं लागली आहे; सायंकाळचा गारठा आला आहे. सर्व वस्तू जावयाच्या आहेत, काळाचा अप्रतिहत प्रवाह चालला आहे ·हा विचार पुनः जोरानें मला सतावूं लागला आहे, माझ्या मनाला ग्रासूं लागला आहे.

कविबरोबर आपणही मोठ्यानें ओरडतों "अरे काळा, थांब; अरे क्षणा, जाऊं नकोस. थांबव तुझें उड्डाण!" परंतु हा आक्रोश व्यर्थ आहे. आणि कोणतें दिवस आपण धरून ठेवूं, कोणते दिवस हृदयाशी जपून ठेवूं? शेवटीं कोणत्या दिवसाची स्मृति राहील? केवळ सुखाच्या दिवसांचीच नाहीं, तर व्यर्थ दवडलेल्या दिवसांचीही स्मृति राहील! सुखाच्या

दिवसांची थोडी सुखस्मृति आहे, परंतु व्यर्थ दवडलेल्या दिवसांची दुःखा-शिवाय– अनुभवाशिवाय दुसरी कोणती आठवण असणार ?

× × ×

१११

रात्रीचे अकरा वाजले आहेत. वाऱ्याची जोरदार झुळूक येत आहे. आकाशांत तुरळक ढग आहेत बुलबुल शांत आहे. मात्र रातकिडे गात आहेत व नदीचेंही संगीत सुरू आहे.

× × ×

११२

ज्या जीवनाला पुढें जगावयाची इच्छा आहे, ते आपण होऊन स्वतःची दुरुस्ती करून घेतें. आपल्या मदतीची त्याला आवश्यकता नसतें. विणलेलीं कोळयांची जाळीं फाटली असलीं तर जीवन तीं पुनः नीट करतें; विणते पुनः आरोग्य संपादून घेतें; स्वतःला झालेल्या जखमा, मारलेले घाव यांना तें भरून काढतें. हें जिजीविषु जीवन आपल्या डोळयांवर पुन्हां पट्टा बांधते, हृदयांत आशा ओततें. आपल्या सर्व इंद्रियांना- सर्व तनमनाला उल्हसित करतें, बलवान् करतें. कल्पनांचे मनोरे पुन्हां उभारतें, स्वप्नें पुनः रचतें. ही जीवनाची आशा नसेल तर अनुभव केव्हांच सुकून गेला असता, धुळीत मिळाला असता; वा वृद्धाहूनही वृद्ध झाला असता. आपल्यांतील चांगली व शहाणी वृत्ति ती कीं, जीं स्वतःविषयीं अजाण आहे. मनुष्यांत जर योग्य व बुद्धिग्राह्य कांहीं असेल तर तें जें कधीं वादविवाद करीत नाहीं. उपजत धर्म, स्वभाव, दिव्य व गूढ अशी एक क्रियाशक्ती,

यांनीं आपल्या मूर्खपणानें आपण स्वतःला ज्या जखमा करून घेतों—त्या बऱ्या होतात, आपल्या जीवनाची अदृश्य शक्ति, देवता, आपणांस विशाल व विपुल जीवनाची सामुग्री पुनः पुन्हां पुरवीत असते. स्वतःच्या विकासाला साहित्य पुनः पुन्हां पुरविण्यास ती अधिष्ठाची देवता कंटाळत नाहीं. आपल्या ज्ञात जीवनाचा खरा पाया, भक्कम पाया—अज्ञात जीवन हा आहे. जें जीवन आपणांस दिसत नाहीं, आपणांस माहीत नाही तें आपल्या या ज्ञात जीव-नाला पुरवठा करीत असते. चंद्राच्या बाह्य परिघाला- पृथ्वीशीं सदैव संबंध असूनहि पृथ्वीचें जसें ज्ञान नाहीं-तसेंच आपल्या बाह्य जीवन चंद्राला अंतर्जीवन वसुंधरेचें ज्ञान नसतें.

× × ×

११३

जी टीका सहृदय नसतें, बेफिकीर व बेपर्वा असते, तिचें हास्य किती कटु, द्वेषी, मत्सरी व अहितकर असतें. तिचें तें विषमय हास्य स्पर्शजन्य रोगाप्रमाणें पसरतेही कसें! नेहमी वक्रदृष्टी, उपरोधिकच पाहणें! अशी वृत्ति सर्व गोष्टींवर पाणी फिरवते, सर्व गोष्टींचा नाश करते. टर उड-विण्याचा कठोर व निर्दय हा स्वभाव अशा स्वभावाला वैयक्तिक कर्तव्य कांहीं आहे असें वाटतच नाहीं; कांहीं प्रेमसंबंध आहे असें वाटत नाहीं. कोणत्याहि प्रकारच्या प्रेमापासून किंवा कर्तव्यापासून ही टीका अलिप्त असते; स्वतः कांहीं एक न करतां सर्वांचें हृद्गत समजून घेण्याचा ती प्रयत्न करीत असते! मग टीका करणें हा स्वभावच बनतो, एक फॅशनच होते, प्रघातच होतो. एक पद्धतच, रूढीच, प्रणालीच ती पडते. अशी टीका नीतीचा, श्रद्धेचा, सर्व दैवी शक्तीचा विनाश करण्यास कारणीभूत होते. माझ्या मध्येंही अशी एक प्रवृत्ति आहे व ती या दिशेनें मला नेऊं पहात आहे. परंतु या प्रवृत्तीचे जास्त तीव्र आणि प्रखर नमुने मीं पाहिले व त्यांचे परिणाम पाहिले म्हणजे मी मागें सरकतों, माझी वृत्ति आंत ओढून घेतों. मी दुस-

त्यांच्या नैतिक शक्तींचा कधीं नाश केला आहे असें मला आठवत नाहीं. हें पाप मी केलें नाहीं —हा आरोप माझ्यावर मला करतां येणार नाहीं. जीवनाबद्दल मला जो पूज्यभाव वाटतो, त्यामुळें हें पाप मी करूं शकलों नाहीं. आणि माझा स्वतःवर विश्वास नसल्यामुळें हा मोह मला आतां पडणार नाहीं.

आपणांमध्यें, आपल्या समाजांत अशी वृत्ति असणें, असा स्वभाव असणें हें फार धोक्याचें आहे. अशा स्वभावाचीं माणसें माणसांतील ज्या उपजत नीचवृत्ति असतात—त्यांचीच खुशामत करतात; स्वच्छंदीपणा, बेशिस्तपणा, पूज्यभावाचा अभाव, अनादर, स्वार्थी, व्यक्तित्व या सर्वांना अशीं माणसें उचलून धरतात. याचा परिणाम समाजाचीं शकलें शकलें होतात. ( विश्वंसक किंवा विधायक कांहींच ज्यांच्याजवळ नाहीं )-केवळ निषेधात्मक वृत्तींचीं माणसें मोठमोठ्या राजकीय संघटनांत निरुपद्रवी वृत्तीचीं असूं शकतील; कारण अशीं माणसें असोत वा नसोत, राजकीय जीवन चालूंच राहतें. परंतु जिनेव्हासारख्या लहान देशांत यांचा सुकाळ होणें ही खेदाची व दुःखाची गोष्ट आहे. आपल्या देशासारख्या लहान राष्ट्रांचा असे लोक नाश करतील. लहान राष्ट्रें श्रद्धेवर व इच्छाशक्तीवर, क्रियाशक्तीवर जगत असतात. जेथें निषेधाचेंच स्वामित्व आहे यांत कांहीं शंका नाहीं त्यांत कांहीं नाहीं. अशा नेतिनेतिचें जेथें राज्य आहे, तेथें विनाश येणार—मरण येणार—कारण जीवन हें नकारात्मक नसून विध्यात्मक आहे, असार नसून साररूप आहे. समाज, देश, राष्ट्र ह्या जिवंत वस्तु आहेत व म्हणूनच मरणाधीन आहेत. त्यांना मरण येणें शक्य आहे. पूर्व संग्रहाशिवाय, पूर्वापार कल्पनांशिवाय कोणतेंही राष्ट्र असूं शकत नाहीं. वादविवादाशिवाय, बाहेर उघड दाखवितां येणाऱ्या पुराव्याशिवाय चालत आलेल्या, आपण चालूं दिलेल्या, आपण मिळविलेल्या, एकरूप केलेल्या अशा अनेक मानलेल्या गोष्टींतून, अशा अनंत समजुतींतून राष्ट्रीय-तेचें, सामाजिक संस्कृतीचें, त्या त्या राष्ट्राच्या जीवनाचें जाळें विणलें गेलें असतें. कर्म करायला कशावर तरी श्रद्धा हवी, विश्वास हवा, कशावर तरी श्रद्धा ठेवण्याचा आपण निश्चय केला पाहिजे. कांहीं तरी दृढ केलें पाहिजे.

मनाशीं खूणगांठ बांधली पाहिजे; जो प्रश्न आहे–त्याचा आधींच नीट प्रत्यक्ष विचार केला पाहिजे. पूर्णपणें शास्त्रीय छाननी करून शास्त्रदृष्टया खात्री पटल्यावर जो कर्म करणार आहे, तो कांहींच कधीं करूं शकणार नाहीं; तो व्यावहारिक जीवनाला नालायक आहे, परंतु जीवन हें कर्मासाठीं आहे;कांहीं तरी करण्यासाठीं आपला जन्म आहे. कर्तव्य आपणांस चुकवतां येणार नाहीं टाळतां येणार नाहीं. जोपर्यंत पूर्वीच्या कल्पना आणि समजुती यांच्या ठिकाणीं दुसरें कांहीं आपणांस देतां येत नाहीं– संशय व साशंकता हीच फार तर देऊं. दुसरे दृढ निश्चित विचार देतां येत नाहींत तोंपर्यंत त्या कल्पनांचा आपण तिरस्कार करूं नये; ज्यांचें समाधान आपणांस करतां येणें शक्य नाहीं, त्यांना आपण हंसता कामा नये. ही निदान माझी तरी दृष्टी आहे.

× × ×

११४

सर्व मनुष्यांना समान असें कांहीं आहे; परंतु या समानतेच्या पलीकडे त्यांच्यांत भेद पाडणारें, विषमता निर्माण करणारेंहि कांहीं आहे. हें दुसरें तत्त्व कधीं धर्म असेल, देश असेल, भाषा असेल, शिक्षण असेल. परंतु हींहि जरी समान व एक धरलीं तरीहि असें कांहींतरी शिल्लक उरतेंच, जें भेद पाडतें. हें कांहींतरी म्हणजे ध्येय. ध्येय असणें वा मुळींच नसणें, हें ध्येय असणें वा तें ध्येय असणें; यामुळें माणसामाणसांत फार फरक पडतो– ते एकमेकांपासून दूर जातात–दोन ध्रुवांप्रमाणें अलग होतात. एकाच कुटुंबांत राहणाऱ्या माणसांतही यामुळें अंतर पडतें; एकाच घरांत एकाच छपराखाली, एकाच खोलींत राहणारीं माणसें– परंतु तीं एकमेकांपासून निराळीं पडतात– दूर जातात. जरी ध्येय निराळें असलें तरी पूर्वीच्याच प्रेमानें प्रेम केलें पाहिजे, दुसऱ्या कोणाच्या

तरी विचारानें विचार केला पाहिजे– जर आपणांस एकटें व्हावयाचें नसेल ! केवळ आपलेंच ध्येय आणि आपण असें कराल तर एकटे राहाल.

× × ×

११५

अन्योन्य सद्भावांत, परस्पर दर्शविलेल्या सन्मानांत सुविचार व एक-प्रकारचा अलिप्तपणा असतो; प्रेमांतही असें असतें. त्या दर्शविलेल्या सभ्दा-वांत आपलें सर्व हृदय आपण उघडें करीत नाहीं. कांहींतरी राखून ठेवतो. त्याचा अर्थ हा कीं ज्याच्या जीवनांत आपण भागीदार होतों त्यांना जितका मोकळेपणा व जितकें स्वातंत्र्य पाहिजे आहे तेवढें आपण देतों. ढवळाढवळ करण्याची आपली एक उपजत वृत्ति असते– तिच्या फशीं आपण पडूं नये. ह्या वृत्तीवर विश्वासूं नये, गोडगोड बोलून दुसऱ्याच्या हृदयांत शिरण्यांत पुष्कळ वेळां आपली इच्छा त्याच्यावर लादण्याचा गूढ हेतु मनांत असतो.

आपण कितीदां तरी दंभाचरण करीत असतों–दांभिक असतों ! बाह्यतः दुसऱ्याजवळ वागतांना आपण नेहमीं एकच स्वरूप दाखवीत असतों–परंतु आपलें खरें स्वरूप काय तें आपणांस माहीत असतें, आंत आपण निराळे असतो. दोन्ही आपलींच स्वरूपें आहेत -यांत दंभ कसला असें कोणी म्हणेल--तरी ह्यांत फसवणुक तर आहेच ही वंचना आपणांस नमवेत, विनम्र करते. आपण जो बुरखा घेतलेला असतो, त्याचें प्रायश्चित्त म्हणजे हे लवणें, विनम्र व्हावें लागणें. आपला भूतकाळ वर्तमानकाळाला प्रायश्चित्त करायला लावतों. अशी मान खालीं घालावयास लागणें वाईट नाहीं. त्यांत आपलें हितच आहे कल्याणमंगलच आहे, आपण त्यामुळें शरमतों, लज्जित होतों आणि त्यामुळें अनुतापाचा जन्म होतो. अशा रितीनें जो सच्चा दिलाचा मनुष्य आहे, त्याच्या जीवनांत वाईटांतून चांगलें निर्माण होत असतें, व त्याचें पतन पुन्हां उठण्यासाठींच कारणीभूत होतें.

× × ×

११६

व्हिक्टर ह्यूगोच्या ल मिझरब्ल्स्—ह्या कादंबरीचीं ३५०० पानें चाळीत होतों. ह्या अफाट व प्रचंड ग्रंथाचा हेतु काय, ह्यांतील सोनेरी सूत्र काय, संदेश काय, तथ्य काय तें समजून घ्यायचा मी प्रयत्न करीत होतों. या कादंबरींतील मूलभूत कल्पना पुढीलप्रमाणें दिसते. समाजांत कांहीं भीषण अन्याय, घोर पापें निर्माण होत असतात—वेश्या, स्वच्छंदीपणा, ठक, मवाली, चोर, दरवडेखोर, खून, मारामाऱ्या, लढाया, क्रांतिकारकांचे संघ—या सर्वांना समाज जन्म देतो. समाजानें ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, ह्या भयंकर गोष्टी आपणच निर्माण केल्या आहेत. कायद्याच्या कचाटींत जो कोणी सांपडेल तो राक्षस आहे, पशु आहे असें मानून चालणार नाहीं. कायदा माणसाळवणें, कायद्यांत अधिक माणुसकी आणणें, समाजाचें मत व विचारसरणी हीं अधिक माणुसकीची करणें हें आपलें कर्तव्य आहे. जे पतित आहेत त्यांना पावन करणें, पडलेल्यांस उद्धरणें, पददलितास वर उचलणें, सामाजिक उद्धार या सर्वांचा करणें हें आपलें काम आहे. परंतु हें करावयाचें कसें ? जे दुर्गुणी आहेत, स्वच्छंदी आहेत-त्यांना सद्वृत्त करून, त्यांना ज्ञानदीप दाखवून, त्यांना अन्य वळण देऊन त्यांची संख्या हळुहळूं कमी करून, क्षमेंतील प्रभाव अपराध्याला प्रकट करून दाखवून ही सारी कल्पना, हा ध्येयवाद म्हणजे समाजांतील सर्वांनीं खरे ख्रिश्चन होणें नाहीं कां ? पाप्यापासून तो खुनीमाणसापर्यंत सर्वांना उदार क्षमा दाखवणें हें क्षमेचें उदार व विशाल रूप म्हणजे ख्रिश्चन होणें नाहीं का ? जें तत्त्व ईश्वर परलोकीं अंमलांत आणणार तें ह्या जगांतच आपण अंमलांत आणणें नव्हे का ? हें पुस्तक, हा बृहद्ग्रंथ अट्टाहासानें, हृदय पिळवटून सांगत आहे कीं, मानवी जिवाला तुमच्या निष्ठुर व सूडबुद्धीच्या कायद्यांनीं, पाशवी अभेद्य नियमांनीं चुरडून न टाकतां, प्रेमानें, सहानुभूतीनें व धिमेपणानें त्याला न्याय्य मार्गाकडे, सद्धर्माकडे, संयमाकडे आणण्यासाठीं प्रयत्न करणें—हें थोर आहे. ही धडपड करा.

पुस्तकाचें ध्येय थोर आहे. हें ध्येय उदात्त आहे—महनीय आहे.

परंतु हें अधिक फाजील आशावादी आहे. रुसोच्या धर्तीचें आहे. ह्या मताप्रमाणें व्यक्ति ही नेहमीं निरपराधी असते आणि समाजच चुकीबद्दल जबाबदार धरला जातो. विसाव्या शतकांतील आजचें ध्येय असें आहे कीं, लोकसत्तेचें सुवर्णयुग आणणें; सर्वत्र लोकसत्ता; लढाई नाहीं, फांशी नाहीं, दारिद्य नाहीं, दैन्य नाहीं. हा प्रगतीचा धर्म आहे. ही प्रगतीची द्वारका गांठावयाची आहे. थोडक्यांत अठराव्या शतकांतील काल्पनिक रामराज्य पुनः मोठ्या प्रमाणावर कल्पिलेलें. या विचारसरणींत उदारता आहे, परंतु त्यांत बरीच काल्पनिक अतिशयोक्ति मिसळलेली आहे. अतिशयोक्तीची काल्पनिकता असद्वृत्तीचें स्वरूप समजण्यांत आहे. मनुष्याच्या मनांत ज्या आसुरी वृत्ति आहेत त्याचा खोल विचार केलेला नाहीं. जगांतील असद् जें आहे—त्याचें वरवर उथळ विवेचन व अवलोकन केलेलें आहे मुद्दाम कांहींतरी विचित्र करणें, विक्षिप्तपणा करणें, पापासाठींच पापावर प्रेम करण्याची वृत्ति—माणसांत उपजत असते, ही गोष्ट ग्रंथकार विसरला आहे.

जोंपर्यंत कायदा स्वतःच्या लहरीप्रमाणें चांगलें व वाईट ठरवीत आहे श्रेष्ठ, व कनिष्ठ, उच्च व नीच ठरवीत आहे, आणि खऱ्या सत्याचा या सापेक्ष सत्याशीं घोटाळा करीत आहे, तोंपर्यंत ह्या कायद्यासमोर प्रामाणिकपणा दाखवणें म्हणजेही ढोंगी ठरणें आहे. हा दैवदुर्विलास. असे कायदे जों पर्यंत सुधारत नाहींत तोंपर्यंत चालणार. या कादंबरींतील तो महत्त्वाचा उतारा आहे जेथें जॅव्हर्ट—निष्ठुर व कडक जॅव्हर्टच्या सर्व नीतिशास्त्राचा धुव्वा उडवतो—अर्धवट गुप्तपोलीस, अर्धवट धर्मवृत्तीचा असा हा जॅव्हर्ट अदूषणीय पोलीस अंमलदार जो जॅव्हर्ट त्याचें तत्त्वज्ञान खोडून काढतो. या प्रकरणांत ग्रंथकारानें सामाजिक सद्बुद्धि, दया व सहानुभूति, निष्ठुर व अन्याय्य न्यायाला कशा रीतीनें सुधारूं शकेल तें दाखवलें आहे. सामाजिक नरक यातना बंद करणें, सर्व कलंक व अस्पृश्यता दूर करणें, सर्व सामाजिक अन्याय दूर करणें, ज्यांना अंत नाहीं व ज्यांत आशा नाहीं असे सर्व कायदे रद्द करणें—हें ध्येय हे धर्ममूळ ध्येय आहे.

ह्या पुस्तकांत दिसून येणारें वाचन, बहुश्रुतता, बुद्धि, रचना कौशल्य सर्व थक्क करणारीं आहेत, चकित करणारीं आहेत. अप्रासंगिक गोष्टींचा

पाल्हाळ भरमसाट करणें, कांहीं मध्येंच प्रसंग आणून कथानकापासून दूर जाणें–हा दोष आहे. सर्वत्र जी अतिशयोक्ति आहे तोही दोष आहे; आणि कांहींतरी ओढूनताणून आणलेलें, आदळ आपट करून आणलेलें, दणदणीत जोरदार असें जें भाषाशैलींत आहे तोही दोष आहे. साहाजिक अन्तःस्फूर्तीनें प्रकट होणारें सत्य, व वाणी ती अशी नसते. खरें सत्य निराळ्याच भाषेंत–शब्दांत प्रकट होतें. परिणाम घडवणें—ह्यांतच व्हिक्टर ह्यूगोचें चुकलें. त्याच्या प्रत्येक कृतींत, प्रत्येक शब्द योजण्यांत परिणाम घडवायचा आहे–ही दृष्टि आहे. त्याचें जें सौंदर्यशास्त्र आहे, रचनाशास्त्र आहे—त्याचा हेतु परिणाम घडवणें हा आहे. म्हणून अतिशयोक्ति, पुनः पुन्हां सर्वत्र जोर देणें—इतका कीं कंटाळा येतो, नाटकीपणा, कांहींतरी लादण्याची व अति करण्याची वृत्ति—हे दोष उत्पन्न झाले आहेत. जोरदार कलावान्, परंतु हा कलावान् आहे हें आपण कधींही विसरत नाहीं; अनुकरण करण्यास हा आदर्श धोक्याचा आहे.

परंतु व्हिक्टर ह्यूगोची शब्दसृष्टि केवढी प्रचंड आहे. त्याचें शब्दज्ञान किती चकित करणारें आहे. फ्रेंच भाषेंत जितके प्रकार आहेत जितके भेद आहेत ते सर्व त्याला पूर्ण माहीत आहेत. सर्व धंद्यांतलि शब्द त्याला माहीत आहेत, कोर्टांतलि भाषा, शेअर बाजारांतलि भाषा, लढायींतील भाषा, खलाशांची समुद्रांवरची भाषा, तत्त्वज्ञानाची भाषा, चोरांची भाषा, कैद्यांच्या टोळींतील भाषा, व्यापारधंद्यांतलि बोली, प्राचीन वस्तु-संशोधनशास्त्रांतील भाषा, पुरातन-तत्त्ववेत्त्यांची भाषा, संमार्जकांची- सर्व भाषेच्या खोचा व लकवा–यांत तो प्रवीण आहे. सर्व चालींरीती, सर्व इतिहास त्याला माहीत आहे. शहरांतील, खेड्यां-तील सर्व ठिकाणची बारीक सारीक माहिती - विचित्र माहिती – गंमती त्याला माहीत आहेत. पॅरिस शहर सतरांदा उलथेंपालथें त्यानें घातलें असेल असें वाटतें. खिशांतील सर्व वस्तु – काय काय खिशांत आहे हें जसें आपणांस माहित असतें, त्याप्रमाणें सर्व पॅरिस ह्यूगोला माहीत होतें केवढी प्रचंड स्मृति-केवढी झगझगीत प्रतिभा–ह्यूगो ध्येयवादी स्वप्नसृष्टींत रमणारा आहे तरीही आपल्या स्वप्नांचा स्वामी आहे.

मनाचा एक विशेष नमुना–या नात्यानें ह्यूगोला पाहणें फार मजेचें

आहे. तो जळजळींत चित्रें चितारतो, निखाऱ्यांनीं लिहितो; विद्युतप्रकाशांतील चित्रें प्रकाशवतो; तो कानठळ्या बसवतो, दिपवतो, वाचकाला गोंधळवतो, घाबरवतो, वाचकाला आनंदित करणें, मोह घालणें, वाचकाचें मन वळवणें हें तो करित नाहीं. जोर–बस्स–अशा सीमेला नेलेला जोर–हा मनाला चकित करतो, फसवतो, तुम्हांला कैदी करणारा आहे, असें न दाखवतां, तो तुम्हांला कैदी करतो. हा जोर तुम्हांला तल्लीन करीत नाहीं तर तुम्हांला बांधून टाकतो. असामान्य, अपूर्व, प्रचंड, गुदमरवून टाकणारें, अमर्याद, अनंत हें ह्यूगोचें ध्येय आहे. त्याचे नेहमींचे ठरलेले शब्द म्हणजे "अनंत, अफाट, प्रचंड, विशाल, राक्षसी, अवाढव्य"–असे असायचे. मुलांचा स्वभावही अतिशयोक्तीनें भरलेला व झगझगाटाचा दाखविण्याची पद्धत तो शोधून काढतो. एकच गोष्ट ह्यूगोला अशक्य आहे, ती म्हणजे सहजता, अकृत्रिमता, स्वाभाविकता. थोडक्यांत भव्यतेचें त्याला वेड आहे, अतिशयोक्ति हा त्याचा दोष आहे. त्याचा विशेष म्हणजे प्रचंड शक्ति–परंतु मधूनमधून ह्या भव्यतेंत पोरकटपणा आहे, बेसूरपणा आहे. त्याच्यांतील उणीव म्हणजे प्रमाणबद्धतेचा अभाव; माधुर्याचा, विनोदाचा अभाव; जिवंतपणा कमी. उत्तरेकडच्या व दक्षिणेकडच्या सर्व अतिशयांचें तो मिश्रण आहे. डच व आफ्रिकन यांचें तो मिश्रण आहे. (Galliciged Spaniard) त्याच्यांत फ्रेंचपणा कमी आहे. परंतु दैवाची घटना अशी कीं १९ शतकांतील फ्रेंच साहित्यांतील तो एक अलौकिक तारा आहे. त्याची साधनसामुग्री अपार आहे. वयाचा त्याच्यावर परिणाम होत नाहीं–त्याची शक्ति कमी होत नाहीं. शब्दांचा केवढा न संपणारा सांठा, संप्रदाय, म्हणी, लकबा–किती त्याच्याजवळ असतात. आपल्या जाण्याची खूण म्हणून केवढी पुस्तकांची रास तो ठेवून गेला आहे! ज्वालामुखीप्रमाणें त्याचे स्फोट आहेत. कल्पनेंत वावरणारा कारागीर तो आहे. तो नेहमीं पाडतो, बांधतो, उभारतो, चुरडतो, धुळींत मिळवितो, पुनः रचतो, स्वतःच्या कल्पनेप्रमाणें सृष्टि बनवतो. तो जी सृष्टि निर्माण करतो ती ग्रीक सृष्टि नसून हिंदु सृष्टि आहे– अफाट– प्रमाणहीन.

ह्यूगो मला आश्चर्यचकित करतो, थक्क करतो. तरीपण जे ग्रंथकार,

ज्या विभूति माझ्या हृदयांत सत्याची दृष्टि जागृत करतात, जे मनुष्याची आंतरिक स्वतंत्रता वाढवतात– ते मला आवडतात. मी त्यांना पसंत करतो. ह्यूगोमध्यें सायक्लोपची आदळ आपट आहे; मला ॲपालोची सतार पाहिजे आहे– तीच मला द्या. ऑलिंपियन जोव्हच्या शांत भुंवया भव्य कपाळ तेंच, मला द्या.

× × ×

११७

हवा अगदीं कुंद; आकाश मेघाच्छादित आहे. धुकें पडतें आहे. रात्रीं पाऊस पडला तरी अजून हवा जडच आहे. पृथ्वी व आकाश ह्यांचें हें जरा उदास व गंभीर वर्तन–यांतही एक प्रकारची पवित्रता आहे; परंतु प्रेक्षकाच्या मनांत एक प्रकारची शून्यता, निष्क्रियता यामुळें उत्पन्न होते. प्रकाश हा जीवनाला आणतो. अंधार विचारांत आणित असेल; परंतु हा अंधुक दिवसाचा प्रकाश हा अस्थिर प्रकार, शिशासारख्या आकाशाची झगझग ह्यानें जीवनही नाहीं, विचारही नाहीं तर केवळ अशांति, अस्वस्थता व श्रांतता वाटते; कंटाळा वाटतो. निसर्गांतील ह्या अस्थिर अनिश्चित घोटाळ्याच्या स्थिती कुरूप असतात. मोहकतेचा उगम निश्चिततेंत आहे, चारित्र्यांत आहे, विवक्षित मार्ग रेखाटण्यांत, स्पष्टपणांत आहे, विशिष्टपणांत आहे. जें अस्पष्ट आहे घोटाळ्याचें आहे, ज्याला ना रंग ना रूप, ना धड आकार, ना खूण, ना जोर--तें सारें सौंदर्याला विरोधी आहे. मनाची सर्वांत पहिली आवश्यकता प्रकाश ही आहे. प्रकाश म्हणजे व्यवस्था, व्यवस्था म्हणजे प्रथम निरानिराळे भाग अवयव स्पष्ट पाहणें, आणि मग त्यांची व्यवस्थित, नियमित चाललेली क्रिया पाहणें. सौंदर्य हें बुद्धीवर उभारलेलें आहे.

× × ×

११८

रात्रीं भोजनोत्तर फिरावयास गेलों होतों. आकाश ताऱ्यांनीं चमकत होतें. आकाशगंगा भव्य दिसत होती. काय करूं ? माझें हृदय तरी जडच आहे भाराखालीं वांकलें आहे.

जीवनाविषयीं, स्वतःविषयीं अविश्वास माझ्या हृदयांत आहे, हा रोग बरा होत नाहीं. हा अविश्वास सर्वांच्या मुळाशीं आहे. मी शेजाऱ्याजवळ चांगला वागतों, परंतु स्वतःबाबतींत मात्र कठोर होतों. शेजाऱ्यांचें सारें मला चांगलें वाटतें. माझें मला सारें वाईट वाटतें. मला सर्व पाहिजे नाहींतर कांहींच नको. हा माझा उपजत स्वभाव आहे; ही माझी मूळची वृत्ति आहे हा अंकुर आहे. हा माझ्यांतील पुराणपुरुष होय. ह्या वृत्तीची पुंजी मी घेऊन आलों आहे, आणि तरीही जर कोणी मला थोडें प्रेम दिलें, जर कोणी माझ्या भावनांच्या गाभाऱ्यांत खोल शिरून पाहिलें तर मी सुखी होतों. मग मला दुसरें कांहीं नको. मुलानें माझा पापा घेणें, मला मुका देणें, मित्राजवळ बोलणें—तेवढ्यानेंही मी आनंदी होतों. लगेंच मी विकसित होतों—टवटवीत होतों. अनंताकडे माझी धांव आहे, तथापि अगदीं थोडेंहि मला पुरेसें होतें—मला तृप्त करतें. सर्व कांहीं मला अशान्त करतें—प्रत्येक वस्तु मला अस्वस्थ करते—आणि एकादी लहानशी वस्तु मला शांत करते. मला माझ्यांत कधीं आत्महत्येची इच्छाहि दिसली आहे. तथापि माझी महत्त्वाकांक्षा ती कितीशी-सुखाची उडी कितीशी—तर एक पक्षी व्हावें—पंख असावेत, सूर्याजवळ जावें, घरट्यांत बसावें. पंख, प्रकाश, घरटें. लोकांना वाटतें मला एकान्त आवडतो म्हणून मी एकान्तांत बसतों. मला दुसऱ्याची जरूर भासते, आणि ती कबूल करण्याला मला लाज वाटते. मी जर ते कबूल केलें तर मी बंधनांत पडेन ही भीति, ह्याचा तिरस्कार, ह्यामुळें मी एकटाच बसतों.

× × ×

११९

आज सकाळीं जागा झालों तेव्हां जी भावना, जो विचार मनांत आला, जी एक सूक्ष्म वृत्ति मनाला पकडती झाली, मनाचा कबजा घेती झाली——तिला योग्य शब्द कोणता—त्या वृत्तीला योग्य यथार्थ नांव मी कोणतें देऊं? ती एक आठवण होती—मधुर व मोहक स्मृति होती यांत संशय नाहीं. परंतु तिला नांव नाहीं, गांव नाहीं, अस्पष्ट निर्विकल्प निराकार स्मृति होती. तापानें फणफणणाऱ्या माणसानें आपल्या अंधारांतील खोलींत छायांत, अर्धवट वातांत एखादी स्त्रीची आकृति पहावी तसेंच हें होतें. कोठेंतरी जी मूर्ति, जो आकार मीं पाहिला होता—त्याचीच ती स्मृति होती. त्या मूर्तीनें मला एकदां मोहिनी घातली होती, माझें हृदय हलवलें होतें. आणि नंतर काळाच्या ओघांत ती मूर्ति, तो आकार कोठेंतरी मागें पडला व मी विसरूनही गेलों. तो आकार फक्त मला आठवे-परंतु काल, स्थल, नांव—स्पष्टमूर्तीहि--यांत सारा गोंधळ होता. हें कांहीं नीट आठवत नव्हतें. वरचा बुरखा फडफडत असावा तसें हें होतें. आंतील कोडें—सुखाचें रहस्य तें या बुरख्याखालीं लपवलेलें होतें. बुरखा मात्र फडफडत होता व आंतील वस्तूची अगदीं अस्पष्ट परंतु गोड अशी एक आठवण येत होती. तें कांहीं स्वप्न नव्हतें इतकें समजण्याइतका मी जागा होतो.

अशा प्रकारच्या आठवणींत ज्या वस्तु दृष्टीच्या आड जात आहेत त्यांचे अंतिम दर्शन, शेवटच्या खुणा आपण पाहतों, जातां जातां जणुं त्या आपणांस हाका मारतात. ज्या स्मृति, ज्या आठवणी मालवल्या जाणार असतात त्यांचा तो शेवटचा प्रयत्न असतो, शेवटचें दर्शन असतें. दलदलीच्या प्रदेशावर कांपणारा—हालणारा प्रकाश पडावा आणि स्वच्छ कांहींच दिसूं नये-तसेंच हें असतें. आपणांस अशा वेळीं ही सुखाची स्मृति आहे का दुःखाची हेंही समजत नाहीं—त्या स्मृतीच्या मरणानंतरचा हा एक किरण असतो. किती चमत्कारिक? अशा गोष्टी म्हणजे आपलींच भूतें असेंही म्हणतां येईल. गतसुखाच्या पडच्छाया, मृत भावनांचें पूर्वज-पितर! ताल्मुदया ग्रंथांत म्हटल्याप्रमाणें जर प्रेमाची प्रत्येक भावना एका अदृश्य जीवाला जन्म देत असेल,

नकळत जन्म देत असेल, जर हीं थरथरणारीं भूतें, ज्यांना प्रत्यक्ष आकार नाहीं, वास्तविक सत्यता नाहीं, असे हे चलच्चित्रपटावरील आकार, हे आत्म्याच्या कक्षेभोंवती जर फिरत असतील, तर मग आपण निजलों असतां उशीवर डोकें ठेवून पडलों असतां जे आकार- मनोमय आकार आपणांस भेटावयास येतात--त्याचें आश्चर्य वाटावयास कशास हवें ? कांहीं असो एक गोष्ट खरी कीं जो भास मला झाला त्या भासाला " नांव सांग " असें मी जोरानें सांगूं शकलों नाहीं. त्या आठवणीला आकार, स्पष्टपणा, रंगरूप देण्यास मी असमर्थ होतों.

अशा स्वप्नमय विचारांच्या ओघाबरोबर जेव्हां आपण खालीं वहात जातों; तेव्हां जीवनाचें स्वरूप किती उदास व खिन्न असे दिसते. रात्रीची वेळ असावी आणि एखादें गलबत फुटावें—त्यावेळेस प्रेमळ माणसांच्या हांका मदतीसाठी ऐकायला येत असतात; शेंकडो हांका "या, मदत करा, वांचवा" अशा मारल्या जातात आणि निष्ठुर पर्वतप्राय लाटा त्या हांकांना एकामागून एक शांत करीत चालल्या असतात. मरणाचा अंधार सर्वत्र पसरलेला असतो. लाटेनें गिळंकृत करण्यापूर्वी मदतीसाठीं हात आपणांस लांबवता येत नाहीं, शेवटचा मुका घेतां येत नाहीं, अंतिम वियोगाची मिठी मारतां येत नाहीं. अशा दृष्टीनें पाहूं लागले म्हणजे एकंदर सारें जीवन कठोर, रानटी, दुष्ट आहे असें वाटूं लागतें. रोजच्या क्षुद्र जीवनांच्या मंद पाण्यांत जीवनांतील ही दैवदुर्विलसिता एकाद्या प्रचंड खडकाप्रमाणें उत्पन्न होते. अशा दृश्यानें एक प्रकारची अनिश्चित चिंता वाटूं लागते. त्या चिंतेच्या भारानें मन गंभीर होतें गंभीर झाल्याशिवाय कसें राहील ? वरून वस्तु हंसत असेल— वरून वस्तु साधी क्षुद्र सामान्य असेल -परंतु खालीं खोल पाहिलें तर भयंकर कांहींतरी आहे, प्रखर तीव्र कांहींतरी आहे असें वाटल्याशिवाय राहात नाहीं. शाश्वत गोष्टींना स्पर्श करतांच, त्यांचा विचार करूं लागतांच, जीवाचें ध्येय काय, शेवट काय या प्रश्नाला हात लावतांच, सत्य आणि कर्तव्य यांचा विचार करूं लागतांच, जन्ममरणाच्या रहस्यांना स्पर्श करतांच, आपण– आपली इच्छा असो वा नसो गंभीर झाल्याशिवाय राहत नाहीं.

परमोच्च प्रेम—भव्य, अपूर्व, अमर, अजिंक्य प्रेम—आपणांस नीट सरळ त्या खोल दरीच्या कडेला घेऊन जात असतें; हें प्रेम आपणांजवळ अनंततेच्या व चिरंतनतेच्या सरळ सरळ गोष्टी करतें, त्याबद्दलच प्रत्यक्ष बोलतें. हें प्रेम धर्ममय असतें; जणुं धर्मच. मनुष्याच्या आजुबाजूस सर्व कांहीं क्षणभंगुर पसरलेलें असतें—सर्व कांहीं अंधारांत जात असतें, अदृश्य होत असतें—हें सारें जग, ही सारी सृष्टि एक भ्रांत कल्पना आहे, एक माया आहे, कादंबरी आहे असें जेव्हां वाटतें—हें सारें विश्व म्हणजे एक अनिश्चित बुडबुडा आहे असें जेव्हां वाटतें—जेव्हां विचारांची प्रचंड हवेली, उंचमनोरे हवेंत विरघळून जातात, सर्व प्रत्यक्ष दिसणाऱ्या गोष्टींत जेव्हां संशय भरलेला दिसतो, सर्व सत्यें शंकापूर्ण दिसतात—अशा परिस्थितींत आपलें असें माणसास काय म्हणतां येईल? स्थिर असें कोणचें स्थान, कोणतें चिन्ह त्याच्याजवळ आहे कीं जें त्याला आपलेसें म्हणतां येईल? स्त्रीचें श्रद्धापूर्ण व विश्वासू हृदय! या हृदयावर त्याला आपलें डोकें ठेवतां येईल. विसांवा घेतां येईल. तेथें त्याला जगावयाला, श्रद्धा ठेवायला उत्साह व सामर्थ्य मिळेल; आणि जरूर पडली तर शांतपणें मरण्याचें, ओठांवर मंगल शब्द खेळंवून मरण्याचें सामर्थ्यही तें हृदयच देऊं शकेल. प्रेम—आणि प्रेमांतलि मंगलता यांतच विश्वाच्या ऐक्याचें, संगीताचें मूर्तस्वरूप आहे. प्रेमांत सर्व विरोध विलीन होतात. हें प्रेमच—सर्व जगाची काळजी वाहणारा, सर्वेश, सकल जगाचा तात—याची खात्री पटवून देतें. हें प्रेम म्हणजे ईश्वराचा पुरावाच नाहीं का? त्या करुणामयाचा, वत्सलमयाचा हा पुरावा नाहीं का? प्रेम प्रेममय ईश्वराला सिद्ध नाहीं करीत? प्रेम हा ईश्वराकडे जावयास अत्यंत नजीकचा रस्ता नाहीं का! प्रेम म्हणजे श्रद्धा व विश्वास, एक श्रद्धा दुसऱ्या श्रद्धेस जन्म देतें, एक विश्वास दुसऱ्या विश्वासाला जन्म देतो. ही श्रद्धा—म्हणजेच आनंद, प्रकाश व सामर्थ्य जिवंत, जागृत, सुखी मुक्त पुरुषांच्या रांगेंत ह्या प्रेमानेंच शिरतां येईल, त्यांच्यांत प्रेमामुळेंच प्रवेश मिळेल. ज पुरुष—सत्यनिष्ठ पुरुषजीवनाची यथार्थ किंमत जाणतात आणि ईश्वराच्या व सत्याच्या यशासाठीं धडपडतात, श्रमतात अशा पुरुषांत प्रेमाच्या जोरावर आपणांस शिरतां येईल. हें प्रेम जोपयत नाहीं तोंपर्यंत आपण

बडबडये, केवळ गप्पा मारणारें, वाचाळ पंडितच आहोंत यांत शंका नाहीं; तोंपर्यंत आपण आपल्या आयुष्याची उधळपट्टी करणारें, ज्या देणग्या आपणांस मिळालेल्या असतात, ज्या शक्ति आपणांस दिलेल्या असतात, त्या फुकट दवडणारेच आपण असतों; जोपर्यंत आपणांस ध्येय नाहीं, खरा आनंद नाहीं कांहीं तरी करीत राहतों, तोंपर्यंत आपण दुबळे, अनिश्चित, निरुपयोगीच ठरणार. या विश्वाच्या रचनेंत व योजनेंत आपणांस तोंपर्यंत स्थान नाहीं.

कदाचित् प्रेमानें-प्रेमपंथानें मी माझी श्रद्धा परत मिळवीन; माझा धर्म, माझा उत्साह, माझी एकाग्रता, निश्चितता मिळवूं शकेन. मला असें दिसतें कीं जर मला माझा सहकारी मिळेल, माझा जीवनसांगाती मिळेल-तर बाकी सर्व आपोआप होईल; जो माझा गडी आहे, माझा सोबती आहे-तो मला फक्त मिळूं दे-कीं बाकी आपोआप होईल. तो जर मला मिळेल तर माझी अश्रद्धा गोंधळून जाईल; मला माझ्या निराशेची मग लाज वाटेल. त्या परमपित्यावर, दयामयावर तर मग श्रद्धा ठेव आणि प्रेम करायला धज.

× × ×

१२०

प्रार्थना हें सर्वधर्मांचें मुख्य शस्त्र आहे. जो प्रार्थना स्वीकारील व ज्याच्यापासून आशीर्वाद व कृपा येईल असा कोणी आहे कीं नाहीं ही शंका येऊन जो प्रार्थना करूं शकत नाहीं-त्याचा एकान्त निष्ठुर त्याला वाटेल; तो खरोखर अत्यंत दरिद्री आहे. आणि मी, माझें तरी या बाबतींत काय आहे म्हणणें, किती आहे विश्वास ? हें या क्षणीं सांगणें कठीण आहे. माझ्या सर्व श्रद्धा, सर्व विश्वास आज भट्टींत घातलेले आहेत. त्यांतून काय निर्माण होईल कोणी सांगावें ? मला सत्य पाहिजे आहे-मग तें सत्य अशान्त करणारें असो, मिळविणारें असो, आपल्या सर्व विचारांना उपटून टाकणारें

असो, सर्व कल्पनांना बदलून टाकणारें असो. माझी अशी श्रद्धा आहे, समजूत आहे कीं वस्तूंच्या स्वरूपाबद्दल जी परमोच्च कल्पना आपण करूं शकूं ती अत्यंत सत्य असणार. अत्यंत सत्य तें--जें मनुष्याला संपूर्णपणें सुंदर करतें, सूज्ञ करतें, थोर करतें, सुखी करतें, चांगला करतें.

मी आज बदलत्या काळांत आहे. माझ्या जीवनाची घडी अजून बसायची आहे. तरी ईश्वरावर माझा विश्वास आहे; आत्मा अमर आहे असें मला वाटतें. पावित्र्य, सत्य, सौंदर्य यांना मी मानतों. आपणांस क्षमा केली जाईल या श्रद्धेनें जीवाचा उद्धार होईल असें मला वाटतें. प्रेम, भक्ति, पूज्यभाव यांना मी मानतों. कर्तव्य व नैतिक जाणीव मी मानतों. प्रार्थनाही मी मानतों-तिच्यावर श्रद्धा आहे. मानवी मनांतील मूलभूत स्फूर्ति, उद्रेक, त्यांवर माझा विश्वास आहे. सर्व काळांत होऊन गेलेले जे दैवी प्रेरणेचे पुरुष, - जे संत व ऋषि त्यांच्या उद्गारांवर, निःसंदिग्ध सांगण्यावर माझा विश्वास आहे. आपला दैवीस्वभाव हा सत्य स्वभाव-आपलें उच्च स्वरूप हें आपलें खरें स्वरूप असें मला वाटतें.

एवढयानें मनुष्याला धर्माचें तत्त्वज्ञान मिळेल का ? कदाचित् शक्य आहे; परंतु ह्या वेळेस तरी मला तें स्पष्टपणें दिसत नाहीं. अध्यात्मशास्त्राचा- माझ्या अध्यात्मशास्त्राचा विचार करण्याचें मी आज किती दिवस बंद केलें आहे मी अलाकडे दुसऱ्यांच्याच विचारांत जगतों; इतका कीं, मला कांहीं श्रद्धेची-माझ्या समजुती, माझे विश्वास यांना स्थिरता आणण्याची कांहीं जरूर आहे का असें मी स्वतःला विचारण्यास तयार आहे. होय, जरूर आहे. माझें मत काय, माझें निश्चित मत काय याची मला जरूर आहे. दुसऱ्यांना सांगण्यासाठीं व स्वतः त्याप्रमाणें आचरण्यासाठीं अशा निश्चिततेची मला जरूर आहे. अभ्यासासाठीं, चिंतनासाठीं, शिकण्यासाठीं त्याची तितकी जरूर नाहीं.

× × ×

———

१२१

फिरायला गेलों होतों. वातावरण कमालिचें पवित्र नि विशुद्ध होतें. उबदार सौम्य असा सूर्यप्रकाश अंगाला बिलगत होता. सर्व जीवनांत आनंद भरलेला होता. एका बाकावर अवाक् असा मी बसलों होतों. जणुं ध्यानस्थ मुनि. माझ्या शेजारीं उतरण होती. तिच्यावर हिरवळ व शेवाळ दिसत होतीं. थोडा वेळ मी तन्मय होतों. अत्यन्त आनंदांत होतों. दूरच्या प्रार्थना मंदिरांतून लष्करी बँडची गाणीं ऐकूं येत होतीं. त्या गानलहरींवर मी पोहत होतों. त्यांच्याशीं खेळत होतों. त्या गानलहरी माझ्या चोहोंबाजूंस उसळत होत्या. मी सर्वतोपरी सुखी होतों. केवळ सुखी. मी कर्महीन होतों. मी कवि होतों, चित्रकार होतों. सर्वच गोष्टींत मला आनंद वाटत होता. माझ्या बाल्यांतील नि तारुण्यांतील शेंकडों स्मृति, विस्मृत अशा गोष्टी मला भेटायला धांवून आल्या. ज्याच्या जीवनांतून नुकतेंच काव्य प्रकट व्हायला लागले असतें, अशाच्या मनावर, हृदयावर. आत्म्यावर सृष्टींतील नाना रंगाचा, अनंत छटांचा, विविध गंधांचा, कूजनाचा, सूर्यप्रकाशाच्या हिरण्यागार कुंचणांचा एक अपार नि अपूर्व असा परिणाम होत असतो. ते सारे भूतकालीन परिणाम मला आठवले. ते अवर्णीय ठसे पुन्हां जागे झाले. निष्पापता, सरलता, अज्ञान हीं ज्याप्रमाणें साधीं असतात, त्याप्रमाणें साधा होऊन, लहान मुलाप्रमाणें होऊन या जगांकडे कौतुकानें नि आदरानें मीं पाहूं लागलों. स्वतःला जीवनाच्या नि निसर्गाच्या स्वाधीन केले. त्यांनीं मला पाळण्यांत घालून अपरंपर प्रेमानें आंदुळले. सदा पावन आणि पवित्र अशा सृष्टीमाऊलीसमोर पवित्र भावनेनें आपलें सारें हृदय उघडे करून दाखविणें आणि तिचा त्याला स्पर्श होऊं देणें, वस्तूमधील अमर जीवनाला आपल्या जीवनावर खोल ठसा उमटवायला, आपल्या जीवनाचा ठाव घ्यायला मोकळेपणें मुभा देणें-म्हणजेच प्रभूच्या हांकेस ओ देणें होय, त्याच्या शद्बास मान देणें होय. आपल्या मनावर होणारा एक संस्कार, प्राप्त होणारी एक नव संवेदना

म्हणजे ती प्रार्थनाच असते. आणि स्वतःला विसरून जाणें म्हणजेच भक्ति होय.

× × ×

१२२

आपल्या फ्रेंच भाषेंत प्रत्येक वस्तुला आकार द्यायची फार धडपड. सारें ठरीव, रेखीव, निश्चित, पक्के पाहिजे. फ्रेंचांना आकाराचें महत्त्व आहे, अर्थाचें नाहीं. कसकसें होत येते इकडे त्यांचें लक्ष नसतें. परिणाम काय, निर्णय काय, निकाल काय, काय ठरलें याची फार धांदल. अंतरंगापेक्षां बाह्याला फार महत्त्व. विचारापेक्षां देखाव्याला जास्त महत्त्व. आत्म्यापेक्षां देहाला महत्त्व, त्यांना ध्येयाचा ध्यास आवडत नाहीं. ध्येय हवें, सिद्धि हवी, सिद्धीसाठीं खटाटोप नको. प्राण आवडतें परंतु प्राण्याचा पथ आवडत नाहीं. थोडक्यांत सारें कांहीं तत्पर केलेले आवडतें. तयार केलेले विचार, भाजलेल्या पक्क्या भाकरी. लेसिंगच्या तत्त्वाच्या अगदीं विरुद्ध असें हें आहे. तयार झालेल्या, सिद्ध झालेल्या वस्तूकडे केवळ पाहणें हीं बाह्य दृष्टि आहे. तेथें स्पष्टता असते, निःसंदिग्धता असते. परंतु ती वरपांगी असते. ती वस्तु कसकशी बनत आली, तो सिद्धांत कसा जन्मला याचें ज्ञान कांहींच नसतें. नुसती शारीरीक कल्पना असतें. आकाराचें ज्ञान. परंतु मूळ उगमाचें, आरंभाचें ज्ञान नसल्यामुळें, अज्ञान मला समजलें, अपारदर्शक पारदर्शक झालें, गूढ सुगम झालें असें म्हणण्याप्रमाणें हें आहे. स्वच्छ आणि स्पष्ट म्हणून जें वाटतें तें सूर्याच्या स्पष्ट दिसण्याप्रमाणें आहे. सूर्य स्पष्ट दिसतो म्हणून सूर्याचें सारें ज्ञान झालें असें म्हणतां येणार नाहीं. सूर्य दिसला परंतु समजला नाहीं. आपण वरवर वाळूंत खेळत असतो. आपला स्वभाव गंभीर नाहीं तो बहिरूपी, बहिरंगी आहे. आपला स्वभाव फुलपांखरी आहे. विषयी, विलासी आहे. कलावंताचा आहे, तत्त्वज्ञानाचा नाहीं. आपणांस आकार, मूर्ति, ठसा, सांचा, पद्धती या गोष्टी हव्या

असतात. खोल जीवन, आत्मा, परमात्मा, सृष्टींतील गूढ ह्या गोष्टी नको असतात.

× × ×

१२३

व्हॉवेहून जिनेव्हाला जात होतों. वाटेंत सरोवराच्या कांठीं उभा होतो. सरोवरावर एक प्रकारची खिन्न उदासीनता नि गंभीरता पसरलेली दिसत होती. तें अति शांत नि सुकुमार हळुवार असें दिसत आहे. पर्वतांची नि मेघांची खिन्न उग्र छाया त्याच्यांत पडली आहे. असें हें सरोवर मला कोणता बरें संदेश देत असेल ? जीवनावरचे मोहपटल जरी दूर झाले, जीवनांतील माया मोह तृष्णा जरी नाहीशा झाल्या, तरी जीवन कांहीं नीरस होत नाहीं. जीवनांत आनंद राहतोच. स्वर्गीय स्मृतीचे प्रकाश-किरण, कर्तव्याचें किरण जीवनाला कळा देतील, रंग चढवतील. जगांतील सर्व वस्तु क्षणभंगुर कशा आहेत, पटापट कशा पडद्याआड जातात हें माझ्या मनश्चक्षूंसमोर अगदीं स्पष्टपणें उभे राहिले. जीवित म्हणजे एकंदरींत दैवाची लीला आहे ! केव्हां काय होईल त्याचा नेम नाहीं. या अखिल-जीवन-प्रवाहाच्या खालीं दुःख नि औदासिन्य पसरलेलें आहे. परंतु दुःख नैराश्याच्याही खालोखाल दुसरेंहि एक गंभीर सत्य असते. आणि तेंहि मला स्पष्टपणें दिसून आलें.

× × ×

१२४

ज्या वेळेस निश्चित, विवक्षित असें आपण कांहीं करित नसतो त्याच वेळेस आपले खरे जीवन आपण अनुभवित असतों. कधीं कधीं आपली वाढ करण्याचे आपण थांबवितों. त्यांतील हेतु एवढाच असतो कीं झालेली

वाढ पक्की व्हावी. आपण स्वतःसि आपलेसें करावें. इच्छाशक्ति, क्रियाशक्ति या जरी स्तब्ध राहिल्या तरी निसर्ग नि काळ स्तब्ध नसतात, रिकामी नसतात. आपल्या जीवनाची नाव आपण चालवित नसलों तरी ती चालूच असते. आपली इच्छा असो वा नसो; आपण कांहीं करीत नसलों, इच्छित नसलों तरीहि आपलें जीवन आपणांस घेऊन त्या त्या निश्चित अवस्थांतून पुढें जातच असतें; आपलें रेशमी तंतूंचें नाजुक, सूक्ष्म परंतु बळकट जाळें विणीतच असतें; आपली भवितव्यता आपली परिपूर्णता करितच असते. आपल्या आयुष्याचें प्रत्येक घटकापळ आपल्या पूर्णतेकडे आपणांस नेत असतें; म्हणजेच त्या अंतिम दशेकडे मरणाकडे नेत असतें; जीवितांतील ही क्रिया अपरिहार्यपणें सतत सुरू असते. तुम्ही झोंपा, कर्मशून्य असा. या क्रियेंत, मरणाकडे जाण्याच्या गतींत खंड पडत नसतो. ह्या क्रियेला आपण नैतिक वळण दिलें, स्वतंत्र वळण लावलें तर मग भीति वाटण्याऐवजीं आनंदच वाटेल.

× × ×

१२५

मनुष्याचें खरें वैशिष्टय तो मूर्खांजवळ, अज्ञानी लोकांजवळ कसें वर्तन ठेवतो, यांत आहे.

× × ×

१२६

न आवडणाऱ्या मतांचा नि विचारांचा स्वीकार करतांना आपणांस फारच मानसिक त्रास होतो. तसेंच जे लोक तुमचे गुण ओळखतात, त्या गुणांची स्तुति करतात, त्या लोकांजवळ सदाभिरुचि नसेल असें मानायलाहि फार मानसिक त्रास होतो.

× × ×

१२७

आपली दुर्बलता ही आपली कसोटी आहे. आपला वाईट स्वभाव हें खरें संकट आहे. आपल्या सर्व महत्वाकांक्षा, आपल्यांतील सारीं सोंगेंढोंगें यांचें हवन करणें, यांत खरी नम्रता नाहीं का ? सद्सद्विवेकबुद्धीच्या उड्या नि तिच्यांतील कृत्रियता या गोष्टी दूर करामला हव्यात. खरी नम्रता समाधानी असतें.

× × ×

१२८

मनुष्याला ज्या गोष्टींचे अंकुर स्वतःमध्यें दिसतात, त्याच गोष्टींचें तो आकलन करूं शकतो.

× × ×

१२९

आपण सदैव सत्यनिष्ठ राहूं या. जीवनाची नि कलेची ही परिसीमा आहे. वक्तृत्व, सद्गुण, नैतिक सामर्थ्य या सर्वांचें इंगित, या सर्वांची किल्ली सत्यनिष्ठेत आहे.

× × ×

१३०

लहानशा तृणपर्णांतहि इतिहास सांठवलेला असतो. कोणाचेंहि हृदय घ्या, उघडून पहा. तेथें नाना नवल कथा तुम्हांला आढळतील. असें एकहि जीवन नाहीं ज्यांत गुप्त असें कांहीं नाहीं. हें गुपित कधीं विंचवाच्या नांगी-प्रमाणें कंटकशल्याप्रमाणें असतें तर कधीं घोड्याला मारलेल्या टांचेप्रमाणें

पुढें नेणारें असतें. आपणांला जिकडे तिकडे शोक, आनंद, सुखदुःख, आशानिराशा यांचीं द्वंद्वें दिसून येतील. हजारों वर्षांचे जुने सांगाडे, वाकडे झालेले शरीराचे अवयव, त्यांच्यांतहि तारुण्यांतील दुःखें प्रक्षोभ तुम्हांला दिसून येतील, त्यांच्या खुणा तेथें दिसतील. कवि नि व्याख्याते प्रवचनकार नि कीर्तनकार यांना हा विचार फार आवडतो. हा विचार म्हणजे जादूची कांडी आहे. चर्मचक्षूंना न दिसणारें या विचारामुळें दिसूं लागतें. चर्मचक्षूं-वरील पटलें या विचारामुळें दूर होतात; आणि मानवी जीवनाची यथार्थ कल्पना आपणांस येते. अज्ञात व अश्रुत असें दिव्य संगीत आपणांस ऐकूं येऊं लागतें. संगीतसागर उचंबळून येतो. निसर्गाच्या हजारों भाषा आपणांस समजूं लागतात. ज्याचा प्रेमभंग झालेला आहे त्याला सर्वांची भाषा कळेल; जो दुःखाच्या आगींतून गेलेला आहे त्याला सारें सुंदर दिसेल, त्या सर्वांची हृदयें कळतील. तो भविष्यज्ञानी होईल, जादुगार जणुं होईल.

× × ×

१३१

हवेचा मनुष्याच्या मनावर किती विलक्षण परिणाम होतो, ही गोष्ट आज सकाळीं मी चांगलीच अनुभवली. मी इटालियन किंवा स्पॅनिश जणुं झालों होतो. अशा निरभ्र नि प्रशांत वातावरणांत निळें निळें आकाश वर पसरलेलें दिसत असतांना दक्षिणेकडच्या देशांतील हा सूर्यनारायण वर तळपत असतांना, तुमच्या आजुबाजूच्या निर्जीव भिंतीहि तुमच्याशीं बोलूं लागतील, हसूं लागतील, आनंदित दिसतील. चेस्टवटचीं झाडें तर अगदीं बहरलीं होतीं. फांद्यांच्या वळलेल्या टोंकांजवळ त्या चमकणाऱ्या कळया ज्वालाप्रमाणें दिसत होत्या. निसर्गाच्या चिरंतन महोत्सवाची त्या कळया तयारी करीत होत्या. सर्वत्र चैतन्य, तारुण्य, कारुण्य, प्रेम, सहानुभूति, सुंदरता, सुभगता, हीं दिसून येत होती. तृणपर्णावर दंवबिंदु पडल्यामुळें त्यांना आलेली टव-टवी, अंगणांतील निर्मळ छाया, तीं प्राचीन प्रार्थना मंदीरें, त्यांचें ते भक्कम

कळस, बुलंद मनोरे, रस्त्यांच्या पांढऱ्या स्वच्छ कडा, सगळें सुंदर दिसत होतें. मला लहान मुलाप्रमाणें वाटलें. वृक्षवेलींतून नव जीवनरस संचरावा तसें मलाहि वाटत होतें. साधी सरळ सुंदरता! या सुंदरतेत किती मधूरता आहे! साधीं सुखें गोड असतात. माझें वय १८ वर्षांचें असतांना बॅंड ऐकून जसें माझें हृदय थै थै नाचे, तसेंच आजहि मला वाटत होतें. प्रभो, तुझे किती आभार मानूं, तुला किती धन्यवाद देऊं, किती कृतज्ञ राहूं? किती तरी दिवसांपासून मी स्वतःला वृद्ध समजतों आहे! परंतु हे काव्या, हे निसर्गा, हे तारुण्या, हे प्रेमा, या सर्वांनो या. तुमच्या अभ्दुत जादुच्या हातांचा स्पर्श करून माझें जीवन पुन्हां पल्लवित करा, कोमल करा. तुमची अमर आकर्षणें, मोहने माझ्या जीवनांत पुन्हां गुंफा; तुमची मोहक गीते पुन्हां ऐकवा. अमृतत्वाचा पेला माझ्या ओंठांना लावा, आत्म्याच्या परमोच्च पर्वतावर मला घेऊन जा; परंतु नको. हा केवळ सुखानंदाचा पंथ मला नको. हे सुखदुःखाच्या, जीवनमरणाच्या देवा, माझ्या बाबतींत तुझी इच्छा असेल तसें होऊं दे. दुःखहि गोड आहे. आनंद तर आहेच आहे. आज मला आनंदाच्या उद्यानांतून तूं घेऊन जात आहेस. तुझ्याजवळून मी आज आनंद लुटून घेत आहे आणि त्याबद्दल मी कृतज्ञ आहे.

× × ×

१३२

हवा किती प्रसन्न आहे! आकाश निरभ्र आहे. ढग नाहीं, थंडी नाहीं. उबदार वाटत आहे. दिवसा पक्षी गातात रात्री ताऱ्यांचे संगीत सुरू होते. ही सृष्टि केवळ दयामय, करुणामय झाली आहे. या कारुण्यांत सुंदरताहि फुललेली आहे. कारुण्यावर लावण्याचा वेष.

या रमणीय भव्य दिव्य दृश्याच्या चिंतनांत मी जवळ जवळ दोन तास गढून गेलों होतों. अनंत परमात्म्याच्या मी मंदिरांत आहे असें मला

वाटलें. अनंत जगें माझ्यासमोर पसरलेली आहेत असा भास झाला. सृष्टि-देवतेकडे मी देवाचा पाहुणा जणूं आलो होतो. अनंत तारे पृथ्वीवरून मला वर नेत होते. केवढी अवर्णनीय शान्ति! शब्दातीत शान्ति! चिरंतन जीवनाचे हे टवटवी देणारे दंवबिंदु! या बिंदूंचा माझ्या आत्म्यावर अभिषेक झाला. मी भक्त झालों होतों, उपासक झालों होतों. निळ्या सागरांत ही पृथ्वी नावेप्रमाणें नाचत आहे असें वाटलें. अशा शान्त गंभीर आनंदानें मानवी जीवनाला पुष्टी तुष्टी मिळत असते या आनंदानें मनाला बाळसे येतें. तें पवित्रपावन होतें, उदार नि उदात्त होतें. मी स्वतःला निसर्गाच्या चरणांवर वाहिलें. मी केवळ कृतज्ञतारूप झालो, केवळ विनम्रता झालों.

× × ×

१३३

किती तरी वेळ मी वाचित होतों. मानववंशशास्त्र, तुलनात्मक शरीर-शास्त्र, विश्वोत्पत्तीच्या नानाप्रक्रिया, किती तरी विषयांवर वाचित होतों. अनंत आकाशांतील दूर दूरच्या विश्वांपासून तों प्राथमिक पेशींतील अणुपर-माणूंपर्यंत मी संचार केला. दूरच्या गोलांच्या गती आणि अणुपरमाणूंच्या गती यांचें विवेचन वाचलें. मी अनंतामध्यें वाढत आहे असें मला वाटलें. दिक्कालाची बंधनें गळून माझा आत्मा मुक्त होत आहे असा भास झाला. अनंत सूर्य, आकाश गंगा, अगणित तारे, तारकापुंज, हीं विशाल पृथ्वी–हें सारें ब्रह्मांड एका बिंदुमध्यें सांठवल्याप्रमाणें मला दिसूं लागलें. ही सारी अनंत सृष्टि एका परिमाणहीन बिंदूतून निघाल्याचें दिसून येत होतें. सारें त्या निराकार बिंदूत विलीन होत होतें–शून्यांत सामावत होतें.

अमर्याद, अगणित चमत्कार! माझ्याभोंवतीं प्रचंड प्रश्न उभे राहिले. अनंत प्रश्नचिन्हें उभीं राहिलीं. किती कोडीं, कूट प्रश्न! ज्या विचाराची, हें विश्व बाह्य प्रतीकात्मक खूण आहे, तो असीम अनंत विचार माझ्या अंत-

रंगांत प्रज्वलित झाला; अनुभवास आला. मी म्हणजे शून्य आणि मी म्हणजे अनंत या दोहोंची सत्यता मी अनुभवली. या दोन्ही गोष्टींना मी स्पर्श केला. त्या माझ्या प्रत्ययास आल्या. प्रभूच्या वस्त्राचें जणुं मी चुंबन घेतलें. मी चैतन्यरूप, जीवनरूप असल्यामुळें प्रभूला धन्यवाद दिले. असे क्षण परम दैवी असतात. मनुष्याला अशा प्रसंगींच अमरत्वाची साक्ष पटते. तें जें शाश्वत, चिरंजीव तत्त्व, त्याच्या ज्ञानाचा नि कर्मांचा विचार करायला अनंत काळहि अपुरा आहे या गोष्टीची मला खात्री पटली. अशा वेळेस आपल्या हृदयांत भक्तिभाव जन्माला येतो, आनंदहि भरतो. प्रेमाची खरी जिवंत नम्रता अंगीं येतें.

× × ×

१३४

अपकार करणारा प्रत्येक विचार आपणांस ओढून घेत असतों. खोल दरींत डोळ्यांसमोर अंधेरी येऊन ज्याप्रमाणें आपण पडतों तसेंच मोहाच्या तोंडांत आपण सांपडतों. इच्छाशक्ति दुबळी असली कीं विचारशक्तिहि दुबळी होते. आणि मग खोल दरीचाहि मोह पडतो. मारणारी ती दरी आपणांस आधार देणारी वाटते. भयंकर धोका! कारण ही दरी बाहेर कोठें नसून आपल्यांतच आहे. या दरीचें तोंड एखाद्या प्रचंड सर्पाच्या जबड्याप्रमाणें पसरलेलें असतें. ही दरी तुम्हां आम्हांला गिळंकृत करायला सदैव तयार असते. ही दरी आपल्या अंतरंगांत खालीं खोल आहे. आणि आपलें स्वातंत्र्य या दरीवर तरंगत असतें. ही दरी आपलें स्वातंत्र्य भक्षायला टपलेली असते. ज्याला आपण सद्सद्विवेकबुद्धि म्हणतों तें नैतिक सामर्थ्यच आपला तरणोपाय आहे. आपल्या अंतःकरणांत कधीं न विझणारी अशी एक ज्योति आहे. कर्तव्य म्हणजे ज्योतीचा प्रकाश आणि प्रेम म्हणजे तिची ऊब. ही लहानशी ज्योत म्हणजे आपल्या जीवनाचा संरक्षक तारा. आपली हेलकावणारी नौका वादळी समुद्रांतून बचावून न्यायला हा ध्रुवताराच उपयोगी पडतो.

समुद्रांतील मोहांपासून, संकटांपासून ही ज्योतच तारील, वांचवील. अंधार भ्रम यांपासून सुटणाऱ्या वादळापासून त्याच प्रमाणें सैतानापासून ही अंतरंगींचा ज्ञानदिवाच सांभाळील. अंतःकरणांत ही ज्ञानज्योत कोण पेटवतो ? श्रद्धा. त्या परममंगल, परमदयाळू प्रभूवराच्या श्रद्धेनें ही ज्योत पेटते. तो प्रभु माता तो पिता – या जीवंत श्रद्धेतून ती ज्योत प्रज्वलित होत असते त्या प्राथमिक अवस्थेंत दुबळा मानव या विश्वांत उभा राहिला. दशदिशांत भीषण संकटे, भयंकर आपत्ति. त्यानें त्यावेळेस पहिलें भव्य भीषण काव्य निर्मिले. नाना देवदेवतांचा जन्म झाला. भीत भीत त्यानें त्या अनंत देवांना प्रणाम केला. तें सारें काव्य माझ्यासमोर उभे राहिलें. परंतु त्या सर्वांतून शेवटी एकच वस्तु सारभूत अशी वर आली. ती म्हणजे ईश्वर आणि हें सभोवतालचें विश्व. या चराचरांत एकप्रकारची एकसूत्रता आहे याची प्रचीती माझ्या अंतरिंद्रियांस किती स्पष्टपणें येत आहे ! ह्या अनंत ब्रह्मांडाच्या रचनेंत प्रभूचा जो हेतु आहे, जो संकल्प आहे; जो हेतु या अनंत जीवनांत, या सर्व दिक्कामांत ओतप्रोत भरलेला आहे; जो हेतु प्रत्येक वस्तुमात्रांतून प्रकट होत असतो; ज्या हेतूचें संकल्पाचें संगीत अनंत सुसंवादाच्या बंधनांत सदैव सुरू आहे–असा तो प्रभुचा हेतु, त्याचा संकल्प मला प्रतीत होत आहे असें वाटलें. मी कवचें विदारून आंत खोल पाहूं शकत आहे. नरकांतील अंधारमय प्रदेशांतून मी प्रकाशधामाकडे वर चाललों आहे असें मला वाटलें. दुःखदुर्दशेंतून, रौरवांतून नंदनवनाकडे मी चाललों आहे असें मी अनुभवित होतों. स्वर्ग, नरक, पृथ्वी, हीं सारीं आपणांतच आहेत. मानव म्हणजेच अथांग दरी.

× × ×

१३५

एकंदरींत असें हें आपलें जीवन आहे. समुद्राच्या लाटांवर इतस्ततः फेंकल्या जाणाऱ्या नावेप्रमाणें हें जीवन आहे. ती नांव लाटांमुळें ओली होते, फेसानें कापली जाते, किनाऱ्यावर फेंकली जाते; कधीं आंत ओढली जाते.

लाटांच्या लहरींवर ती नाव विसंबून असते. आपलें जीवन तसेंच आहे. वासनाविकारांचें जीवन असेंच असायचें. जेथें हृदयाला प्राधान्य आहे जेथल्या जीवनाची हीच कुतरओढ. स्टोइक लोक, तो तत्त्वज्ञानी स्पायनोझा ज्या जीवनाचा तिरस्कार करतात, निंदा करतात तें हें जीवन. गंभीर, पावन, ध्यानमग्न जीवनाच्या हें अगदीं विरुद्ध असें जीवन आहे. प्रशांत जीवनांत मनुष्याचें मन स्थिर नि सम असते. तारकांच्या प्रकाशाप्रमाणें स्थिर असतें, अचल असतें. अशा जीवनांत मनुष्य शांत समाधानी असतो आणि अनंतत्वाच्या संदर्भात प्रत्येक वस्तूकडे पाहतो. हें जीवन सद्सद्विवेकबुद्धीच्या विरुद्ध आहे. कारण तिच्या प्रांतांत फक्त ईश्वरच बोलत असतो. ईश्वराच्या प्रतीयमान इच्छेसमोर आपली इच्छा शरण जात असते.

हीं तिन्ही प्रकारची जीवनें मला माहीत आहेत. या त्रिविध जीवनांचा अनुभव घेत मी फिरत असतों. परंतु कोठेंच स्थिर रहात नसल्यामुळें कोठल्याच जीवनाचा खरा आनंद, खरा फायदा मला मिळाला नाहीं. माझें मन भिडस्थ आहे, त्यामुळें त्याचा कोंडमारा होतो. माझें मन हृदयाच्या आशा, इच्छा चिरडून टाकीत नाहीं. सद्सद्विवेकबुद्धीचाहि गोंधळ उडतो. सद्सताचा नीट निर्णय तिला करतां येत नाहीं. परस्पर विरुद्ध अशा इच्छांच्या कोलाहलांत कर्तव्याची हांक, ईश्वरी इच्छेचा ध्वनि तिला ऐकूं येत नाहीं. साधीभोळी श्रद्धा, तीहि माझ्यापाशीं नाहीं. आत्मविश्वासाच्या अभावामुळें निश्चयात्मिका बुद्धि नाहीं. यामुळें झालें आहे काय कीं माझें सारें जीवन केवळ संशयात्मक झालें आहे. सर्वत्र साशंकता, अश्रद्धा, माझ्या वैयक्तिक जीवनाची मला भीतिच वाटते. कोणत्याहि प्रकारचा उद्योग, साहस, प्रतिज्ञा, निश्चय, वचन, अधिकार माझ्याजवळ यांतील कांहींच नाहीं. माझें स्वरूप ज्यामुळें प्रकट होईल असें कोणतेंहि कर्म करायला मी तयार नसतों. कर्माला मी भितों. कृतीचा मला बाऊ वाटतो. वैचारिक जगांत, अभूर्तीत रमायला मला आवडतें. अव्यक्त जीवनांत माझा आनंद आहे; समाधान आहे. माझी बुद्धि भित्री झाली आहे आणि हा भित्रेपणा सतत विचार करीत राहण्याच्या संवयींतून जन्मला आहे. सतत विचार करण्याच्या संवयीमुळें माझ्यांतील स्फूर्ति, अभिजात शक्ति, भावना, विकार सारें जणूं मरून

गेलें आहे. आत्मविश्वास मेला. धैर्य निघून गेलें. ज्या ज्या वेळेस कांहीं करायची वेळ येते, त्या त्या वेळेस माझें कांहीं चुकलें तर, उद्यां पश्चात्ताप करण्याची पाळी आली तर असें मनांत येतें आणि हातुन कांहीं होत नाहीं. सर्वत्र अहश्य भीति मला दिसत असते; बुरखा घेतलेलीं भुतें दिसत असतात. लहानपणापासूनच असा हा रोग—हा दैवदुर्विलास मी अनुभवित आहें. हा रोग आतां नष्ट होणें शक्य नाहीं. आणि जीवन हातवारे करीत जरी आघात करायला आलें तरीहि सावध असण्याइतपत माझी तयारी सदैव असते. मी जीवनांच्या रणांगणांत ओढला जाणार नाहीं. याची तरतूद मी करून ठेवीत असतों. तितकी बळकटी माझ्याजवळ असते. परंतु ही बळकटी म्हणजेच माझी दुर्बलता. माझ्या शक्तींतच माझी अ–शक्ति आहे. माझी वंचना तर नाहीं ना होणार ही भीति मला सदैव असते. माझ्या स्वतःकडूनच माझी फसवणूक नाहींना होणार ? जीवनांतील साऱ्या सुखांना मुकलों तरी चालेल. परंतु माझ्याकडून कोणाची प्रतारणा न होवो आणि माझीहि कोणाकडून न होवो असे मला वाटत असतें. मला खालीं पहावें नाहीं ना लागणार, अपमानित नाहीं ना होणार–ही सारखी मनांत भीति असते. याचाच अर्थ हा कीं खालीं खोल अहंकार वसलेला आहे आणि तो माझा दोष असावा.

आत्मपृथक्करणानें, विचार केल्यानें ही गोष्ट खरी आहे असें वाटतें. परंतु वास्तविक तसें नाहीं. मला असें वाटत असतें कीं माझी अश्रद्धा, माझें दुर्दैव, माझें पाप जर कोणतें असेल तर तें हें कीं भविष्यकाळाविषयीं मला सदैव शंका असते. येथें अहंकाराचा प्रश्न नाहीं. आणि माझी शंका अपरिहार्य आहे. ईश्वराच्या चांगुलपणाची नाहीं परंतु त्याच्या न्यायीपणाची मला भीति वाटते. आपलें प्रत्येक कृत्य म्हणजे सूड घ्यायला बसलेल्या भवितव्यतेच्या हातांत दिलेला पुरावा होय. असें मला नेहमीं वाटतें आणि भीतीनें मी अर्धमेला होतों. परंतु प्रत्येक गोष्ट परमदयाळु प्रभूच्या हातांत दिलेली, विश्वासपूर्वक दिलेली गुप्त ठेव होय, या विचारानें शांति मिळते.

दुःख ही शिक्षा आहे; विपत्ति कांहीं दयाळुपणानें देव पाठवित नसतो; हा विचार मनांत आला म्हणजे एक प्रकारची धागधुग वाटूं लागते. सदैव स्खलनशील असल्यामुळें नेहमींच मला शिक्षा होणार असें वाटूं लागतें.

यामुळें कांहीं हालचाल करूं नयें या निर्णयावर मी येतो. पित्याच्या प्रयोग शाळत कोंडला गेलेला मुलगा स्फोट होईल या भितीनें कोणत्याहि वस्तूला हात लावायाला ज्याप्रमाणें भितो तसें माझें झाले आहे. आपले हात अनभवी, कशाला उगीच कोठें हात लावा असें जसें त्या मुलाला वाटतें तसेंच मलाहि ईश्वरावर, सृष्टिरूपानें प्रतीत होणाऱ्या प्रभूवर माझी श्रद्धा आहे. परंतु मोकाट सुटलेल्या पापमय वृत्तींची--सैतानाची मला भीति वाटते. जरा चूक झाली, पाप घडले, अपराध घडला तर त्याचा परिणाम म्हणून नैतिक, शारीरिक कांहीं तरी अपाय होणारच असें मला वाटतें. आणि अशा चुकीबद्दल दुःख भोगण्याची मला लाज वाटते.

खोल दृष्टीनें पाहिले तर स्वतःचें हें फाजील स्तोम नाहीं कां ? हा अहंकारच नव्हें कां ? मानवी जीवनाच्या मर्यादा न ओळखणें असा नाहीं का याचा अर्थ ? या मर्यादांत राहून काम करण्याची तुझी तयारी नाहीं असा नाहीं का याचा निष्कर्ष ? विश्वाची जी व्यवस्था आहे तिच्या विरुद्ध हें बंड नाहीं का ? माझ्या किंकर्तव्यमूढ वृत्तीच्या मुळाशीं याच गोष्टी नाहींत कां ? मला सारें पाहिजे, नाहीं तर कांहींच नको, असा याचा **अर्थ** आहे. ही अमर्याद महत्वाकांक्षा आहे. आपण ही राक्षसी महत्वाकांक्षा पुन्हां कर्मशून्य आहे. कर्तव्यशून्य आहे कारण जागतिक परिस्थितीचा तिला तिटकारा येतो, वीट वाटतो. मला जी उत्कंठा वाटते, तिला ध्येय असें नांव देतां येणार नाहीं. कारण माझ्या उत्कंठेंतत अपमानित खंडित प्रतिष्ठा आहे. स्वतःहून कमी असें जें असेल त्याच्याकडे पाहायलाहि माझा दुखवलेला अभिमान तयार नसतो. माझ्या स्वभावांत परस्परविरोधी अनेक गोष्टी आहेत. संसार नीट करावा असें वाटतें तर सन्यासाकडेहि मन धांवतें. कधीं मी व्यक्तिवादी असतों तर कधीं विश्वाचा होतों. ह्या ओढाताणीमुळें गंभीरपणें अमुक एक करावें असें वाटत नाहीं. स्वतःकडे बघूं कीं त्या चिर सत्याकडे ? माझ्या स्वप्नसृष्टींत मला जी अनंतता दिसते, तिच्याशीं माझ्या व्यक्तित्वाची, या जगताची मी तुलना करित बसतों. मनाच्या भिडस्थपणाची ही दशा असतें. औपचारिकरीत्या परिस्थितीचा मी विचार करूं लागतो. परंतु या गोष्टींचीं माझ्या हृदयांत आवश्यकता नसते कारण त्यांच्यांत कांहीं

दैवी आहे, अपरिहार्यता आहे असें मला वाटत नाहीं. मला कशांतच रस वाटत नाहीं. सारें निस्सार, बेचव आहे. मला कशाची पर्वा नाहीं. जे आहे त्याच्याविरुद्ध जरी मला तक्रार करायची नसली तरी त्यांत मला समाधान कधींच नसते. विजयी होण्याची माझ्यांत शक्ती नसली तरी मी माझा पराजय होऊं देणार नाहीं. भ्रमनिराश झालेल्या मनाचा, मोहमुक्त मनाचा हा एकान्तवास आहे. ज्या मनानें आशेलाहि दूर ठेवलें आहे त्या मनाचा हा एकान्त आहे.

परंतु ही परिस्थिति म्हणजे कसोटी आहे. ही सत्त्वपरीक्षा आहे. यांतहि ईश्वराचा हेतु असेल. खरी विरक्ति प्राप्त व्हावी म्हणून ही परिस्थिति आहे. खऱ्या वैराग्याची खूण म्हणजे भूतदया. मनुष्याला जेव्हां स्वतःसाठीं कशाचीच अपेक्षा नसते, तेव्हांच प्रेम करण्यास तो समर्थ होतो. मनुष्यांवर प्रेम करीत असाल तर त्यांचें हितमंगल पहा. ईश्वरानें तुम्हांला बुद्धि दिली आहे. त्या बुद्धीनें तुम्ही त्याची सेवा करावी म्हणून ती त्यानें दिली आहे. तिनें त्याची सेवा करून त्याला संतोषवा; या गोष्टीनींच जीवनांतील असमाधान दूर करण्याचा दुसरा मार्ग नाहीं. तुम्ही जगाविषयीं उदासीन नि बेफिकीर असता म्हणून हें असमाधान आहे.

× × ×

१३६

आत्म्याच्या शासनपद्धतींत एकतंत्री कारभार नाहीं. तेथें लोकसत्ताक राज्यपद्धतीचाच विजय होत असतो. तेथें हमकेरसो कायदा नाहीं. बळी तो कान पिळी प्रकार नाहीं. हुकूमशाही नाहीं. सद्भाव, सदसद्विवेकबुद्धि, इच्छा, विवेक, भूत, वर्तमान, प्राचीन मानव, अर्वाचीन मानव, दूरदर्शीपणा, उदारता या सर्वांच्या आवाजाला तेथें स्थान आहे. सारे आपआपली बाजू मांडतात. वादविवाद होतात. शब्दाशब्दी माजते, गोंधळ उडतो. प्रकाश जाऊन अंधार होतो. साधी इच्छाशक्ति हुकूमशाही स्थापूं पाहाते; तर

आत्मा न संपणारी चर्चाच करीत बसतों. एक व्यावहारिक दृष्टीनें बरोबर तर दुसरा तात्त्विक दृष्टीनें बरोबर. इच्छाशक्तीच्या प्रमाणें वागूं तर कांहीं प्रत्यक्ष कार्य होईल; आत्म्याचें अनुसरण करूं तर केवळ ज्ञान मिळेल.

परंतु सर्वोत्कृष्ट मार्ग म्हणजे आत्म्याच्या तिन्ही शक्तींचा अनुभव घेणें हा होय. सल्ला देणारा हवा त्याबरोबरच कृति करणाराहि हवा. माझ्या बाबतींतच पहा. विचार कर कर करतों. परंतु हातीं नवनीत येत नाहीं. कारण पाऊल टाकणें कधींच होत नाहीं. पुन्हां शंका, पुन्हां वाद, असेंच चालतें. माझ्यामध्यें हुकूम देणारा सेनापति आणि निर्णय देणारा न्यायाधीश दोघांचीहि उणीव आहे.

सारखें पृथक्करण करण्याची वृत्ति घातुक आहे. तिच्यामुळें आपल्यांतलि समन्वयाची, एकीकरणाची वृत्ति जर मारली जात असेल तर तें फार वाईट. विचारानें अंतःस्फूर्ति मारली जात असेल तो विचार नको. जिज्ञासेनें श्रद्धेचें उच्चाटन होणार असेल तर ती जिज्ञासा नको. एकीकरणाच्या वृत्तीपेक्षां पृथक्करणाच्या वृत्ति जर बलवान झाल्या, समन्वयाच्या वृत्तीपेक्षां विघटनात्मक वृत्तिच जर प्रभावी झाली तर ती भयंकर गोष्ट आहे. आत्म्याच्या शक्ति पांगतात. त्यांच्यांत मेळ रहात नाहीं. त्या सर्व शक्ति एकत्र आणून त्यांचें सामर्थ्य एका गोष्टींत ओततां येत नाहीं. सारा विचका होतो. ज्या वेळेस सार्वभोम राजा सत्ता सोडून जातो तेव्हां अंदाधुंदी, अराजक माजतें. आत्म्यानें अखेर सारी शक्ति एकवटली पाहिजे. माझ्या जीवनांत नेमका हाच धोका आहे. माझ्या जीवनांत मेळ नाहीं, सुसंवाद नाहीं, ऐक्य नाहीं, एकसूत्रता नाहीं. आणि त्यामुळें शक्ति, कृति, काव्य, वक्तृत्व—सारेंच अशक्य होत आहे. मी म्हणजे पृथक्करण, मी म्हणजे अखंड विचार. मी विभाग आहे, तुकडा आहे. वादविवादाचें मला वेड. कांटेकोर तर्कशास्त्र, काथ्याकूट याची मला हौस. आणि त्यामुळें दुर्बळ बनतों. पूर्णतेचा अखंड शोध मी करीत आहे. पृथक्करणात्मक शक्तीचा मी दुरुपयोग करित आहे. माझ्या नैसर्गिक वृत्तीप्रवृत्तींवर माझा सदैव अविश्वास. यामुळें सारें फुकट गेलें, जीवनांतील एकता, साधेपणा, श्रद्धा, सहजता, स्फूर्ती हीं सारीं माझ्यापासून

दूर निघून जात आहेत, निघून गेलीं आहेत, आणि म्हणून मला कांहींएक करतां येत नाहीं.

म्हणून विश्वाला गवसणी घालण्याची, सर्वज्ञ होण्याची महत्त्वाकांक्षा सोडून दे. स्वतःला मर्यादा घालायला शीक. कांहींतरी निश्चित ठरवून कार्य कर. जें तुझ्यांत आहे तें प्रकट करण्याचें धाडस कर; जें तुझ्यांत नाहीं त्याचा वाद सोडून दे; उगीच सोंगेंढोंगें, मोठे आव कशाला? स्वतःच्या वैशिष्ट्यावर श्रद्धा ठेव. आत्मविश्वासाच्या अभावामुळें तुझी धूळदाण होत आहे. श्रद्धा ठेव. शरण जा. स्वतःला प्रभूच्या हवालीं कर. श्रद्धा येतांच मनाचा रोग बरा होईल. अश्रद्धा म्हणजे मरण. नैराश्य, अंतःकरणांत नाना वृत्तींचे विरोधी वारे, विरोधी सूर उठणे, हा अश्रद्धेचाच प्रकार आहे.

सुखप्राप्तीच्या दृष्टीनें जीविताकडे बघाल तर प्रश्न सुटणार नाहीं. आपल्या अमर्याद महत्त्वाकांक्षा, आपल्या मोठमोठ्या उड्या आपल्या सुखाच्या आड येत असतात. कर्तव्याच्या दृष्टीनें जीवनाकडे पाहिलें तरी तीच अडचण आहे. कर्तव्य केल्यानें शांति मिळते परंतु सुख नाहीं मिळत. दैवी प्रेमानें, पवित्रतम वस्तूवरील, प्रभूवरील प्रेमानें त्याला आपलेसें करून घेऊनच हा प्रश्न सुटेल. जर आपणांस त्यागांतच आनंद वाटूं लागला, सदैव वर्धमान असा अमर आनंद यज्ञांत मिळूं लागला, तर आपल्या मनाची, हृदयाची उपासमार होणार नाहीं. मग आनंदाचा चारा सदैव मिळेल. कधीं तूट पडणार नाहीं.

× × ×

१३७

कालचा दिवस म्हणजे जणूं एक वर्ष असें वाटत आहे. माझ्या स्मृतींत गतकाळाचा सामान्य आराखडा राहतो. तपशील पुसून जातो. अनंत ताऱ्यांनीं भरलेल्या आकाशाकडे पहावें, त्याप्रमाणें मी भूतकाळाकडे बघतों. स्मृतीच्या खोल दरींतून एखादा दिवस पुन्हां काढून घेणें अशक्य आहे. सरोवरांत ओतलेलें पेलाभर पाणी पुन्हां तेंच बाहेर काढणें असें अशक्य

तसेंच हें. याचा अर्थ त्या वस्तूचा नाश होतो असा नाहीं. तर ती विरून जाते, विलीन होते. कष्टि समष्टींत, अंश अंशींत मिळून गेलीं. पाण्यावर काढलेल्या रेघोट्या ज्याप्रमाणें रहात नाहींत, त्याप्रमाणें काळाच्या अनंत भागांचा–घटकांपळांचा-हिशेब माझ्या जीवनांत रहात नसतो. माझें जीवन, माझें व्यक्तित्व म्हणजे प्रवाह आहे. माझें जीवन म्हणजे शरणागति. प्रभु ठेविल तसें राहणें.

× × ×

१३८

आपली भवितव्यता कशी बनेल त्याचा कांहींच नेम नसतो तेथें अकल्पित गोष्टी घडतात. पदोपदीं याचा अनुभव येतो. कोठेंतरी आपाततः एखाद्या झाडाचें बीं पडतें. पावसाचे चार थेंब पडून त्याचा वृक्ष होतो आणि न जाणो त्याच वृक्षावर आपण एकादे वेळेस फांशींहि दिले जायचे. आपण योजावें एक, होतें निराळेंच. आशीर्वाद म्हणून द्यायला जावें तों शापच तोंडून बाहेर पडतो! भवितव्यतेचा, नशिबाचा फेरा कोठून कसा येईल, बारीकशा निमित्ताची गांठ पडून त्याचे किती भीषण परिणाम होतील त्याचा नेम नसतो. आणि पुन्हां आपली शक्ति तेथें चालत नाहीं असा हा जीवनाचा कायदा आहे. अशी ही भवितव्यतेची नागिण आहे. ती कोठें कशाला विळखा घालून काय करील त्याचा नेम नाहीं. सारें फोल आहे, व्यर्थ आहे, असें शेवटीं म्हणावें लागतें. एकंदर संविधानकाचें तर्कशुद्ध सार म्हणजे कशांत कांहीं अर्थ नाहीं, कशाचा भरंवसा नाहीं हेंच येतें. दुर्दैवाची अशी कांहीं लीला असते कीं, आपणांस आपलीं दुःखें वाढवायला ती लावीत असतें. गिधाडें बनून आपण स्वतःलाच खाऊं लागतो. आपण आपल्या शक्ति, आपले गुणधर्म, सारें कांहीं शिक्षा नि प्रायश्चित्त यांना भट्टींत घालीत असतो. पदोपदी जणूं अग्निदिव्य. आणि असें करायला भाग पडून आपण खरोखरच निष्कारण आहोंत, एक क्षुद्र जंतु आहोंत असें भवितव्यता आपणांस कबूल करायला लावते. आपण केवळ कळसूत्री बाहुली आहोंत

हें आपणांस कळून येतें. जीवनाचा अभंग कायदा अनुभवास येतो. ईश्वरावर श्रद्धा असली तर होणाऱ्या शिक्षेचा बाऊ कमी वाटतो. परंतु शिक्षा नाहींशी होत नाहीं. ईश्वरी रथाचीं चाकें आपणांस प्रथम चिरडून टाकतात. कारण न्यायाची पूर्णता व्हावयास हवी. मनुष्याला धडा शिकवायलाच हवा. परंतु न्यायाच्या पांघरूणाखालीं दया आहे हें पटविण्यासाठीं आपणांस प्रभू वर उचलून घेतो. तो आपणांस हात देतो, उठवतो. पश्चात्तापापूर्वी क्षमा नाहीं. आणि पश्चात्तापाचा आरंभ नम्रतेंत आहे. जोंपर्यंत आपणांस आपले सारे अपराध क्षुद्र नि साधे वाटत असतात, आपण गुन्हे केले असें मानण्याऐवजीं त्याचें समर्थनच करित असतो, आपण दाखविलेला उद्धटपणा नि बेफिकीरी यांचें आपणांस कांहींच वाटत नसतें, जोंपर्यंत आपण कुरकुरतच असतो, ईश्वर म्हणजे एक निष्ठुर हुकूमशहा आहे असेंच म्हणतो, जोंपर्यंत घडणाऱ्या गोष्टींबद्दल, नशिबाबद्दल आपण चरफडतच राहतों, ईश्वराच्या न्यायीपणाविषयीं जोंवर साशंक असतो, तोंपर्यंत खरी नम्रता, खरा पश्चात्ताप नाहीं असें समजावें, ज्यावेळेस पापाचें प्रायश्चित्त घेण्यास आपण तयार असतों, त्याचवेळेस आपला बचाव होण्याचा संभव असतो. शिक्षा घेण्यास तयार व्हा. म्हणजे शिक्षा वांचेल, ज्यावेळेस संपूर्ण शरणागति होते तेव्हांच ईश्वरी क्षमा होतें; ईश्वरी कृपा होते. दुःखाचा हेतु पूर्ण झाला असें जेव्हां प्रभु पाहतो तेव्हांच तें दुःख तो दूर करतो. दुःख पाठवण्यांत त्याचा हेतु असतो. कसोटीची आतां जरूरीं नाहीं असें दिसून येईल तेव्हांच ती थांबेल. एरव्हीं नाहीं. आणि म्हणून कसोटी कधीं संपतच नाहीं. या जीवनांत जीं नानाविध दुःखें आहेत त्यापासून बचाव करून घ्यायचा असेल तर प्रभूच्या न्यायीपणावर नि दयाळूपणावर श्रद्धा ठेवा. हाच उपाय, हाच एक आधार परमेश्वर न्यायी असला तरी तो वत्सलही आहे या श्रद्धेनें आपणांस धीर येईल. आपल्या सर्व दुःखांचा उगम अश्रद्धेत आहे. आपल्या बाबतींत प्रभूनें जें घडवलें त्याच्या योग्य योग्याविषयीं आपल्या मनांत शंका येतें. त्याच्या कायद्यापेक्षां आपण अधिक शहाणें आहोंत असें आपणांस वाटतें. ईश्वरानें हें घडवलें असें म्हणण्याऐवजीं हें सहज घडलें असें आपण म्हणतो. शरण

जाल तर स्वतंत्र व्हाल हें ध्यानांत धरा. केवढा विरोधी भास, केवढा गंभीर प्रश्न! परंतु अखेरीस या प्रश्नाकडे आल्याविना गत्यंतर नसतें.

× × ×

१३९

वयानें वाढत जात असतांही तरुण राहतां कसें येईल ? केंस पांढरे होत असलें तरीही तारुण्य कसें टिकेल ? काय याचें रहस्य आहे, किल्ली आहे ? स्वतःच्या हृदयांत स्वतःबद्दल आशा व उमेद असणें, उत्साही असणें, काव्य, चिंतन, उदारता, दया—यांच्या योगानें आनंदी राहणें ही ती किल्ली आहे. थोडक्यांत सांगावयाचें झालें तर हृदयांत शांती व सुव्यवस्था राखून; हृदयाचें आत्म्याचें संगीत अनुभवून जेव्हां सर्व कांहीं व्यवस्थित असतें, योग्य वस्तु योग्य ठिकाणीं जीवनांत असतें, तेव्हां आपण ईश्वराचें जें सर्व कर्म-कार्य त्याच्याशीं सुसंबद्ध असतों. चिरंतन सुंदरता व चिरंतन सुव्यवस्था—हिच्याबद्दल उत्कट व जिव्हाळयाचा गंभीर व खोल उत्साह असणें, भावनांनीं नटलेली बुद्धि, हृदयाशी शांत व गंभीर प्रसन्न कोमलता-बुद्धीच्या परिपक्वतेचा ह्यांत पाया आहे. परिपक्व बुद्धीचीं हीं मुलें आहेत.

पक्वबुद्धि, परिणतप्रज्ञा ! केवढा अनंत विषय ! अवर्णनीय वस्तू ! या पवित्र विचाराच्या भोंवतीं शांत व गंभीर जणुं प्रभावलय आहे असें वाटतें. या एका शद्बांत, या एका विचारांत सर्व नैतिक अनुभवांचें सार सांठवलेलें आहे; सर्व नैतिक अनुभवांची संपत्ति सांठलेली आहे. चांगल्या रीतीनें दवडलेल्या जीवनाचें हें परिपक्व फळ आहे. शहाणपणा कधीं म्हातारा होत नाहीं. शहाणपण म्हणजे व्यवस्थेचें मूर्त स्वरूप,–म्हणजेच अनंताचें स्वरूप. जो शहाणा पुरुष आहे, जो प्रबुद्ध आहे त्यालाच जीवनांतून सारसौंदर्य काढून घेतां येईल. जीवनाच्या प्रत्येक स्थितींतून तो कांहींतरी मोलवान् मधुर मिळवून घेईल. कारण जीवनाचें खरें सौंदर्य, जीवनाची भव्यता व दिव्यता, जीवनाचें मोल तोच एक ओळखतो. त्याच्याच हृदयाला या गोष्टी माहीत

असतात. तारुण्याचा बहार, तारुण्यांतील फुलें सुकून जातील; परंतु जीवनांतील शरद्, वसंत एवढेंच नाहींतर शिशिरसुद्धां सुंदरच असतो. त्या प्रत्येकाची विशेषभव्य शोभा असते. प्रज्ञ पुरुष तो पाहतो, ओळखतो आणि तिचें यशोगान गातो. "सर्व कांहीं ईश्वरानें व्यापलें आहे-ईशावास्यंमिदं सर्वे-यत्किंच जगत्यां जगत्" अशा दृष्टीनें पाहणें, आपलें जीवन म्हणजे ध्येय मंदिराकडे जाणारी यात्रा करणें; कृतज्ञता, भक्ति, सौम्यता, धैर्य, यांनीं संपन्न होऊन जगांत रहाणें, जगणें, हें मार्कस् ऑरिलिअसचें उदात्त व थोर ध्येय होतें. यांना एक शरणागति आणखी जोडा. नम्रतेची यांत भर घाला. जगाला देणारी भूतदया, लोटांगण घालणारी शरणागति, या दोन गोष्टी त्यांत मिळवा म्हणजे ईश्वराच्या लेंकरांना लागणारें सर्व शहाणपण मिळालें; खऱ्या ख्रिश्चन मनुष्याचा अमर आनंदाचा वारसा तुम्हांला मिळाला. परंतु शहाणपणाला तिरस्कारणारी, त्याच्या शिवाय जीवन चालवूं पाहणारी ख्रिश्चॅनिटी ती भिती खोटी व दांभिक आहे! मी शहाणपणाच्या बाजूचा आहे. शहाणपणा मानणें म्हणजे देवाला मानणें होय. या जगांतच आपण देवाजवळ नीट वागलों असें होय. हें जीवन कोठल्या तरी पारलौकिक दूरच्या जीवनाशीं जोडणें, सद्गुणी मनुष्य व धर्मरत पवित्र मनुष्य दोन निराळ्या व्यक्ति आहेत असें मानणें हा खोटा धर्म आहे. मध्ययुगांत हीच चूक सर्वत्र केली गेली होती. कॅथॉलिक धर्मातील मूलभूत तत्त्वांतचही नाशकारक चूक आहे. खऱ्या ख्रिश्चन धर्मानें ह्या सर्व चुकीच्या कल्पनां दूर केल्या पाहिजेत. चिरंजिवन म्हणजे भविष्यकालीन जीवन नव्हे. सर्व विश्वाचे जें खरें स्वरूप-त्याची जी खरी घडी-तिच्याशीं आपलें जीवन एकरूप करणें-ईश्वरांत विलीन होऊन जगणें-म्हणजे चिरजीवन होय. काल म्हणजे अनंततेची गति होय असें पहावयाला आपण शिकलें पाहिजे. जीवनाच्या सागरावरील लहरी-हालचाल म्हणजे काळ आपली जाणीव अनंत अशी जुळवून घेतां येईल, अशा रीतीनें जगणें म्हणजे शहाणपणा होय. जें अनंत आहे तें जीवनांत मूर्त करणें, प्रकट करणें म्हणजेच धार्मिक होणें होय.

× × ×

१४०

अर्वाचीन साम्यवादी प्रथम परंपरागत कल्पनानिविष्ट असानती दूर करतो. वाटेल तसे दिलेले अधिकार, सत्ता तो दूर करतो. असल्या सवलती तो काढून घेतो. ऐतिहासिक गतानुगतिक होत आलेला अन्याय दूर करतो. एवढं करून तो आणखी पुढं जातो. मग गुणांमधील असमानता योग्यतेतील असमानता, कार्यक्षमतेतील, सद्‌गुणांतील असमानता-ह्या विरुद्ध तो बंड पुकारतो. न्याय्य तत्त्वाला अनुसरून तो आरंभ करतो, परंतु शेवटीं या न्याय्य तत्त्वाचें अन्याय्य तत्त्वांत परिणमत होतें. समानता जितकी वास्तविक, नैसर्गिक व सत्य आहे. तितकीच असमानताही वास्तविक, सत्य व न्याय्य असूं शकेल. त्याचा अर्थ तुम्ही काय करतां यावर अवलंबून आहे. परंतु ह्याकडेच कोणी नेमके लक्ष देत नाहीं. हें शोधून काढूं कोणी इच्छित नाहीं. सर्व विकारांना प्रकाशाची भीति वाटते. आणि समानतेबद्दलचें आपले अर्वाचीन वेड म्हणजे प्रेमाचें पांघरूण पांघरलेला आपला द्वेषच आहे.

× × ×

१४१

स्वातंत्र्य, समानता—वाईट खोडसाळ तत्त्वें! मानवजातीला एकच सत्य तत्त्व पाहिजे आहे-तें म्हणजे न्याय, दुबळयांच्या बाबतींत न्याय म्हणजे त्यांचें संरक्षण करणें, त्यांच्यावर दया करणें. (जे दुबळे आहेत—त्यांचा सांभाळ करणें, त्यांच्यावर दया करणें म्हणजेच त्यांच्या बाबतींत न्याय दाखवणें होय.)

× × +

१४२

एप्रिल महिना आज लहरी झाला होता. आज आपल्या पावसाच्या सरीच पडूं लागल्या. मध्येंच सूर्यप्रकाशाला पूर यावा, तर मध्येंच पावसाला

ऊत यावा असें चाललें होतें. पाळीपाळीनें आकाश हंसत होतें, व रडत होते, स्मितांची व अश्रूंची वृष्टि आळीपाळीनें होत होती. मधूनच वाऱ्याच्या झुळका येत तर-मधूनच एकदम वादळ उठे. एखादें लाडालाडानें बिघडलेलें मूल असावें त्याप्रमाणें आजची हवा आहे. त्या मुलाच्या इच्छा आणि लहरी एका घटकेंत जशा पन्नासदां बदलतात, त्याची मुद्रा जशी क्षणक्षणां पालटते तशी ही हवा आहे. झाडामाडांना मोठा आनंदाचा दिवस. त्यांची मजा झाली. आधींच वसंतऋतु होता. पालवी फुटत होती. त्यांत बरसात. झाडें कशीं टवटवीत दिसत आहेत. दरीसभोंवतीं पसरलेले पर्वत पायापासून माथ्यापर्यंत पांढरे स्वच्छ दिसत आहेत. परंतु तास दोन तास सूर्यप्रकाश पडला पुरे-बर्फ सारें वितळून जाईल. बर्फ ही सुद्धां एप्रिलला आलेली एक तात्पुरती लहर आहे; तात्पुरतें रंगभूमी सजवायचें एक साधन आहे; सीन बदलण्याची खूण होतांच तें एकदम अदृश्य होईल.

या जगांत सतत घटकेघटकेला, पावलोपावलीं फरक होत आहे. त्याला विश्रांति नाहीं. माझ्या मनावर याचा किती परिणाम होतो. बाहेरच्या जगांत जरा बदल झालेला लगेच मला कळतो. मी म्हणजे एक अगदीं सूक्ष्म वायुभारमापक यंत्रच आहे. दिसणें आणि अदृश्य होणें, उगवणें व मावळणें-यांत सर्व मनुष्यांचें जीवन आलें. जीवनाच्या लांबीरुंदीचें वर्तुळ कोणाचें जरा लहानमोठें असतें-परंतु या विश्वाच्या नाटकांत उदय आणि अस्त याशिवाय कांहीं एक नाहीं. हें जीवन म्हणजे धुराच्या लोटाची छाया आहे. चंचल अस्थिर; रित्या हवेंतील एक हालचाल; वाळूवर एक क्षणभर लिहिलेलें अक्षर, दुसऱ्याच क्षणीं तें पुसलें जातें. जीवनाच्या महानदींतील एक हवेचा बुडबुडा-फुगतो-फुटतो. मानवी जीवन म्हणजे दिसणें, मिरवणें, नाहींसें होणें. ( देखावा, निरर्थकता, पोकळता, शून्यता आहे. ) परंतु या विश्वात्मक विशाल जीवनाचें कांहीं नसणें हें मूर्तचिन्ह आहे-प्रतीक आहे. सर्व जगाचा जो इतिहास-त्याचें थोडक्यांत स्वरूप या क्षणभंगुर बुडबुड्यांत सांठवलेलें आहे.

या विश्वाचें जें काम चाललें आहे, त्यांत जो मनुष्य मदत करतो—मग त्याचें किती लहान का काम असेना, तें दिसून का येईना—तरी तो

जगला. हें सर्व विश्वयंत्र चाललें आहे, याची ज्याला जाणीव आहे-थोडी का होईना या विशाल जीवनाची ज्याला कल्पना आहे-तोही खरोखर जगला. ज्याप्रमाणें एखादें लहान चक्र मोठ्या यंत्रांत काम करीत असतें, त्याप्रमाणें स्वतःच्या कर्मानें सामान्य साधा मनुष्य जगाची सेवा करतो. विचारकर्ती बुद्धीनें, विचारानें सेवा करतो-जगाच्या मार्गावर प्रकाश देणारा खांब म्हणून त्याचा उपयोग होतो. चिंतनशील मनुष्य-जो बरोबरच्या यात्रेकरूंना उन्नत करतो, आशा देतो, धीर देतो, आधार देतो-स्वतः सारख्याच मर्त्य व निराधार लोकांना उत्साह देतो-तो आणखी जरा थोरपणानें जगाची सेवा करतो. कारण सामान्य मनुष्य व विचारवंत या दोहोंना तो जोडतो. कर्म, विचार व वाणी, आचार विचार व उच्चार जीवनाचीं हीं तीनरूपें आहेत. कारागीर, ज्ञानी आणि वक्ता-हे तिघे ईश्वराचें सेवक आहेत. करणें, शोधणें, शिकवणें-या तिन्ही गोष्टी म्हणजे श्रमच आहेत. या तिन्ही गोष्टी चांगल्या आहेत. सर्वस्वी आवश्यक आहेत. आपण जरी क्षणभंगुर असलों, क्षणजीवि असलों तरीही आपल्या पाठीमागें आपली खूण आपणांस ठेवतां येईल. जरी उल्काप्रमाणें क्षणप्रभ आपलें जीवन असलें, तरीही हें नाशिवंत क्षणिक जीवन मानवांच्या स्मृतींत ठेवून तें आपणांस दीर्घकालीन करतां येईल, निदान आपल्यानंतर होणाऱ्या ज्या घडामोडी-त्यांत आपला अंश ठेवून आपण दीर्घकाळ राहूं. सर्व कांहीं अदृश्य होतें; परंतु नाश कशाचाच होत नाहीं. मानवी संस्कृति, मानवी नगरी म्हणजे एक विशाल आध्यात्मिक गोपुर आहे, मंदिर आहे. नैतिक जीवनाच्या रूपानें जें जें या जगांत जगलें त्या सर्वांच्या श्रमानें हें मंदिर उभारलेलें आहे.

× × ×

१४३

आलस्समध्यें येतांच मी पुन्हां मूल होतों; बाळपणचा पोरकटपणा, अल्लडपणा सव माझ्यांत पुन्हां येतो. वयाचा बोजा मी फेंकून देतों. माझ्या नोकरी चाकरीचीं बंधनें, ते झगे आणि तीं पदकें सर्व दूर फेंकतों.

आपण समाजांत जितक्या दक्षतेनें व सावधगिरीनें वागतों ती सर्व दक्षता, ती अवास्तव सावधगिरी मीं दूर फेंकली आहे. आणि सुखाच्या आनंदाच्या पुरांत मी खोल बुड्या मारत आहे; व गंमत करीत आहे, मजा मारीत आहें. हृदय असें निश्चित अगदीं हलकें-फुलासारखें असलें म्हणजे माझ्या नेहमींच्या संबयी, नेहमींचें ठराविक वर्तन, ठराविक मतें माझ्यापासून गळून पडतात. मी प्रोफेसर आहे, मोठा विद्वान् आहें, शहरांत राहणारा आहें, अविवाहित आहे-हें सारें मी विसरतों. सर्व उपाधींपासून जणुं मुक्त होतों. माझें गतजीवन एखाद्या विस्मृत स्वप्नाप्रमाणें मला वाटतें. गतजीवन आठवतही नाहीं. एखाद्या सरोवरांत स्नान करून वर येतांच अगदीं निराळें होऊन यावें तसेंच माझें आत्मसमध्यें होतें.

मला खरोखर विश्वास वाटतों कीं, अगदीं लहानसें दुखणेंही माझी स्मृति विनष्ट करील; माझें सारें पूर्वजीवन पुसून टाकील. मी किती सहजतेनें अनायासें स्वतःलाच पारखा होतो हें पाहिलें; मी पुन्हां कसा अगदीं कोरा-करकरीत होतों, हें पाहिलें म्हणजे मला खरोखरच असें वाटतें. जीवन मला जणुं स्वप्नासारखें वाटतें. त्यामुळें फारशी अडचण न पडतां मरण्याच्या स्थितींत मी स्वतःला फेंकूं शकेन; हा सर्व वस्तु संभार, हें आकार भराभर शून्यांत जात आहेत असा देखावा मरणांतिक मनुष्य पाहतो—तसें मीही सहज पाहूं शकेन. प्रवाही पदार्थांप्रमाणें मी चंचल आहे. मी वाफेसारखा, मेघासारखा आहे. माझ्या जीवनांत सर्व कांहीं क्षणांत जाते, क्षणांत बदलतें, समुद्रांत लाटा उसळतात-एका पाठीमागून एक येतात व जातात—त्याप्रमाणें वस्तु येतात व पुसल्या जातात. जें कांहीं मी बोलतों, तें सारें चंचल, लहरी, बेफिकीरीचें, अपूर्ण, अर्धवट, केवळ बौद्धिक असें असतें. ज्या आत्म्याच्या गोष्टी आहेत, ज्या आपल्या अमर आकांक्षा आहेत, आपल्या खोल व दृढ आसक्ति आहेत, त्या चंचल अस्थिर कल्पनांच्या भोंवऱ्यांत ओढल्या जात नाहींत. सात वस्तु ह्या नाशिवंत आहेत. दुबळ्या निराधार आहेत. प्रत्येक मनुष्यालां मरणशय्येवर ह्याचा अनुभव येतो. आणि मला हा अनुभव सर्व जीवनांत येत आहे. हाच माझ्यांत व इतरांत फरक. प्रेम, बिचार आणि स्वातंत्र्य याशिवाय कशाचेंहि मला महत्त्व वाटत नाहीं. जे विषय व ज्या वस्तु

इतर बहुतेकांच्या हृदयांत वासना निर्माण करतात—वासना क्षुब्ध करतात, त्या वस्तूंबद्दल मला केवळ थोडीशी जिज्ञासा असतें झालें. याचा अर्थ काय ? ही अनासक्ति, निरपेक्षता, दुबळेपणा का शहाणपणा ?

× × ×

१४४

Eugenie de Guerin ह्या बाईचें आत्मवृत्त मी वाचीत होतों. सहा वर्षांचा इतिहास तिनें यांत लिहिलेला आहे. दोन तास मी वाचीत होतो व या थोर पवित्र साध्वीच्या संगतींत आनंद वाटला. वात्सल्याची मूर्ति ती आहे. या जर्नलमध्यें किती विचार, किती भावना, किती दुःखें ! हें जर्नल वाचून आपणांसही विचार करावासा वाटतो. आपल्या मनांतही नाना स्वप्नें येऊं लागतात. असें जगावें असें वाटूं लागतें. हें पुस्तक वाचून घर असावें असें मला वाटूं लागतें. विसरलेलें संगीत पुन्हां हृदयांत उत्पन्न होतें. पूर्वींची गीतें–ते नाद पुन्हां हृदयांत घुमूं लागतात. कां बरें असें होतें ? हें पुस्तक वाचून दूरचे मार्ग पुन्हां माझ्याजवळ येत आहेत असें मला वाटतें. माझ्या तारुण्यांतील भाग पुन्हां डोळ्यासमोर हळूंच डोकावतों. अस्पष्ट ध्वनि मला ऐकायला येतात. माझ्या गतजीवनांतील प्रतिध्वनि–पडसाद कानीं येतात. हें पुस्तक वाचून वाचक आश्चर्यचकित होतों त्याच्याभोंवतीं पावित्र्य, उदासीनता, भक्ति व धर्मता, गतजीवनाच्या शेंकडों स्मृति, जागृत होतांच भराभरा पळून जाणाऱ्या स्वप्नांतील छायांप्रमाणें निरनिराळे कल्पनामय आकार, अस्पष्ट व गूढ आकार, जमा होतात.

× × ×

१४५

विचाराला आपले पंख पसरायला किती लहानशीही जागा पुरते हें पाहून कौतुक वाटतें, मनांत करुणा उत्पन्न होते. परंतु ज्यांच्या मनाला अनेक वस्तु पहायची संवय झालेली असते, अशांना चार भिंतींच्या आंत लौकरच कंटाळा येतो. त्या चार भिंतींच्या आंतच सतत फिरून त्यांचा विचार कंटाळतो. त्यांना उद्याना ऐवजीं जग पाहिजे असतें. लहानश्या ग्रंथालयापेक्षां सर्व वाङ्मय त्यांना पाहिजे असतें. तीन चारच चेहऱ्यां ऐवजीं, सर्व राष्ट्र-सर्व इतिहास त्यांना पाहिजे असतो. जोरदार वृत्तीच्या माणसाना, विचार शील माणसाला हें सर्व पाहिजे. विराट संसार पाहिजे. लोकांना अधिक मोकळी हवा, अधिक जागा, मोठें क्षितिज, अधिक प्रत्यक्ष निश्चित ज्ञान पाहिजे असतें. चार भिंतींच्या आंत ते गुदमरतात. तरी त्या खोलींत देवा-घरचा वारा खेळत असतो--आकाशांतील तारे त्यावर वरून चमकत असतात. तरी अशा खोलीचा बहुतेकांना कंटाळाच येईल.

× × ×

१४६

शरद् ऋतूंची दोन रूपें असतात. एक मृदु, स्वप्नमय, गूढ स्वरूप, दुसरें झगझगीत ठसकेबाज स्वरूप. स्त्रीपुरुषांत जो फरक व भेद तोच या दोन रुपांत आहे. शरद् हा शकचमुळीं पुरुषत्व सूचक व स्त्रीत्व सूचक आहे. परंतु प्रत्येक ऋतूचीच अशी दोन स्वरुपे असतात. प्रत्येक ऋतु म्हणजें एक दांपत्यच आहे. कोमल व कठोर दोन्हींचें तो मिश्रण असतो. प्रकाश आणि साउली, सौम्यता व जोर प्रत्येकांत—प्रत्येक ऋतूच दिसत नाहीं का? बहुतेक खरें असतें असें जें जें पूर्ण आहे तें सजोड आहे. सद्वय आहे. प्रत्येक नाण्या-च्या दान बाजू, प्रत्येक वस्तूचीं दोन रुपें शेंदरी शरद् ऋतु जोरदार कर्मवृत्ति दर्शवतो; कृष्णवर्ण शरद् ध्यानरूपता दर्शवतो. एकरुप वाढणारें, उचंबळणारे

आहे; दुसरें शांत, उपसंहार करणारें आहे. काल आमचे विचार मृतांबद्दल चालले होते; आज जें पीक मिळाले आहे त्याचा उत्सव करीत आहो.

× × ×

१४७

त्याच्या मरणाची वार्ता ऐकली. मेंदूवर आघात होईपर्यंत शुद्ध नीट होती, इच्छाशक्ति शाबूत होती. पुढें मेंदू फुटला व सर्व थांबलें.

असें हें जीवन आहे. रक्तांत हवेचा एक बुडबुडा शिरला, मेंदूत पाण्याचा एक थेंब गेला,– कीं झालें– थंड पडलें सारें; बंद पडला गाडा; बिघडलें यंत्र. विचार मावळतो जग अदृश्य होतें. उजाडतांच स्वप्न नाहींसें होतें, त्याप्रमाणें अशा माणसापासून सर्व जीवन नाहींसें होतें, आपलें हें वैयक्तिक जीवन कोळयाच्या धाग्यावर अवलंबून आहे! हा धागा केव्हां कशानें तुटेल याचा नेम नाहीं. सुकुमार व नाजूक आहे सारें यंत्र; केवळ दिमाख– क्षणांत धुळींत मिळणारें, शून्य होणारें ही जीवन आहे. आपण विसराळू स्वभावाचे आहोंत; इतर गोष्टींनीं आपलें मन ओढलें जातें म्हणून बरें; नाहींतर हें सर्व सुंदर दिसणारें जग– जें आपणांस ओढतें, आपणांभोंवतीं जें पसरलेलें आहे– तें आपणांस केवळ अंधारांतील एक ठिणगी असें दिसलें असतें. निस्सार, पोकळ देखावा, अदृश्य होणारें धुक्यासारखें मायावी जीवन! केवळ भ्रम! आतां दिसलें – नाहींसें झालें– असें हें जीवन आहे. या दोन शब्दांत सर्व इतिहास- मानवाचा सर्व इतिहास आहे.

काळ हीं सर्वांत मोठी फसवणूक होय. हा सर्वांत मोठा मोह आहे. सत्-अस्तित्व व जीवन यांत भेद यां काळाच्या कल्पनेनें आपण करतों. विचारांत जें एककालीन आहे तें आपण एकापाठीमागून एक होत आहे असें पाहतों. आपल्या दृष्टीस गोल सर्व एकदम दिसत नाहीं, तरी तो सर्व एकाच काळीं अस्तित्वांत असतो. जो डोळा पाहात आहे त्या डोळयासमोर

त्या गोलानें तरी एकदम सर्व फिरलें पाहिजे, नाहींतर डोळ्यानें एकदम सर्व गोलाभोंवतीं फिरलें पाहिजे. जर गोल फिरला तर गोल ही पृथ्वी– हें जग आपल्या समोर उघडत आहे, प्रगट होत आहे– काळांत प्रगट होत आहे असें आपण म्हणूं. जर आपण पृथ्वीभोंवती फिरूं लागलों– तर आपला विचार एकापाठीमागून जातो– पृथःकरण करतो, पुनर्रचना करतो. परंतु जी परमोच्च ज्ञप्ति तिला काळाची आवश्यकता नाहीं. तें काळ नाहींच. जें होणार आहे तें तेथें आधींच आहे. काल आणि स्थळ हे अनंततेचे तुकडे आहेत. समर्याद सात जीवांच्या सोयी-साठीं केलेले हे तुकडे आहेत. ईश्वर असे हे तुकडे होऊ देतो. त्याला एकटे रहायचा कंटाळा येतो. स्वतःला एकटे राहावयास लागूं नये म्हणून हे असे खेळ तो होऊं देतो. काल व स्थळ यांच्याशिवाय प्राणी शक्यच नाहीं. त्याची कल्पनाच करतां येणार नाहीं. स्थलकालांच्याच रूपांतच प्राणी शक्य आहे. या कालस्थलांच्या-दिक्कालांच्या अनंत पायऱ्या चढतच मनुष्य ईश्वराजवळ जातो; सच्चिदानंदाचा अनुभव घेतो; जीवनरस चाखतो सर्वतंत्रस्वतंत्र जें तत्त्व तें अनुभवतो; अनंत दिव्यतेचें खोल रहस्य त्याची पूजा करतो. ही जीवनाची दुसरी बाजू आहे. आपलें जीवन म्हणजे कांहींच नाहीं--हें खरें आहे; परंतु हें जीवनदिव्य आहे, ईश्वरी आहे. निसर्गाची एक झुळुक आणि आपण विनष्ट होतों; परंतु आपण निसर्गाहून थोर आहोंत; सृष्टीच्या या विराट अस्थिर चंचल पसाऱ्यापलीकडचे स्थिर, चिरंतन शाश्वत जें आहे तेथें आपण दृष्टि पोंचवतों. आर्यांच्या सर्व धर्मांची हीच शिकवण आहे, हाच आदेश आहे कीं, काळाच्या फेऱ्यांतून सुटावयाचें असेल तर अंतर्दृष्टीच्या आनंदांत तल्लीन होऊन रहा. आपण अनंताचे अंश आहोंत या भावनेनें स्वतःला पहा. मनुष्याच्या मनाला, बुद्धीला हें शक्य आहे, त्याच्यावर सर्व आशा उभारलेल्या असतात. ह्या शक्यतेवर सर्व इमारती रचतों. आत्मा अमर असेल कारण जें अज आहे, अमर आहे, जें सच्चिदानंदरूप आहे, त्रिकालाबाधित आहे, अव्यय आहे त्याच्याकडे त्या परमेश्वराकडे, परब्रम्हाकडे उड्डाण कर-ण्याची शक्यता जीवाला आहे–जीवात्म्याला आहे.

× × ×

१४८

कसें सुचवायचें, सूचना कशी द्यावयाची ह्यांत शिक्षणाची महाकला आहे. शिकवण्याचें रहस्य यांत आहे. ही कला साधावयास कशानें आनंद होईल, मनाला करमणूक मिळेल ह्याचा अंदाज करतां आला पाहिजे. मुलाचे अंतरंग वाचावयास शिकणें म्हणजे संगीत शिकण्यासारखें आहे. एकाच रागात थोडा फरक करून आपण पुन्हां तें चालवतों—तें निरानिराळया रागरागींत थोडेथोडे फरक करून गाऊन दाखवतों, व त्याचा कंटाळा येत नाहीं.

× × ×

१४९

सर्व वस्तूंचीं बीजें आपल्या हृदयांत असतात. अत्यंत मोठे गुन्हेगार किंवा अत्यंत थोर महात्मे ही आपलींच भिन्न रूपें होत. असद्वृत्ति आपोआप प्रयत्नांशिवाय फोफावते; सत्प्रवृत्तींचीं बीजे वाढावयास प्रयत्न धैर्य यांची आवश्यकता असते. एवढाच फरक.

× × ×

१५०

सर्वांच्या मुळाशीं-तळाचीं खिन्नता व औदासिन्न तुम्हांला दिसून येईल. नदीच्या शेवटीं जसा समुद्र त्याप्रमाणें वस्तूंच्या तळाशीं दुःख. ज्या जगांत कांहीं टिकूं शकत नाहीं, जेथें कशाची शाश्वती नाहीं त्या जगांत दुसरें काय असणार? जीवनाचें रहस्य मरण हेंच का तर मग? मरण हेंच खरें जीवनाचें रूप का? चिरंतन दुःखाची छटा—कमीअधिक प्रमाणांत—प्रत्येक गंभीर व विचारशील जीवाच्या जवळ असते. ज्याप्रमाणें रात्र विश्वाला पांघुरवते—त्याप्रमाणें हें खिन्नतेचें वस्त्र सर्व गंभीरवृत्ति जीवांजवळ असतें.

कोणी तें घट्ट पांघुरलेलें असतें. कोणी अंगावर सैलपणें घेतलेलें असत-परंतु असतेंच.

× × ×

१५१

हजारों निरनिराळ्या कारणास्तव शेंकडों निरनिराळ्या हेतूंनीं प्रेरित होऊन मनुष्य धर्माकडे वळत असतो. कधीं अनुकरणाच्या हेतूनें, तर कधीं विक्षिप्तपणा म्हणून, लहर म्हणून कधीं पूज्य भावनेनें, तर कधीं मिरवतां यावें म्हणून, भूतकालीन लाजेनें, किंवा भविष्यकालीन भीतीनें, दुबळेपणानें किंवा अहंकारानें, सुखासाठीं किंवा प्रायश्चित्तासाठीं, दुसऱ्याचें न्यायाधीश होतां यावें म्हणून, किंवा दुसऱ्यांनीं आपले न्यायाधीश होऊं नये म्हणून आणि अशा शेंकडों हेतूंनीं तो धर्माकडे वळतो. परंतु खरा धार्मिक तो—जो धर्मासाठींच म्हणून धार्मिक राहतो.

× × ×

१५२

उदार व थोर भावना मनांत खेळवणें यांत सुख आहे, आनंद आहे. पोरकटपणा, अश्लीलता-यांच्यापेक्षां वरच्या वातावरणांत राहणें यांत आनंद आहे. दलदलीत राहण्यापेक्षां उंचवट्यावर असणें चांगलें. उद्योगधंद्यांत मग्न असलेली कारखानदार अमेरिका तिची वृत्ति आणि सर्व सत्ता हातांत घेणारी लोकसत्ता—या दोहोंच्या अनुकरणानें व प्रचारानें परिणाम असा होत आहे कीं, केवळ विकारवश लोक सारे होत आहेत. विचारयुक्त जीवन होण्याऐवजीं विकारमय होत आहे. पैसा व सुख यांचीच पूजाअर्चा करावयाचें व्रत सारे घेत आहेत. सत्ता व सामर्थ्य या-

शिवाय दुसरा देव पूजा करायला त्यांच्याजवळ नाहीं. हें जें वाढतें बहुमत–हा जो बहुजनसमाज-ह्यांत मानवजातीचे किती क्षुद्र व दरिद्री आदर्श दिसत आहेत ! यांच्याजवळ मानव जातीचा एक नमुना मागा– तो किती भिकार वाटेल ! या, आपण ध्येयाशीं एकनिष्ठ राहूं या. आपली पूज्यभूमि आपण सांभाळून ठेवूं या. आजच्या आध्यात्मिक-वृत्तीच्या लोकांना सर्व सहन करणारे झाले पाहिजे. लोकसत्तेच्या नांवाखालीं दंडुक्याचेंच राज्य येणार आहे व आपणांस कष्ट सहन करावे लागतील. आज केवळ सुखवादाला ऊत आला आहे. मनाला वाटेल तसें करावें– यथा सुखं चरस्व या वृत्तीचें आज साम्राज्य आहे–या ध्येयाची आज चलती आहे. असंयमाकडे वारा वहात आहे, आणि सार्वत्रिक नैतिक अधःपाताची तयारी होऊन राहिली आहे. कांहीं हरकत नाहीं. जोपर्यंत मीठ आपली चव सोडीत नाहीं. संरक्षण करण्याचा आपला धर्म सोडीत नाहीं. तोपर्यंत भीति नाहीं. उच्चतर जीवनाचे जिवलग गडी जोंपर्यंत करकंकण सोडीत नाहींत, ते आपले अग्निहोत्र, आपली दीक्षा टाकीत नाहींत-तोंपर्यंत भय नाहीं. समाजाला सडूं न देणारें मीठ म्हणजे हेंच पुरुष होत. लांकूड विस्तवाला विझवूं पहात असेल, परंतु ज्वाला जर टिकाव धरून राहिली–तर शेवटीं लांकडालाही पेटवून ती अधिकच विशाल व प्रचंड होईल–अधिकच तेजस्वी व प्रखर होईल. रानटी लोकांच्या स्वाऱ्यांनींही जें मारलें गेलें नाहीं, पुसलें गेलें नाहीं तें या लोकसत्तेच्या नांवानें येणाऱ्या प्रचंड लोंढ्यानेंही वाहून जाणार नाहीं. जें अनंत काळ टिकून राहिलें–तें पुढेंही टिकेल. उच्च संस्कृति नाहींशी होणार नाहीं. थोर आदर्श मरणार नाहींत, परंतु आज आपण जें होत आहे तें मुकाट्यानें पाहिलें पाहिजे. येऊं दे हा लोंढा व जाऊं दे. आज लोकसत्ता सर्व विद्रूप व कुरूप करीत आहे. सर्व पोरकट व उच्छृंखल करीत आहे. करूं दे. सारें सौंदर्य, प्रमाणबद्धता, प्रौढता, उच्चवृत्ति, उदात्तता, नागरता– जें जें उत्कृष्ट आहे, मधुर आहे, सुंदर व सूक्ष्म आहे–तें सारें नाहींसें होत आहे. थोर साहित्यांत ज्यामुळें सौंदर्य असतें–तें सारें अस्तंगत होत आहे.

पास्कलनें एके ठिकाणीं म्हटलें आहे मनुष्य जसजसा विकसित होतो

तसतसा माणसामाणसांतील भेदभाव, अधिकाधिक भिन्नत्व त्याला प्रतीत होतें. या दृष्टीनें पाहिलें–पास्कलचें म्हणणें खरें धरलें तर लोकसत्तात्मक प्रवृत्ति मानवसमाजाच्या मनाचा विकास करीत आहे असें म्हणतां येणार नाहीं. सर्व गुण सारखेच करण्यासाठीं सर्व गुणांची किंमतही सारखीच केली पाहिजे–असें लोकसत्ता म्हणते.

× × ×

१५३

विद्यार्थी अधिकाधिक उच्छृंखल होत आहेत; शिस्त पाळणें, आज्ञा याविरुद्ध ते बंड करीत आहेत–याचीं आणखी कांहीं ताजीं उदाहरणें ऐकलीं. तरुण लोक उच्छृंखल होत आहेत–आणि " आमचा मास्तर हा आमचा शत्रु आहे " हें त्यांचें ब्रीदवाक्य आहे असें जणुं दिसत आहे. कुमाराला तरुणाचे हक्क पाहिजे व तरुणाला प्रौढाचे पाहिजे आहेत. दहा वर्षांचा मुलगा २० वर्षांच्या तरुणाचे हक्क मागत आहे व वीस वर्षांचा चाळीस वर्षांच्या माणसाचे हक्क मागत आहे. सर्व सपाट करणारी जी लोकसत्ता तिच्यांतील तत्त्वज्ञानाचा हा नैसर्गिक परिणाम आहे. तिच्या पद्धतीचेंच हें अपत्य आहे. राजकारणांत अधिकृतरीत्या तरी जोंपर्यंत गुणभेदाला म्हणजे शून्य असें मानलें जात आहे–तोंपर्यंत वयाला मान, वयाचा अधिकार, ज्ञानाची सत्ता सर्व कांहीं नाहींसेंच होणार.

अशा या निरुपाधिक समानतेचें तितकेंच उलट रूप जर कोठें पहावयाचें असेल तर तें लष्करी शिस्तींत दिसून येईल. लष्करी पोषाखांत, पोलीस कोर्टांत, तुरुंगांत, फांशीं देण्याच्या ठिकाणीं, तेथें कोणी ब्र काढूं शकत नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्याच्या काळच्या अंतीं पाशवी शक्तीलाच महत्त्व व पूज्यत्व प्राप्त होणें हें एक आश्चर्य नाहीं का? व्यक्तिस्वातंत्र्याबरोबर अनियंत्रित सत्ता पण येते. जिभेची सत्ता शेवटीं तलवारीला मिळते. लोकसत्ता व स्वातंत्र्य ही खरोखरच एक वस्तु नसून ह्या अगदी भिन्न अशा

दोन वस्तु आहेत. जेथें लोकसत्ता आहे, तेथें उच्चनीतिमत्ता असली पाहिजे. परंतु अशी नीति, आदरबुद्धि मनांत नसेल, पूज्यपूजाभाव नसेल तर असूं शकणार नाहीं. नम्रतेशिवाय आदरबुद्धि येत नाहीं. परंतु लोकसत्तेंत तर असें गृहित धरलें जातें कीं प्रत्येक व्यक्तिजवळ नागरिकत्वाचें सर्व गुण आहेत; कारण काय तर तो सज्ञान आहे. एकवीस वर्षांचा होतांच सर्व गुण मनुष्यांत एकदम येतात ही कल्पना जेथें आहे, तेथें श्रमाला, सद्गुणाला, कलेला, विशेषगुणधर्माला, चारित्र्याला, अनुभवाला कोठलें महत्त्व असणार? केवळ यांत्रिक तऱ्हेनें झाडामाडासारखा मनुष्य वाढला व एवढ्यानें तो सर्वांच्या बरोबरीचा झाला असें मानण्यानें सर्व शालीनतेचा, नम्रतेचा आपण नाश करतों. मी अमुक वयाचा झाल्यामुळें मी सर्वांच्या बरोबरीचा झालों असा हक्क सांगणें म्हणजे वयाला मान कोठें राहिला? अनुभवाला कोठें राहिला? २१ वर्षांचा मतदार व ५० वर्षांचा मतदार दोघे जर सारख्याच योग्यतेचे तर मग १९ वर्षांच्या तरुणाला २१ वर्षांच्या तरुणापेक्षां आपण कमी आहों असें तरी कां वाटेल? कां वाटावें? लोकसत्तेला मंगलमूर्ति बनवावयाची होती-- परंतु तयार झालें मर्कट! स्वातंत्र्याची एकूण गोळाबेरीज वाढवावी हें लोकसत्तेचें ध्येय होतें; परंतु सर्वांचें स्वातंत्र्य कमी झालें हा मात्र त्याचा परिणाम झाला.

अर्वाचीन राज्यसंस्था अणुवादावर उभारली आहे. राष्ट्रीयता, समाजहिततत्परता, परंपरा, राष्ट्रीय चालरीत, सर्व गोष्टी जुन्यापुराण्या निस्सार म्हणून फेंकून दिल्या जात आहेत. हालचाल तर मग कशानें निर्माण व्हावी? गति कशाने मिळावी? एकाच गोष्टीनें. निरनिराळ्या अणूंचे परस्परांवर आकर्षण होऊन जी शक्ति निर्माण होईल, जी क्रियानिर्माण होईल तीच फक्त दिसेल. अशा प्रकारच्या विचार सरणींत स्वातंत्र्य म्हणजे लहर व स्वच्छंदीपणा याशिवाय काय राहिलें? आजपर्यंतची राष्ट्राची सामुदायिक बुद्धि, विचारसंपत्ति, जुन्या समाजाची प्राचीन काळापासून चालत आलेली परंपरा ह्यांना साबणाच्या बुडबुड्याहून जास्त महत्त्व अशा समाजांत मिळत नाहीं व एखादें शेंबडें पोरही त्याच्या नांवानें बोटें मोडतें, खडे फोडतें,

ह्याचा अर्थ मी लोकसत्तेचा द्वेष्टा आहे—लोकसत्तेला विरुद्ध आहे असा का घ्यायचा ? मुळींच नाहीं. लोकसत्ता हीं इतर प्रकारापेक्षां कमी अपायकारक आहे हें खरें; परंतु वस्तुस्थिति पाहणेंहि बरें. लोकसत्ता काय रामराज्य आणणार होती, प्रत्यक्ष पदरीं पडलें आहे याचा हिशेब घेणें. ठोकताळा पाहणें बरें. जें मुळांत नाहीं तें मानणें याला कादंबरी म्हणतात. जें नाहीं, तें मानल्यानें थोडेंच मिळणार आहे ? भ्रम हा भ्रमच राहणार. मृगजळांतून पाणी थोडेंच मिळणार आहे ? लोकसत्ता एक नसलेली गोष्ट धरून चालते कीं बहुतेक सारे मतदार हे विचारी आहेत, शहाणें आहेत; स्वतंत्र वृत्तीचे प्रामाणिक, देशहितरत असें आहेत. परंतु ही समजूत भ्रामक आहे. कोणत्याही राज्यसंस्थेतील बहूजनसमाज हा मुख्यत्वें करून अत्यंत अडाणी, अति दरिद्री, आणि अति अक्षम अशा लोकांचाच बनलेला असतो. म्हणून ज्याची लहर जशी असेल, तसें तो करणार. म्हणजेच अनिश्चितता व लहर यावर राज्ययंत्र चालणार ! अत्यंत घट्ट व ताणून धरलेल्या दोरीला ज्यानें धरलें तो पडणारच ही गोष्ट कोणाच्याही लक्षांत येईल. त्याला कांहीं कोणा भविष्यवाद्याची, त्रिकालज्ञाची जरूरी नाहीं.

× × ×

१५४

आशेच्या एका किरणांत आरोग्य व उत्साह देण्याची जी शक्ति आहे, सुखाच्या एका किरणांत मनुष्याला बरें करण्याची जी सुप्त शक्ति आहे-- ती डॉक्टराजवळच्या कोणत्या उपचारांत आहे. कोणा डॉक्टराजवळ असे उपाय आहेत ? जीवनाचा मुख्य झरा हृदयांत आहे; खरी किल्ली येथें आंत अंतरंगांत आहे. जिवाला आनंदाची प्राणदायक हवा पाहिजे असते; दुःखाच्या हवेंत त्याला दमा लागतो— तो गुदमरतो. जसजसें शरीर दुर्बल होतें तसतसें आपण आजुबाजूच्या परिस्थितीचें अधिकच गुलाम होतों. शरीर निरोगी असणें म्हणजे स्वातंत्र्य आहे. आरोग्यांत स्वतंत्रता आहे.

आरोग्य हें सगळयांत पहिलें स्वातंत्र्य; आनंद व समाधान यांत आरोग्याची किल्ली आहे. आरोग्यासाठीं लागणारा जोम व उत्साह त्यांतून आपणांस मिळतो. एकाद्याला सुखी करावयाचें असेल तर त्याचा जीवनरस वाढवा; त्याच्या जीवनाची उत्कटता वाढवा; त्याचें वास्तविक रूप त्याला दाखवा. त्याला उदात्ततेकडे न्या. त्याला उन्नत करा, स्थिर करा- बदलून टाका. जेथें आनंद आहे तेथें सौंदर्य आहे-- तेथें कुरूपतेला ठाव नाहीं. प्रसन्नता सुंदरतेलाही सुंदर करते. सौंदर्याचें सौंदर्य आनंदांत आहे. याबद्दल ज्याला शंका असेल त्यानें प्रेम करणाऱ्या माणसाच्या निर्मल दृष्टींत उगवणारीं कोमलतेची उषःप्रभा पाहिली नाहीं हेंच खरें; ती दृष्टि पहा. सूर्योदयसुद्धां त्या दृष्टींतील कोमलतेच्या प्रसन्न तेजापुढें फिका आहे. स्वर्गांत - तर मग— सर्वेच सुंदर असतील-- कारण तेथें सर्व सुखी व आनंदी असणार. सत्यनिष्ठ जीव हा सुंदरच असणार. प्रसन्नतेच्या, खऱ्या आनंदाचा स्पर्श ज्याला ज्याला होईल, ज्या ज्या वस्तूंत तीं शिरतील त्या त्या वस्तु सुंदर होणार. जेथें असे पुण्यात्मे असतील-- तेथें कुरूपतेला कोठून अवकाश असणार ? पाप, दुःख व मृत्यु यांच्या बरोबरच कुरूपताही नाहींशी होईल.

जो भौतिक दृष्टीनें विचार करणारा आहे, तो सौंदर्याला आकस्मिक मानतो; आणि म्हणूनच तें दुर्मिळ मानतो. आध्यात्मिकदृष्टीचा जो तत्त्वज्ञ त्याला सौंदर्य हा सर्वांचा नैसर्गिक धर्म वाटतो व कुरूपता अपवाद वाटते. सर्व वस्तूंच्या मुळाशीं सौंदर्य आहे असें तो मानतो. बाहेरच्या आकस्मिक उपाधींचा जोर कमी होताच प्रत्येक आकार या मूळच्या सौंदर्याकडे वळतो— सुंदर होऊं लागतो. आपण कुरूप कां दिसतो ? कारण आपण दैव स्थितींत, कृतकृत्यतेच्या पुण्यपवित्र स्थितींत नाहीं म्हणून. आपण दुष्ट, पापी, खिन्न व दुःखी आहोंत म्हणून.

परमानंद, प्रार्थना, प्रेम, त्याग, शौर्य, उत्साह, स्फूर्ति-हीं आपल्या मुखासभोंवतीं जणुं प्रभावलय निर्माण करतात. मनुष्याचा चेहरा तळपूं लागतो—अभिनव तेजस्वी व सुंदर दिसतो. या गोष्टी आत्म्याला मुक्त करतात; यांच्या साहाय्यानें आत्मा आपलीं कवचें फोडतो—आच्छादनें फाडतो व स्वतःचें तेज अंगप्रत्यंगांतून मग बाहेर पडूं लागतें. ज्यानें ज्यानें

आत्म्याला आवरण घातलेलें असतें-तीं सारीं आवरणें कांचेसारखीं पारदर्शक होतात. आत्म्याच्या प्रकाशाला न अडवतां-उलट-स्वच्छकांच दिव्याचा प्रकाश जास्त स्वच्छतेनें सर्वत्र पसरतो. त्याप्रमाणें आत्म्याचें तेज स्वच्छ व धवल असें बाहेर येतें-आसमंतातच्या दृष्टीवर वस्तूंवर पडून त्यांनाही तें लावण्यमय करतें. जडाला आध्यात्मिक करणें ह्यांत सौंदर्यशास्त्र आहे. जी वस्तु किंवा जें जीवन मिळालें आहे त्याला निराळें करणें--क्षणभर तरी दिव्य करणें; स्वर्गांतून पृथ्वीवर पडलेली ही खूण आहे. ध्येयभूत सृष्टि किती सुंदर असेल-याचा या क्षणिक अनुभवावरूनही आपणांस बोध होईल. ह्याचा विचार करणें म्हणजेच प्लेटोप्रमाणें विचार करणें. जोरदार विद्युत्प्रवाह धातूला ज्याप्रमाणें तेजोमय लखलखीत करतो, आणि त्यांच्या विशिष्ट ज्वालेच्या, ज्योतीच्या रंगावरून त्यांचें खरें स्वरूपही प्रकट करतो; तद्वतच उत्कट जीवन, आणि परमोच्च आनंद यांनीं अत्यंत साधा मर्त्य मनुष्य अत्यंत सुंदर होतो-जगाची दृष्टि दिपवतो. अशा दैवी स्थितींत जेव्हां मनुष्य असतो तेव्हां तो खराखुरा मनुष्य असतो. इतका यथार्थतेनें मनुष्य तो अन्य केव्हांही नसतो.

एकूण वास्तविकापेक्षां, प्रत्यक्षापेक्षां ध्येय हें अधिक सत्य असतें. कारण नाशिवंत वस्तूंतील अमर अंश म्हणजे हें ध्येय होय. ध्येय हें सर्व वस्तूंचें थोडक्यांत सार आहे; त्यांत इत्यर्थ आहे. ध्येयांत सर्व वस्तूंची परिसमाप्ति आहे-इतिकर्तव्यता आहे, परिसीमा आहे.

× × ×

१५५

माझ्या जुन्या शालीची जागा एक नवीन शाल भरून काढणार आहे. ही नवीन शाल मी मोजीत होतों, तिची परीक्षा करीत होतों. जुनी शाल आज दहा वर्षे मजजवळ होती. आज जवळ जवळ एक तप तिनें माझी सेवा केली, व माझ्या सेवेंत ती जीर्ण झाली. दहा वर्षांची तीं माझी मैत्रीण आहे. तिला पाहतांच अनेक काव्यमय व आनंदमय विचार मनांत उत्पन्न

होतात; सुखकर स्मृती डोळयांसमोर येतात ही जी नवीन झकपक शाल आली आहे, तिच्यापेक्षां ही जुनी शालच मला प्रिय आहे. जरी ही नवीन शाल एका मित्रानें दिलेलीं देणगी आहे–तरीही जुनी शाल मला अधिक आवडते–अधिक सुखवते. ही नवी शाल जुनीची जागा नीट भरून काढूं शकणार नाहीं. गतकाळाची जागा कोण भरून काढणार? आपल्या जीवनाचे निर्जीव, अचेतन साक्षीदारही आपणांजवळ बोलतात, त्यांना वाचा असते. या लहानशा शालीच्या लोंकरीच्या वस्त्रांत शेंकडों ठिकाणच्या आठवणी आहेत. ही शाल म्हणजे माझ्या अंतर्गत जीवनाचीच खाजगी जीवनाचीच जणुं एक भाग आहे. मी जेथें जेथें गेलों तेथें ही होतीच. तिला सारें माहीत आहे. जें जगाला माहीत नाहीं तें तिला माहीत आहे. अर्वाचीन मुशाफराजवळ, प्रवास करणाऱ्याजवळ इतरांनाही जिचा उपयोग करतां येईल अशी जर कांहीं कपड्यालत्त्यांतील, पोषाखांतील वस्तु असेल तर ती शाल होय. ती स्त्रियांनाही देतां येईल. व त्यांनाही ती अंगावर घेतां येईल. कितीतरी वेळा माझी शाल भगिनींना उपयोगी पडलेली आहे. कोणा भगिनीला उशी, कुणाला झगा, कुणाला निवारा म्हणून ती उपयोगी पडली आहे. आल्प्स पर्वताच्या ओलसर गवतावर, कठीण दगडांवर, देवदारांच्या जंगलांत एकदम गारवा वाटूं लागताच या शालीचा अनेक भगिनींना उपयोग झाला आहे. फिरायला गेलों असतां, विश्रांति घेत असतां, वाचीत असतां, पार्वत जीवनाच्या गप्पा मारतांना ह्या शालीचा निरनिराळया तऱ्हेने उपयोग झाला आहे. या शालीनें कितीतरी प्रेमळ व सहृदय हास्यें मला मिळवून आणली आहेत; कितीतरी कृतघ्न स्मितें संपादिली आहेत. या शालींतील आजचीं व्यंगेंही मला प्रिय आहेत. या शालीला पडलेला प्रत्येक डाग, प्रत्येक फाटलेली जागा, प्रत्येक ठिगळ–त्या सर्वांत इतिहास आहे; प्रत्येकाची कथा आहे. ह्या शालीवरील प्रत्येक जखम-ढालीवरील जखमेप्रमाणें आहे. एका झाडाला अडकून येथें ही फाटली आहे. त्यावेळेस जामात खाली आम्ही होतों, फ्रान्हाल्प येथें फाटलेली जागा येथें आहे. चारनेक्स येथें कांटेरी झुडुपांत अडकल्यानें येथें फाटली आहे. प्रत्येक वेळेस कोमल हातांतील सुयांनीं या जखमा बऱ्या केल्या आहेत.

ही शाल संपत्तींत व विपत्तींत माझी सोबतीण होती. तिनें मला कधीं सोडलें नाहीं. एका दंतकथेंतील माणसाच्या अंगरख्याची मला आठवण होते. त्याचें अंगातलें काढणें म्हणजे त्याच्या बरोबर अंगाचें मांसही निघे. ही शाल दूर करणें म्हणजे माझें रक्त–माझें मासच कापून काढण्याप्रमाणें आहे. ती शाल दूर करणें म्हणजे माझें जीवन–कांहीं भाग–दूर करण्यासारखें आहे. ही शाल माझ्यानें दूर करवत नाहीं. मला वाईट वाटतें तिला दूर करायास. भूतकालाबद्दल जी कृतज्ञता माझ्यांत आहे, जें माझें तारुण्य निघून गेलें त्याबद्दलची ती एक पवित्र भावना माझ्यामध्यें आहे-- त्या मला सांगतात कीं, ही शाल टाकूं नकोस. ही शालही मला म्हणते कीं आणि तिचें म्हणणें माझ्या हृदयाला विरघळवतें. तिचे शब्द मला गहिंवरतात, सद्गदित करतात. या शालीचें शब्द उथळ माणसाला ऐकायला येणार नाहींत. धर्महीनाला, अपवित्राला–ऐकायला गेले तरी समजणार नाहींत.

"तूं असा होतास" या शद्बांत किती प्रखर वेदना आहेत! हे शद्ब सुरीप्रमाणें अंगांत अंतरंगांत शिरतात. या शद्बांतील अर्थ जेव्हां स्पष्टपणें प्रतीत होतो, तेव्हां मर्मांतिक दुःख होतें. हळुहळूं आपण मरणा-जवळ जात आहोंत, थडग्यांत पुरलें जात आहोंत असें वाटतें. आपल्या सर्व मनोरथांच्या मरणकाळची घंटा जणुं भूतकाळ वाजवीत असतो. जें गेलें तें गेलें. भुरे केस आतां काळेभोर होऊं शकणार नाहींत. तारुण्यां-तील उत्साह, प्रेरणा, शक्ती, देणग्या, आकर्षणें तारुण्याबरोबरच अदृश्य झाली.

वृद्ध होत जाणें किती कठीण आहे. विशेषतः जेव्हां आपण आयुष्याचा नीट उपयोग केलेला नसतो, आलेल्या मिळविलेल्या संधि गमावलेल्या असतात, परिपूर्ण पुरुषार्थाचें फळ पदरीं नाहीं असें जेव्हां दिसतें, ना उत्कृष्ट ब्रह्मचर्य, ना उत्कृष्ट गृहस्थाश्रम असें जेव्हां आपलें जीवन असतें–तेव्हां तर वृद्ध होणें अत्यंत दुःखप्रद वाटतें. आपलें काम पुरें होण्यापूर्वीं मनाच्या शक्ति क्षीण होत जात आहेत असा अनुभव येणें किती खेदजनक व उद्विग्नकर असतें. जे आपले डोळे मिटवतील,

जे आपलें नांव आदरानें घेतील, अशांमध्यें आपलें जीवन पुन्हां सुरूं झालें आहे असें पाहण्यापूर्वींच शरीरानें दुबळें होत जाणें किती शोकप्रद आहे. ज्या दिवशीं "आतां काय उपयोग, आतां उशीर झाला" हे शब्द आपल्या कानांत कोणीतरी मोठ्यानें सांगत आहे असें वाटतें- असा तो दिवस-ज्या दिवशीं उजाडतो-त्या दिवशीं जीवनाची शोकप्रद गंभीरता आपणांस जोरानें प्रतीत होते, व आपण घाबरतों. आतां उशीर झाला, घडीतील वाळु सरली, घटका भरली; वेळ टळली. तूं तुझें पीक कापून गोळा केलें नाहींस-- उशीर झाला पण आतां. तूं केवळ स्वप्नांत राहिलास, लोंबत राहिलास, झोंपी गेलास, कर्तव्य विसरलास. अरेरे फारच वाईट ! स्वतःला तारणारा व मारणारा-दुसरा कोणी नाहीं. आपणच आपले शत्रु-आपणच आपले मित्र त्याला कोण काय करणार ? कोणाबद्दल तक्रार करणार,-कोणाजवळ करणार ? अरेरे !

× × ×

१५६

सकाळची वेळ आहे. आजची प्रभात फारच सुंदर आहे-उन्माद आणणारी आहे. सोळाव्या वर्षांच्या भावना जशा ताज्या असतात, तशी ही प्रभात आहे. एकाद्या नववधूप्रमाणें प्रभात फुलांनीं नटली आहे. यौवनाचें काव्य, सरलतेचें, निष्पापतेचें, प्रेमाचें काव्य माझ्या हृदयाला उचंबळवित होतें. कोमल व अकपट भावनांनीं, प्रेमळ भावनांनीं हृदय भरून आलें होतें. या मैदानाच्या वक्षःस्थलावर पातळ झिरझिरित धुक्याचें वस्त्र नाचत आहे; एकाद्या कुमारीचे मनांतील खोल विचार कोमल विनयशीलता ज्याप्रमाणें प्रकट होऊं देत नाहीं व त्यावर आच्छादन घालते-- त्यांना गूढ व अप्रकट स्थितींत ठेवते-- तसेंच हें वाटत होतें. जें जें माझ्या दृष्टीस पडत होतें तें मला आनंदवीत होतें, तें माझ्या कल्पनाशक्तीजवळ बोलत होतें. पवित्र प्रभात विवाहमंगलाची प्रभात-जणुं लग्नघटिका !

दूरच्या खेड्यांत घंटा वाजत होत्या व सृष्टीच्या या प्रार्थना संगीतांत - या मंगल प्रभातांत त्यांचेही मधूर संमीलन होत होतें. त्यांचा आवाज या वातावरणाला अनुकूल होता--यांत मिळून जात होता. दुरून वाजणाऱ्या त्या घंटा म्हणत होत्या " प्रार्थना कर, प्रेम कर ! तो परमकनवाळु सकळ जगत्तात-- तो चराचराचा मायबाप त्याची पूजा कर. " त्या घंटानिनादांत आसमंताच्या सृष्टींत असें कांहीं होतें--जें मुलांच्या आनंदासारखें होतें. एक प्रकारची अव्याज कृतज्ञता, पापताप ज्याला माहित नाहीं असा दिव्य स्वर्गीय आनंद त्यांत होता. नवीन जगांत ज्या दिवशीं प्रथम ईव्ह आली त्या पहिल्या दिवशीं ईव्हच्या हृदयांत जो साधा पवित्र वेडावणारा आनंद होता-- त्यासारखें कांहींतरी त्यांत होतें. सहृदयता किती चांगली गोष्ट आहे ! कौतुक करण्याची वृत्ति, गौरव करण्याची वृत्ति ही किती सुंदर असतें ! देवदूतांचें हें खाद्य असतें, स्वर्गीय जीवांचें, कृतकृत्य व्यक्तींचें हें सदोदितचें अन्न असतें-- त्या परमहंसांचा हा मौक्तिक चारा असतो.

मी आज येथें येऊन पांच दिवस झाले. परंतु इतकी शुद्ध हवा, इतकी जीवनदायी स्वर्गीय हवा अजूनपर्यंत अनुभवली नव्हती. आजच्या या हवेंत श्वसोच्छ्वास करणें म्हणजे आनंदरस पिणे आहे, सुधासेवन करणें आहे, परम-कृतार्थता आहे. पक्षाच्या जीवनांतील आनंद आज समजून येत आहे, सर्व खालीं दडपणाऱ्या ओझ्यापासून मुक्त होऊन, पंख फडफडून निर्मल हवेंत विहार करीत राहणें- तें तेजोमय अमृतमयजीवन, निळ्यानिळ्या आकाशांत तरंगत राहणें, पोहत राहणें, पंखांच्या एका फडफडवण्यासरशी या क्षितिजापासून त्या क्षितिजापर्यंत जाणें- असें तें पक्षाचें जीवन- त्यांतील आनंद व सौंदर्य अशा हवेंत कळून येतील. आपण पुष्कळ उंच जेव्हां जाऊं -आपण पुष्कळसे उंच जेव्हां होऊं--तेव्हांच अशी आंतरिक स्वतंत्रता अनुभवतां येईल. आपण पुष्कळसे पोकळ जेव्हां होऊं -हवामय होऊं तेव्हांच अशी आंतरिक स्वतंत्रता अनुभवतां येईल. जीवन असें हें हलके फूल वाटणें- हें तेव्हांच शक्य आहे. जेव्हां आपल्या पोटाखालीं पुष्कळ हवा असेल. प्रत्येक गोष्टींत काव्य आहे. परंतु हवेचे काव्य म्हणजे स्वातंत्र्य आहे. पुरे झाले विचार; स्वप्नांत रमणाऱ्या, तुझे काम करायला चल.

× × ×

१५७

सर्व प्रकारचे सर्प स्वतःच्या भक्ष्याला प्रथम मोह पाडतात, त्याला भुलवतात, आकर्षितात, सर्पाला असलेली मोह पाडण्याची ही देणगी ही बहुधा केवळ अमिश्र दुष्टपणाजवळ उपजतच असते. जें जें अभिजात दुष्ट आहे तें तें मोहकही असते, भुलवणारेहि असते. साध्या सरळ हृदयाला तो दुष्टपणा चकित करतो घुटमळवतो. सरळ हृदयाला येथें दुष्टता आहे असे दिसते--परंतु दिसून समजत नाहीं, उमजत नाहीं. याच्यावर विश्वास ठेवूं नये असें त्या सरळ हृदयाला वाटतें -तरीपण त्या वस्तूला जाऊन तें स्पर्श करतें; आणि शेवटीं त्याच्या तोंडांत तें पडते. एम्पीडॉक्लीस एटनाच्या ज्वालामुखींत जसा पडला त्याप्रमाणें प्रत्येक सैतान म्हणजे मोहाची दरी आहे. प्रत्येक आसुरी कर्म म्हणजे अंधारमय दरी आहे. जेथें स्वाभाविक दुष्टता आहे, उपजतच कपटाची, असत्याची, वंचनेची वृत्ति आहे-तेथें तेथें एक प्रकारची आकर्षक चमक असते. मग पशु असो, पक्षी असो वा मनुष्य असो.

या विचाराच्या पाठीमागें दुसरा एक विचार मला दिसतो. हा विचार मला सांगतो कीं मानवी दुष्टपणाच्या मुळाशीं वावदूकता (Sophistory) असते. बहुतेक सारे दुष्ट लोक स्वतःच्या दृष्टीनें स्वतःचे समर्थन करूं बघत असतात. स्वतःच्या कृत्याचे समर्थन करण्यांत त्यांना आनंद वाटतो. दुष्टांचें पहिला विशेष म्हणजे तो असत्याचा जनक असतो. अपराध करण्यापूर्वीं, पाप करण्यापूर्वीं सद्सद्विवेक बुद्धीला भ्रष्ट करणें जरूर आहे. जो कोणी दुष्टपणाच्या बऱ्याच वरच्या पायरीला पोंचण्यांत यश मिळवितो, त्यानें ह्याच गोष्टीवरून आरंभ केला असला पाहिजे. कोणाचा द्वेष करणें म्हणजे खून करण्यासारखेंच आहे असें आपण सहज म्हणतो. परंतु जो द्वेष करणारा असतो, तो नीती-दृष्टया आरोग्य मिळविण्यासाठीं म्हणूनच द्वेष करतो. तो द्वेष करण्यांत दुसरें कांहीं पहात नाहीं. स्वतःचें बरें करण्यासाठीं तो वाईट करतो, दुष्टता करतो; पिसाळलेला कुत्रा त्याला जी तहान लागलेली असते तिला शांत करण्यासाठीं

चावतो, त्याप्रमाणें पोटांत वाढलेले विष काढून टाकण्यासाठीं द्वेषी द्वेष करतो.

दुसऱ्याला इजा करणें व त्याचवेळेस जाणूनबुजून स्वतःलाही अपाय करून घेणें ही त्याच्या पुढची पायरी आहे. मग दुष्टतेचें वेड लागतें जणुं; पाप करण्यासाठीं जणुं जीव उतावळा होतो. मग हृदयाला कांहीं वाटत नाहीं. पोरांबाळांचीं खांडें करण्यासही मग कांहीं वाटत नाहीं. असल्या सैतानी वृत्तीनें मनुष्य जेव्हां पछाडला जातो, तेव्हां मनुष्य अशा रानटी पाशवी सर्पमय वृत्तींच्या आहारीं पडतो, तेव्हां तो देवदूतांना वेडाच वाटत असेल. जगाला जाळण्यासाठीं तो स्वतःच्या घराची होळी करतो, त्याच्या आसुरी इच्छेला जितक्या जगाचा कबजा घेतां येईल त्या जगाला भस्म करण्यासाठीं तो स्वतःचें घरदार पेटवतो. दुष्टपणा याप्रमाणें वाढत वाढत जातो—आणखी खालीं जाल—आणखी पुढें खोल आहेच. याप्रमाणें दुष्टपणाच्या खोल दरींत मनुष्य जात राहतो. दुष्टपणाला अंत नाहीं. नरकांतील वर्तुळें अनंत आहेत;—त्यांचा हा स्वभाव आहे. दैवी परिपूर्णता व सैतानी परिपूर्णता—दोन्ही अनंत आहेत! उन्नतीचा मार्गही अनंत व पापाचा मार्गही अनंत! स्वर्ग जितका उंच तितकाच नरकही खोल! मग दैवी संपत्ति व आसुरी संपत्ति हीं प्रमाणांत समान कीं काय? दैवी संपत्तीपेक्षां आसुरी संपत्तीचें क्षेत्र जर विशालतर असेल तर मग असुरता दुष्टता—हेंच ईश्वराचें खरें स्वरूप होईल व नरक सर्व सृष्टीला गिळून टाकील; खिश्चन व पारशी धर्मांप्रमाणें सत् हें शेवटीं असत्‌ला जिंकून घेईल; राम रावणाला जिंकील; एवढेंच नाहींतर सैतानही एक दिवस उद्धरला जाईल. रावण मुक्त होईल. याचाच अर्थ हा कीं दैवी व्यवस्था, ईश्वराचें राज्य पुनश्च सर्वत्र स्थापन केलें जाईल. द्वेषापेक्षां प्रेमच अधिक प्रभावशाली, अधिक सामर्थ्यवान् ठरेल. ईश्वर स्वतःचें वैभव, स्वतःचें ब्रीद, स्वतःचें यश सांभाळील ईश्वराचें वैभव त्याच्या चांगुलपणांत आहे, मंगलतेंत आहे; परंतु त्याबरोबर हेंही खरें आहे कीं मोहकपाप जीवाला त्रास देत असतें ईश्वराच्या हेतुविरुद्ध, ईश्वराच्या इच्छा मातींत मिळविण्यासाठीं आसुरी वृत्ति—आसुरी शक्ति हृदयांत एक होत असतात. आपणांस त्यांच्या हालचाली प्रथम दिसत नाहींत. परंतु एक दिवस एकदम पडदा उघडला

जातो व हृदय-कुरुक्षेत्रावर सत्प्रवृत्तींबरोबर, ईश्वरी हेतूंबरोबर लढावयास उठलेले काळेकुट्ट राक्षस दिसतात. सत्प्रवृत्ती दबत आहेत, मागें हटत आहेत असें क्षणभर दिसतें व जीव घाबरतो आणि गांगरून जातो हेंही खरें.

× × ×

१५८

अश्रूची कार्यकारण मीमांसा तो कोठून आला, कां आला, कसा आला--याची थोडी फार कल्पना करतां येते, तर्क करतां येतो. परंतु ती कार्य-कारणमीमांसा फार सूक्ष्म असल्यामुळें नीट पत्ता लागत नाहीं. मनांत एका-एकीं उचंबळणाऱ्या शेंकडों भावना व विचार यांचें काव्यमय सारांशरूपानें कथन म्हणजे अश्रु होय; मनांत परस्परविरोधी विचारांचें चाललेलें थैमान—त्यांचा अर्क म्हणजे हा अश्रु होय! अश्रु हा अत्तराच्या थेंबाप्रमाणें आहे. अत्तराच्या एका थेंबांत वीस फुलझाडांच्या फुलांचा अर्क आलेला असतो. त्याप्रमाणें अश्रूंत अनेक भावना व विचार यांचें सार असतें. कधीं कधीं हृदय भरून आल्यानें, अंतःकरणाचा पेला भरून वाहुन जाऊं लागल्यामुळें अश्रु येतात. जें सारें आपणांस बोलतां येत नसतें, किंवा बोलूं इच्छित नसतो, जें सारें स्वतःजवळही कबूल करण्यास आपण नाकारतों, तें सारें या अश्रूंत असतें. अस्पष्ट वासना, गुप्त त्रास व दुःख, दाबुन ठेवलेली दुःखें, आंतल्या-आंत चाललेलें झगडें, शब्दहीन शोक, ज्या भावनांशीं झगडलों अशा भावना, जें दुःख आपण लपवूं पहात होतों; आपल्याला कांहीं व्यर्थ भीति, काल्पनिक क्लेश व जाच, हृदयाची अशांति, खोटी भुतें, आपलीं अनुभूत स्वप्नें, धुळींत मिळालेलें मनोरथ, आपल्या ध्येयावर बसलेलें घाव, बसलेल्या जखमा, व्यर्थ आशा, असमाधान व ग्लानी लहानसहान दिसू न येणारी व लक्षांत येणारी शेकडों दुःखें, आधिव्याधि, हृदयाच्या एका कोपऱ्यांत जीं हळुंहळू जमा होत असतात, पागोळ्यांचे पाणी जसें जमा होत असतें—तसें थेंबेथेंबें सांचणारें हें दुःख आन्तरिक जीवनाच्या या ज्या गूढ हालचाली त्या सर्व एका क्षणांत

पुंजीभूत होतात; या सर्वांची एक भावना होते; व ही प्रचंड खच्चून एकत्र केलेली भावना अश्रूरूपानें डोळयाच्या पापणीवर प्रकट होतें.

अश्रु हे सुखाचेही असतात, दुःखाचेही असतात. भावनांचा संयम करण्यास जीव असमर्थ आहे, भावनावश न होता स्वतःचा स्वामी राहण्यास जीव अक्षम आहे याची खूण म्हणजे अश्रु होय. बोलण्याच्या पाठीमागें पृथक्करण अध्याहृत असतें; परंतु जेव्हां आपण एखाद्या कल्पनेनें, एखाद्या विचारानें, एखाद्या भावनेनें ओथंबून गेलेलों असतों, तेव्हां पृथक्करण थांबतें, व त्याबरोबरच वाचा पांगुळते व स्वातंत्र्य गमावते. स्तब्धतेनंतर, पूर ओसरल्यानंतर कर्माच्या भाषेंत बोलणें हाच एक उपाय मग राहतो. मूक भाषा अभिनय व खुणांनीं दर्शवलेली भाषा. कोणत्याही विचाराचा दुःखप्रद बोजा जेव्हां हृदयावर पडतों, तेव्हां आपण मानवजातीच्या आधींच्या स्थितींत जातों, आपण कांहीं हालचाल करतों, खूण करतों, हंबरडा फोडतों, हुंदका देतों— आणि त्यानंतर मूर्च्छित होतों--दगड होऊन पडतो. म्हणजेच माणसाप्रमाणें विचारांचा शार सहन करण्यास असमर्थ असल्यामुळें आपण केवळ पशुस्थितींत जातो व त्यानंतर पशुंतून वृक्षवनस्पती, दगड यांच्या स्थितींत जातों. नरकांतून प्रवास करतांना डांटे पावलोंपावलीं मूर्च्छित होतों त्याच्या भावनांची उत्कटता, भावनांचा जोर त्याच्या भक्तिमय हृदयाचा जिव्हाळा यानें, या मूर्च्छेनें जितकी दिसून येते, तितकी शब्दांच्या पाल्हाळानें दाखवतां आली नसती.

आणि अत्यंत आनंद. तो सुद्धां मुकाच असतो. उपसंहृत असतो. बोलणें म्हणजे पसरणें, फेंकणें, पृथक्करणें, विखरणें. शब्द जीवनाला निराळें करून एका विवक्षित स्थळीं त्याला डांबतात; शब्द हे आपल्या जीवनाच्या परीघाला—बाह्यरूपाला स्पर्श करतात. अंगणांत ते येतात; दारापर्यंत येऊन डोकावतात. शब्द हे पृथःकरण करतात, एका गोष्टीचाच एकावेळीं विचार करतात. अशा रीतीनें ते भावनेला केंद्रच्युत करतात व तिला थंड करतात-- तिच्यांतील ऊब, वाफ नाहींशी करतात. हृदयाला आपल्या भावनांचें चिंतन करण्यालाच आवडतें; त्या भावना खेळवण्यांत, त्यांना जपून ठेवण्यांतच हृदयाला समाधान असतें. अशा हृदयाचा आनंद मुका असतो,

चिंतनरूप असतो; असें हृदय आपलेच ठोके ऐकत राहतें; पवित्र भावनेनें स्वतःवरच स्वतःचें पोषण करतें.

× × ×

१५९

निरभ्र आकाशांत प्रशांत चंद्रमा. पिठासारखें चांदणें पडलें आहे. निशा गंभीर व भव्य दिसत आहे. मोठमोठे झोंपी गेले आहेत व तारे पहारा करीत आहेत. दूरच्या दरींतील घनदाट अंधारांत कांहीं घराचीं छपरें चमकत आहेत; पर्वतरूप मंदिरांत प्रवाहाचें संगीत अखंड चाललें आहे; या मंदिरावर आकाशाचें छप्पर आहे.

या श्यामारजनीकडे शेवटचें पाहाणें; या अमर्याद अफाट देखाव्याकडचें शेवटचें अवलोकन गुरु नुकताच मावळत आहे. वरच्या रत्नखचित ताराखचित अंबरांतून स्वप्नांची अदृश्य बर्फमयवृष्टि खालीं येत आहे व शुद्ध व शांत झोंपेकडे आपणांस बोलावीत आहे. ह्या अशा निसर्गांत कमजोर करणारें, किंवा वैयक्तिक असें कांहींही नाहीं. विलासतेचा गंधही नाहीं. सर्व कांहीं बलवान, प्रखर, पवित्र, तपोमय असें वाटत आहे. सर्व जगाला रामराम—दुःखी व सुखी दोघांना नमस्कार. विश्रांति—पुनः ताजेतवाने होणें. नवीन प्रारंभ—नवीन आशा. एक दिवस संपला. मध्यरात्रीचे ठोके पडत आहेत. एक दिवस गेला. मरणाकडे आणखी एक पाऊल टाकलें; स्मशानाच्या जवळ आणखी एक पाऊल गेलों.

× × ×

१६०

आर्चबिशप बोमंटला रूसोनें लिहिलेलें पत्र आज १०–१२ वर्षांनीं पुन्हां वाचीत आहे. पूर्वीइतकें कौतुक आज वाचतांना वाटलें नाहीं. या

पत्रांतील भाषा सूत्रमय आहे, अर्थमय आहे. प्रत्येक शब्दावर जोर आहे. वाचकाला कंटाळा येतो अशा लिहिण्याचा शेवटीं. सूत्रमय भाषाशैली—बह्वर्थमयी व लघुशब्दमयी शैली—गणित शास्त्रावरचा ग्रंथच आपण वाचीत आहोंत असा परिणाम मनावर करते. असें पुस्तक वाचल्यावर कांहींतरी सोपें, सहज, आनंदाचें वाचावेसें वाटतें. रूसोची भाषा समजायला श्रम लागतात व मनुष्याला जरा विश्रांति घ्यावी, जरा दुसरा विरंगुळा पहावा असें वाटूं लागतें.

परंतु या रूसोनें किती ग्रंथकारांना जन्म दिला आहे! किती तरी पुस्तकांना स्फूर्ति रूसोनें दिली आहे! चॅटोब्रँड, लॅमेनिस, प्रौढन-या सर्वांत थोड्या फार फरकानें रूसो दिसतोच. De la Justice dans la Revolution हें जें प्रौढनचें मोठें पुस्तक–महान् ग्रंथ–त्याची कल्पना रूसोनें हें जें लिहिलेलें पत्र त्यावरूनच घेतलेली आहे. या ग्रंथाचे तीन भाग म्हणजे आर्चबिषपला लिहिलेल्या पत्रांचा एक हारच आहे. या ग्रंथांत जें वक्तृत्व आहे, जो जोर आहे, जें तेज आहे, जी अस्खलितता आहे–त्या सर्वांत सूक्ष्म उपहास सर्वत्र भरलेला आहे, व रूसोच्या पत्रांत हेंच आहे.

एका माणसांत अनेक माणसें असतात; एकाच मोठ्या लेखकांत अनेक भाषाशैली असतात! रूसोनें अनेक भाषा पद्धतींना जन्म दिला आहे. कल्पनाशक्ति त्याला बदलवून टाकते व निरनिराळ्या वेळीं तो निरनिराळा होतो, व प्रत्येक भूमिका उत्कृष्टपणें तो पार पाडतो. अशा या भूमिकांतून कधीं कधीं तो तार्किकाचीही भूमिका घेतो व तीही पार पाडतो. परंतु कल्पनाशक्ति ही त्याची मुख्य किल्ली आहे. त्याच्या सर्व बौद्धिक शक्ति कल्पनेच्या आंसाभोंवतीं फिरत आहेत. त्याची मुख्य देणगी–प्रभावी शक्ति म्हणजे कल्पनाशक्ति. त्याच्या सर्व ग्रंथांत तो अर्धवट प्रामाणिक आहे, अर्धवट उत्कट आहे. त्याची बुद्धि सर्व विषयांजवळ जाते. कोणत्याही पक्षाचें तो समर्थन करतो–मग तो पक्ष कितीही वाईट असला, तरी जर अटीस पडला असेल, ईर्षेस चढला असेल–तर त्यानें त्या पक्षाची बाजू घेतलीच समजा. याचा परिणाम असा होतो कीं त्यांत खरी तळमळ, खरी उत्कटता येणें शक्य नसतें; पुरा जिव्हाळा, पोटतिडिक त्या लिहिण्यांत दिसणार नाहीं. कारण एक

प्रकारचें हट्टास पेटणें असतें. वकील ज्याप्रमाणें दुसऱ्याची बाजू मांडतो तसेंच हें परंतु रूसोंत प्रतिभा व कल्पनाशक्ति जोरदार असल्यामुळें त्यांतही तो रंगून जाई. दुसऱ्याच्या विषयांतही तो एकरूप होई. बुद्धिमान् लोकांना हा मोह बहुधा जडतोच. निरनिराळ्या विषयांना ती स्वतःपेक्षां आपली बुद्धि कमी असें ते मानणार नाहींत. विषयांना ते शरण आणतील. स्वतः विषयांना शरण जाणार नाहींत. केवळ जितं मया करण्यासाठींच लढावयाचें, सद्सद्विवेक बुद्धीच्या सिंहासनावर आत्मश्लाघा व अहंपूजा बसवावयाची. एखाद्या चांगल्या गोष्टीसाठीं विजय मिळवून घेण्यांत बुद्धीला आनंद होतो–यांत शंका नाहीं. परंतु जोंपर्यंत तिच्या निशाणाला सर्वत्र विजय मिळत असतो, तोंपर्यंत ती सर्वत्र झेंडे मिरवीत जाते. सर्व ज्ञान प्रांतांत दिग्विजयासाठीं जाते; पक्ष सत् आहे का असत् आहे हें ती पहात नाहीं जेथें जय मिळेल तेथें ती जाते–व भालेरावी गाजवते. दुबळ्या व वाईट गोष्टींसाठीं झगडूनही विजय मिळवणें यांत बुद्धीला आनंद होतो कीं नाहीं यांत बुद्धीला प्रौढी वाटतें कीं नाहीं हें मला माहीत नाहीं.

हुशार लोकांना विरोधी बोलण्यांत आनंद वाटतो–बुद्धिमान लोकांचें तें परमसुख. सर्व जगाच्या विरुद्ध बाजूस दंड थोपटून उभें राहण्यांत त्यांना गुदगुल्या होत असतात, सामान्य लोकांच्या विचारसरणीचा ते तेव्हांच धुव्वा उडवितात; त्यांच्या अकलेला तेव्हांच चित करतात; खेडवळ अडाणी लोकांनीं गंभीरपणें महत्त्वाचे म्हणून मांडलेलें महत्त्वाचें मुद्दे–त्यांची टर तो उडवितो. बुद्धिमत्ता व सत्यप्रीति ह्या तर मग एकच वस्तु नाहीं. या दोन निराळ्या गोष्टी आहेत. दोहोंच्या प्रवृत्ति व दोहोंचें पंथ निराळे आहेत. बुद्धीची नैसर्गिक वृत्ति दुसऱ्यास हुकूम करण्याची आहे, आज्ञा सोडण्याची आहे. तिची ही नैसर्गिक वृत्ति वळवून बुद्धीला आज्ञापालक करणें ह्याला अत्यंत जागरूक अशा नैतिक भावनेची, चारित्र्य व शीलाची जरूर आहे. उच्चारलेल्या व लिहिलेल्या शब्दांचे कारागार–कवि व वक्ते असे जे ग्रीक लोक–ते पुढें यूलायसीच्या वेळेस कृत्रिम व्हायला लागले, पेरिक्लिसच्या वेळेस तर केवळ शब्दाचा कीस काढणारे व वाटेल तें सिद्ध करणारे झाले. धूर्त,

शाब्दिक, सर्व प्रकारच्या दरबारी भाषेंत निष्णात असे झाले. राष्ट्राच्या बुद्धींतून राष्ट्राचे दुर्गुण जन्माला आले.

रूसोप्रमाणें वादविवादानें प्रसिद्धिस येणें-खंडनमंडनानें आपलें नांव ठेवून जाणें—यासाठीं सदैव अतिशयोक्ति व सदैव झगडे यांना बळी पडावें लागेल. अशा मनुष्याला मिळणाऱ्या प्रसिद्धीबद्दल दुहेरी भूर्दंड भरावा लागतो. तो कधींही संपूर्णपणें सत्य नसतो, व स्वतःचें खरें स्वरूप त्याला कधींही पुन्हां मिळवितां येत नाहीं-जगाला दाखवतां येत नाहीं.

सर्व बाबतींत रूसो हा पायंडा घालणारा आहे. तो सर्व वस्तूंचा जनक आहे. पायांनीं प्रवास करण्याची प्रथा त्यानें सुरू केली; प्रसागिक मननें लिहिण्यास सुरवांत केली. जॉर्ज सँडच्या पूर्वी ललितभाषेंतील वनस्पति शास्त्राचा त्यानें पाया घातला. निसर्गाचा पूजक पहिला तोच. १७८९ च्या फ्रेंच क्रांतीच्या पूर्वी लोकसत्तेचे विचार मांडणारा तोच. राजकीय व धार्मिक वादविवादांना व चर्चांना त्यानेंच तोंड फोडलें.

पेस्टॅलॉझीच्या आधीं शिक्षण शास्त्रावर त्यानें लिहिले; आल्प्स पर्वताचे वर्णन त्यानेंच प्रथम केले. संगीत सार्वत्रिक त्यानेंच केले. घरोघरी नेले. स्वतःचें आत्मचरित्र लिहून त्यांत स्वतःचे गुणदोष समाजासमोर कबूल करण्याची प्रथा त्यानेंच पाडिली. नवीन फ्रेंच भाषाशैली त्यानें बनविली; घट्ट शुद्ध, जोरदार, भावनोत्कट घवघवीत भाषाशैली--जी आपल्या सर्वांच्या परिचयाची आतां झाली आहे--तिचा जनक तोच. रूसोचे कांहींएक नष्ट झाले नाहीं, गमावले नाहीं. फ्रेंच राज्यक्रांतीवर त्याच्या इतका कोणाचाच परिणाम झाला नाहीं; फ्रेंच राज्यक्रांतीचा आचार्य तो--विधाता तो. नेकर व नेपोलियन ह्यांच्यामध्यें तो उभा आहे. पुनः १९ व्या शतकाच्या आरंभावरही त्याच्याइतका दुसऱ्या कोणाचा परिणाम झाला नाहीं, बायरन, पॅटोब्रँड, मॅडम डी स्टील, जॉर्ज सँड -हें सारे त्याचेच वंशज आहेत--हीं त्यांचीच मुलें आहेत.

अशी अपूर्व बुद्धिमत्ता, अलौकिक देणग्या असूनही तो अत्यंत दुःखी दुर्दैवी मनुष्य होता. अत्यंत दुःखी जीव होता! कारण स्वतःची प्रतिभा, स्वतःच्या भावना, स्वतःची कल्पना यांचा तो गुलाम होत असे. कर्मांत

संयम त्याला माहीत नव्हता; कोणतेहि ठरवतांना सारासार विवेक करीत नसे. परंतु ह्याबद्दल वाईट वाटण्यांतही अर्थ नाहीं. कारण रूसो जर शांत, विवेकी, व्यवस्थित, संयमी असतां, तर इतका परिणाम त्याला करतां आला नसतां, अशी छाप त्याला पाडतां आली नसती. त्याची व त्याच्या काळाची टक्कर झाली व या घर्षणांतून त्याचा जोर--त्याची तेजाळ वाणी--त्याप्रमाणेंच त्याचीं दुर्दैवें निर्माण झाली. जीवनावर व स्वतःवर साधी अकपट श्रद्धा--त्याची प्रथम होती--तिचे शेवटीं निराशेंत व नास्तिकतेंत पर्यवसान झालें. कारणाशिवाय तो दुःखी व खिन्न राहू लागला. खिन्नता हें त्याचे जणुं जीवनस्वरूप झालें.

गटे व व्हॉल्टेअर हे रूसोपेक्षां किती निराळे जीवनांतील व्यवहारिक शहाणपणा ते कसा ओळखीत व त्यांना ज्या लेखनाच्या देणग्या होत्या--त्यांचा कसा उपयोग त्यांनीं करून घेतला ! ते कार्यक्षम समर्थ पुरुष होते. रूसो हा स्वप्नसृष्टींत वावरणारा आहे. परंतु गटे व व्हॉल्टेअर ह्यांना मानवजात खरोखरच कशी आहे तें ठाऊक होतें. परंतु रूसोला ती अधिक वाईट किंवा अधिक चांगली ती प्रसंगानुरूप दिसत असे. तो कधीं सर्वांना देव मानील तर कधीं दानव मानील. त्याला दोन टोकें माहीती. मध्यबिंदु त्याला माहीत नाहीं. जीवनाचा आरंभ चुकीनें केल्यामुळें शेवटीं तो वेडा झाला. रूसोच्या बुद्धिमत्तेंत सदैव कांहींतरी अहितकर आहे, अस्थिर असें आहे. कांहींतरी खवळलेलें, प्रक्षुब्ध असें आहे, कांहींतरी कीस काढलेलें, चर्चात्मक आहेच. यामुळें वाचकाचा विश्वास नाहींसा होतो. याचें कारण निःसंशय हेंच कीं, त्याला लिहावयास प्रेरणा देणाऱ्या वृत्ति रागद्वेषात्मक असत; विकार त्याच्या प्रतिभेला पेटवीत, कल्पना शक्तीला जागृत करीत; त्याच्या बुद्धीवर विकारांची संपूर्ण सत्ता चालत असे.

× × ×

१६१

आपण ज्या निरनिराळ्या चुका करतों, दोष व अपराध करतों, त्यांची नकळत मागितलेली माफी म्हणजे सर्व विचारपद्धती होत. आपलें आवडतें पाप आपणांपासून लपविण्यासाठीं हे डोलारे आपण उभे करीत असतों.

× × ×

१६२

जें अपूर्ण आहे तें नाहींच.

× × ×

१६३

महापुरुष हेच खरें पुरुष. त्यांना निर्माण करण्यांत निसर्गाला यश येतें; ते अपूर्व नसतात–तर खऱ्या व्यवस्थेंत राहतात. या विश्वाची जी घडी–तिच्याशीं जुळून वागतात. मनुष्यांनीं जसें असावें तसें नसणारे जे पुरुष–ते मनुष्य नसून कांहींतरी निराळयाच जातीचीं माणसें असतात.

× × ×

१६४

नळींतून साबणाचे बुडबुडे आपण उडवतों–त्या बुडबुड्याप्रमाणें हें जीवन आहे. तो बुडबुडा आकार धारण करतों, मग पूर्णपणें फुगतो–अत्यंत सुंदर रंगांनीं स्वतःला रंगवतो–नटवतो. कधींकधीं गुरुत्वाकर्षणाच्या नियमां-

नाही चुकवतो व वर उडतो. परंतु दुसऱ्याच क्षणीं एक काळा ठिपका त्याच्यांत दिसतो आणि सोन्याचा, हिरेमाणकांचा, पांचूचा हा गोल हवेंत विरून जातो. त्याचें कांहींही पाठीमागें राहात नाहीं. एक घाणेरडा पाण्याचा थेंब फारतर नळीच्या तोंडाशीं असेल. सर्व कवींनीं जीवनाची तुलना या बुडबुड्याशीं केली आहे व ती किती यथार्थ आहे ! दिसणें, चमकणें, अदृश्य होणें; पडद्यापुढें येणें--दोन हावभाव करणें--पडद्या पाठीमागें जाणें; जन्माला येणें--दुःख भोगणें-मरणें; फुलपांखरूं असो, राष्ट्र असो, तारा असो--सर्वांच्या जीवनाचा इत्यर्थ हाच नाहीं कां ?

मनांत विचार करावयास जी अडचण पडते-- तिचें माप म्हणजे काळ. पवित्र चिच्छक्तीला, केवळ निरंजन ज्ञप्तीला काळाची जरूरच नसते-कारण विचारांची दोन्हीं टोकें-विचारांचा आद्यंत एकदमच तिला प्रतीत होतो. एकाद्या ग्रहाची कल्पना करायला निसर्गाला पुष्कळ प्रयत्न व श्रम लागतील, परंतु परम ज्ञप्तिला एका क्षणांत तें सर्व सांगता येईल-आकलन करतां येईल. जीवनाचे एकापाठीमागून एक उलगडत जाणें एकेक घडी उलगडत जाणें म्हणजे काळ होय. मनांत आलेल्या सहजस्फूर्तींचें क्रमवार पृथःकरण जसें आपण शब्दांत करतों, मनांत एकदम ठरवलेला निश्चय शब्दांत जसा क्रमशः स्पष्ट करतों--त्याप्रमाणें आपण आपलें जीवन कालरूपानें मांडीत असतों--उलगडून दाखवित असतों. काळ हा स्वतः सापेक्ष आहे व अभावरूपही आहे; परमोच्च तत्त्वाजवळ काळ अदृश्य होतो. मुक्ततत्त्वाला काळाचें बंधन नाहीं; परमेश्वराला काळाचें बंधन नाहीं. तो तर सर्वज्ञ आहे--तेथें आतां मागचें पुढचें असें कांहीं नाहीं. ईश्वर हा कालातीत आहे कारण तो सर्व विचार एकदम एका क्षणांत करूं शकतो. निसर्गच हा कालमर्यादित आहे-- कारण निसर्ग म्हणजे वाणी-बोलणें--प्रत्येक विचाराचें क्रमशः प्रकटीकरण करणें; अनंत विचारांतील प्रत्येक विचाराचें स्वरूप उलगडून दाखवणें हें कर्म अशक्य आहे व निसर्ग थकतो, दमून जातो; कारण अनंत जें आहे त्याचें पृथक्करण करणें अशक्य. हा वदतोव्याघात आहे. अनंताला पृथक्करणें म्हणजे अमराला मारण्यासारखें आहे--अखंडाचें खंड कसे पाडता येतील ? अमर्याद अव-

काशांत, अमर्याद काळांत अनंत संख्येनें संपन्न होऊन निसर्गाला जें कांहीं करतां येणें शक्य आहे तें तो करीत असतो; तें जें परमोच्चतत्त्व, ती जी अनंतता–तिच्यांतील अनंत वैभव जितके प्रकट करतां येईल तितकें निसर्ग करतो. ज्या गुहांतून व दऱ्यांतून मन डोकावतें, आंतशिरतें, त्या दऱ्याखोऱ्यांची खोली व विशालता पाहिली, अनंत व चिरंतन विचाराला घरांत सांठविण्याचा–त्याला स्थाननिविष्ट करण्याचा प्रयत्न–अपयशि का असेना–मन करीत असतें. तो प्रयत्न पाहिला म्हणजे त्या दिव्य मनाच्या मोठेपणाची थोडीशी कल्पना येते. ज्या क्षणीं हें मन स्वतःमधून बाहेर पडून स्वतःचें विवरण करूं पाहील त्याक्षणीं काय बोलावें तें त्याला समजणार नाहीं. बोलण्याची धडपड तें करील, एकावर एक ब्रह्मांडे रचील, अनंत युगें जातील, तरीही स्वतःचें स्वरूप सांगता येणार नाहीं. तें यतो वाचो निवर्तन्ते असेंच राहणार, व मोठमोठीं भाषणें व ग्रंथ लिहिले जाणार–परंतु तें अज्ञेय व अवर्णनीय असेंच राहणार.

पौर्वात्य देशांत अचलता हें अनंततेचें रूप पसंत केलें जातें; पश्चिमेकडे गति हें रूप पसंत केलें जातें. पश्चिमेला बारीक बारीक सर्व गोष्टींचें वेड आहे व व्यक्तीच्या योग्यतेबद्दल अधिक श्रेष्ठता वाटते–हें त्याचें कारण आहे. प्रत्येक व्यक्ति आपल्या वैयक्तिक योग्यतेप्रमाणें कांहींतरी अभिमानास्पद ठेवा जमवीत असते. एखाद्या मुलाला एक लाख रुपये रोख ठेवलेले असावेत, त्याप्रमाणें पश्चिमेला तेच रुपये पुनःपुन्हां पैसे पै यांच्या रूपांत मोजल्यानें आपण अधिक श्रीमंत होत आहोंत असें वाटतें. पाश्चिमात्यांना प्रगतीचें जें वेड आहे–तो त्यांच्या मोहाचा परिणाम आहे; त्यांच्या चुकीच्या भुलीचा परिणाम आहे. जें ध्येय मिळवायचें, जें टोक–प्राप्तव्य गांठावयाचें आहे तें पाश्चिमात्य विसरून गेले आहेत, ही ती चूक होय. ध्येयाला विसरून प्रत्येक क्षुद्र पाऊल जें टाकलें जातें–त्यांतच ते अभिमानानें व ऐटीनें तल्लीन होतात. त्यांतच गुंग होतात. पाश्चिमात्य लोक अजून मुलें आहेत, कधीं कधीं केलेल्या थोड्याफार फरकालाच सुधारणा मानण्याचीही ते चूक करतात. तेंच तेंच पुन्हां करणें म्हणजेच पूर्णतेची वाढ अशीही भ्रामक समजूत ते करतात.

अर्वाचीन मनुष्य जो आहे. त्याच्या हृदयांत खोल स्वतःला विसरून

जाण्याची, एक वृत्ति आहे; स्वतःला दुसऱ्या कशांत तरी तल्लीन करावें, स्वतःचें लक्ष बाह्य वस्तूंत कोठेंतरी गुंतवावें अशी एक तहान आहे. जी जी गोष्ट स्वतःचे क्षुद्रत्व व लघुत्व त्याला दाखवील त्या त्या गोष्टीबद्दल त्याला एक प्रकारची आंत गूढ भीति वाटते; चिरंतन, अनंत, पूर्ण असें जें आहे--तें त्याला भिववतें, घाबरवतें. स्वतःचेंच कौतुक करावेसे त्याला वाटतें; आपण चांगले असें म्हणण्यास त्याला आवडतें. स्वतःचा गौरव करावा, स्वतःची पाठ थोपटावी हें अर्वाचीन मनुष्याला आवडतें. आणि म्हणून जे महान् प्रश्न किंवा जीं दरींखोरीं, ज्या गुहा त्याला त्याचें क्षुद्रत्व बुद्‌बुदत्व पटवतील त्यापासून तो पराङ्मुख होतो. आपल्यातील मोठमोठ्या माणसांतही लघुता व क्षुद्रता कधीं कधीं असतें त्याचें हें कारण होय, आपणांत वैयक्तिक थोरपणांत व प्रौढता आढळत नाहीं त्याचेंही हेंच कारण. आपण सुधारलेले पोपट आहोंत झालें. वाळवंटांतलि अरबाजवळ आमच्यातलि महापुरुषांची तुलना केली तर या महापुरुषांतलि कांहीं एक प्रकारची लघुता व क्षुद्रता आहे; अरबाची दिलदारी ही आपणांत नाहीं हें दिसून येईल; त्यांच प्रमाणें आपल्या बहूजन समाजांत वाढत जाणारी छचोर व थिल्लरपणाची वृत्ति, याचें कारण हेंच होय. बहूजनसमाज अधिकाधिक साक्षर व सुशिक्षित होत आहे, परंतु त्याचबरोबर सुखाच्या कल्पनांत अधिकाधिक उथळ व वरपांगी होत आहे.

म्हणूनच आतां ख्रिश्चन धर्माला महत्त्वाची सेवा करतां येईल. आपल्यांत मिसळलेला ख्रिश्चनधर्म म्हणजे पौर्वात्य संस्कृतीचेंच तें अंग आहे. जें क्षणभंगुर व जाणारें आहे, त्याच्याबद्दल वाटणारी अमर्याद हांव व उत्सुकता--ह्याला ख्रिश्चन धर्म आळा घालतो, लगाम घालतो; जें सान्त आहे, बदलणारें आहे, त्याच्याऐवजीं चिरंतनाकडे आपले लक्ष ख्रिश्चन धर्म खेंचतो; आणि आपल्या प्रेमाला आणि आसक्तीला ध्येयात्मक बनवतो, उदात्त करतो. ख्रिश्चन धर्म नसता तर ध्येयभूत सृष्टीकडे कदाचित् आपण पाहिलेंही नसतें. व्यग्रतेंतून ख्रिश्चनधर्म आपणांस एकाग्रतेकडे नेत आहे; अनेक फाटे फुटलेल्या बुद्धीला निश्चयात्मक व स्थिर करीत आहे. केवळ जगाच्या काथ्याकुटाऐवजीं स्वतःची आठवण करायला लावीत आहे. ख्रिश्चनधर्म आपली हृदयें पुन्हां निरोगी करीत आहे, वासनांचा ताप जरा शमवीत आहे. शेंकडों प्रकारच्या

इच्छांनीं तप्त झालेल्या मनाला गंभीरता, शांति व उदात्तता देत आहे. निद्रेच्या स्नानानें आपल्या कर्ममय जीवनाला जशी तरतरी येते, त्याप्रमाणें आपल्या अमर जीवनाला धर्मस्नानानें टवटवी व तजेला येतो. धर्मगंगा अमर जीवनावरील मालीस दूर करून त्याला उजाळा देते. जे पवित्र असतें तें विशुद्ध करणारें असतें -निर्मल करणारें असतें. धर्माचा, भक्तीचा जिव्हाळा मुखाला एक प्रकारचें तेज देतो, डोळयांत नवीन प्रकाश ओततो; हृदयाला अवर्णनीय आनंदानें उचंबळवतो.

धर्माचे जे शत्रु आहेत ते पाश्चिमात्यांच्या काय गरजा आहेत यासंबंधीं भ्रमांत आहेत, स्वतःला फसवीत आहेत असें मला वाटते. प्रगतीच्या अपक्व तत्त्वाकडे जर अर्वाचीन जग कायमचें झुकेल–तर मग त्याला आपला तोल संभाळतां येणार नाहीं. गुरुत्वमध्य ढळेल. आपणा पाश्चिमात्यांना जें अनंत आहे, चिरंतन आहे, स्वयंभू आहे त्याची जरूरी आहे--सदैव आवश्यकता आहे; आणि ज्याअर्थी जें जें सापेक्ष आहे, अपूर्ण आहे, मर्यादित आहे--त्यांतच तृप्त आहे तोंपर्यंत शास्त्र एक जागा तशीच सोडून देत असतें असें होतें. ही जांगा जेथें शास्त्र डोकावत नाहीं ती जागा चिंतनानें, पूजेनें, भक्तीनें आपण भरून काढणें हें इष्ट आहे. बेकननें म्हटलें आहे—" जीवन सडून जाऊं नये म्हणून त्याच्यांत घातलेला मीठमसाला म्हणजे धर्म होय. " धर्म हें जीवनाचें मीठ आहे. विशेषतः आजतर धर्माच्या बाबतींत हें अधिकच सत्य आहे. ( धर्माचा अर्थ प्लेटोप्रमाणें-पौर्वात्याप्रमाणें करूं ) स्वतःचें स्मरण, बहिर्मुखता सोडून थोडें अन्तर्मुख होणें, ही गोष्ट सर्व थोर व उपयुक्त कर्माला हितकर अशीच आहे.

असें अन्तर्मुख होणें, आपल्या आत्ममंदिरांत क्षणभर जाणें, जें गंभीर आहे, दिव्य आहे, पवित्र आहे त्याच्यापाशीं जरा जाऊन बसणें, देवाच्या दारीं क्षणभर याप्रमाणें जाऊन उभें राहणें–ही गोष्ट दिवसानु–दिवस अधिकाधिक अशक्य होत चालली आहे. एक कारण असें कीं धार्मिक उपदेशांतच अधिकाधिक ऐहिकता व प्रापंचिकता येत आहे व दुसरें कारण म्हणजे समाजांतील सार्वत्रिक प्रक्षोभ व अशांतता. परंतु कांहीं असलें तरी आपल्या दिव्यस्वरूपा जवळ जाणें, त्या अमृतझरीजवळ जाणें हें सुतरां आवश्यक

आहे. त्याशिवाय आंतरिक जीवन म्हणून कांहीं राहणारच नाहीं व आंतरिक जीवनाशिवाय परिस्थितीशीं झगडण्यांत आपण विजयी होणार नाहीं. ध्रुवाकडून विशुववृत्ताकडे जातांना खलाशानें आपल्या अंगांतील उष्णता जर बरोबर नेली नाहीं, तर तो विषुववृत्ताकडे कसा जाणार व जिवंत तरी कसा राहणार? आंतील ऊब घालवतां कामा नये. ती थंड झाली तर सारेंच थंड झालें. ज्या माणसाला स्वतःच्या हृदयांत आधार नाहीं, ज्याला आंतील मंदिर नाहीं, माजघर नाहीं, जो नेहमीं रस्त्यावरच्या खोलींतच बसतो उठतो, जगतो, बाह्य जगाचीं मतें व बाह्य जगांतील वस्तु यांच्या वावटळींतच ज्याचें जगणें, त्याला व्यक्ति मनुष्य असें कसें म्हणावें. तो व्यक्ति नसून वस्तुच झाला. तो जडच जणुं झाला. तो जगाहून विशेष निराळा, स्वतंत्र, स्वयंभू, अभिजात, कारणरूप ( केवळ कार्यरूप नाहीं—परिणाम नाहीं ) असा जर नसेल, कोणीतरी—जर नसेल तर त्याच्यांत काय राहिलें? समुदायांतील एक, केवळ कर भरणारा, मत देणारा, परंतु ज्याला नांव ना गांव अशी एक वस्तु तो आहे—परंतु तो मनुष्य नाहीं. एक समुदाय करावयाला, एक जमाव करायला त्याचा उपयोग आहे; पैदास करणारे व फन्ना पाडणारे यांची संख्या भरून काढणारा तोही एक आहे; परंतु त्याच्या जीवनानें कोणाला आनंद होणार, त्याच्या जीवनानें कोणाला कौतुक वाटणार, महत्त्व वाटणार? अर्थशास्त्रज्ञाला, आंकडे मोड करणाऱ्याला, फार तर त्यांची गंमत वाटत असेल. हे अर्थशास्त्रज्ञ व आंकडेशास्त्रज्ञ वाळूच्या एका राशीचा एकदम विचार करतात; परंतु या वाळूच्या राशींतील सारे कण एकसारखेच कसे, त्यांना विशेषत्व कां नाहीं, विविधता कां नाहीं याचा विचारही त्याच्या मनाला शिवत नाहीं. सामुदायिक बळ या नात्यानेंच समुदायाला महत्त्व आहे. कां? कारण त्या समाजाचें जे घटक आहेत ते एकएकटे वैयक्तिक दृष्ट्या क्षुद्र आहेत; ते सारे एकमेकांसारखेच आहेत. आणि पाण्याचे थेंब नदींत एकत्र जमून ज्याप्रमाणें प्रचंड प्रवाह होतो—त्या निरनिराळ्या थेंबांना मग न तपासतां प्रत्येक बिंदूचें कौतुक न करतां—सर्व प्रवाहाचें दहाफूट खोल प्रवाहाचें एकदम कौतुक व वर्णन करतो—तसेंच हें. असें माणसांचे थवे—म्हणजे इतकीं शरीरें या अर्थानेंच गणले जातात—त्यांचें मोजमाप

केलें जातें. हे इतके सद्सद्विवेक बुद्धीनें युक्त असे विशिष्ट जीव आहेत-प्रत्येकांत कांहीं वैशिष्ट्य आहे-या दृष्टीनें त्यांच्याकडे पाहण्यांत येत नाहीं.

जो प्रवाहाबरोबर वहात जातो, उदात्त व उच्चतम तत्त्वाप्रमाणें जो स्वतःला निरनिराळें वळण देत नाहीं, स्वतःचा मार्गदर्शक होत नाहीं, ज्याला ध्येय नाहीं, निःसंदिग्ध निश्चयात्मक विचार नाहींत-असा मनुष्य म्हणजे जगाच्या बाजारांतील लांकडी सामानांतीलच एक वस्तु होय. तो एक पडसाद आहे, प्रतिबिंब आहे, छाया आहे.—तो सत्य नाहीं. ज्या मनुष्याला आंतरिक जीवन नाहीं, तो परिस्थितीचा गुलाम आहे. ज्याप्रमाणें बॅरॉमीटर वातावरणाचा गुलाम असतो, व वातचक्र गतिमान् वाऱ्यावर अवलंबून असतें-त्याचें नम्रसेवक असतें-त्याप्रमाणें असा मनुष्य जगाचा गुलाम होतो.

× × ×

१६५

संध्याकाळचें जेवण झाल्यावर मी कोठें कोणाजवळ जाऊं हें मला कळेना. मी अगदीं एकटा आहे. मला एकटें एकट्यासारखें वाटत होतें. आज संगतीसाठीं माझें हृदय भुकेलें होतें. कोणाजवळ तरी बोलावयास सुखसंवाद करावयास मन अधीर झालें होतें. विचार विनिमय करावा, थोडा वेळ गप्पा कराव्या असें वाटत होतें. माझ्या त्या मित्राकडे जावे असें मनांत आले व मी गेलों. मी गेलों तेव्हां ती मंडळी जेवायला बसली होती. भोजनोत्तर आम्ही सारीं दिवाणखान्यांत गेलों. आई व मुलगी दोघी जणी संगीतानें माझें मन रमवूं लागल्या. आई पियानो वाजवीत होती व मुलगी गात होती. तो पियानो जुना झाला होता. विवाहापूर्वी त्या मातेनें तो पियानो वाजवलेला होता--इतका तो जुना होता. त्या कुटुंबाचीं भरती ओहोटी सर्व बदलणारी स्थिति पियानोनें पाहिली होती, व त्याला संगीत-मय केलें होतें. त्याचे हंस्तीदंती सुर सैल झाले होते. व त्यांचा वाजवतांना

खुळखुळ आवाज होत होता. परंतु गतकाळचें संगीत, भुतकाळाचें काव्य या प्रामाणिक सेवकाकडून गायलें जात होतें. भूतकाळांतील आपत्तीत हा सुखावणारा रिझवणारा सखा होता. उपासातापासांस मित्र होता; कर्तव्य, प्रेम, श्रद्धा व सद्‌गुण यांत गेलेलें जें जीवन--त्या जीवनाला तोही उच्चारून दाखवीत होता, त्या जीवनाचा प्रतिध्वनि तोही करीत होता. मी या विचारानेंच गहिंवरून गेलों. माझें हृदय किती भरून आले होतें तें शब्दांत सांगतां येणार नाहीं. डिकन्सच्या एखाद्या कादंबरींतील देखाव्याप्रमाणें तें होतें. सहानुभूतीचा पूर हृदयांत लोटला होता, अनुकंपा ओथंबून आली होती; या अनुकंपेंत अहंकार किंवा खिन्नता यांचा गंधही नव्हता.

२५ वर्षें! २५ वर्षें हा पियानो सेवा देत आहे--सुखवीत आहे. हृदय हलकें करीत आहे. मला तर हें स्वप्नच जणुं वाटलें. निघून गेलेल्या कितीतरी वैभवाचा हा निर्जीव पियानो साक्षीदार आहे. आपण जें भूतकाळांत जगलों--तो भूतकाळ, तें गतजीवन किती विचित्र वस्तु आहे! त्या गतजीवनापासून आपण दूर आहोंत असेंही वाटतें—तर तो भूतकाळ अगदीं जवळ आहे--हजर आहे असेंहि अनुभवास येतें! आपण जागे आहोंत का झोंपलेले आहोंत हेंच अशा वेळीं आपणांस समजत नाहीं. काळ म्हणजे आपल्या आठवणींतील अंतर. परंतु स्मृतींतील हें अंतर कमी होतांच काळही अदृश्य होऊं लागतो. मग एखाद्या वृद्धाला त्याचे सारें जीवन एका घटकेचें—तासाचेंच वाटेल—त्याच्याहून कमी वाटेल. काळ याप्रमाणें आपणांस एका क्षणासारखा वाटूं लागतांच आपण चिरंतनाच्या प्रदेशांत—शाश्वताच्या प्रदेशांत शिरलों असें समजावें. आज सायंकाळीं पुन्हां नव्यानें व जोरानें, अपुर्व उत्कटतेनें हा विचार मनांत आला.

× × ×

१६६

सर्व गांवभर धुक्याचा अंधुक पडदा पसरला आहे. सर्व कांहीं मंद व अंधुक दिसत आहे. दूर कांहींतरी आनंदासाठीं, समारंभाप्रीत्यर्थ घंटा वाजत आहेत; याशिवाय बाकी सारें शांत व मूक आहे. विस्तवाचा फक्त आवाज जसा खोलींतून येत आहे– बाकी या घरांत शांतता आहे. या लहानशा बेताच्या घरांत माझा एकांताचा दुसरें कोणीही भंग करायला नाहीं. माझें विचार व माझें काम यांचा आधार– यांना निवाऱ्याची जागा म्हणजे हें घर. माझ्या वयाची चाळीशी उलटून गेली आहे. मी आतां पोक्त झालों आहे. तारुण्यांतील विद्यार्थीदशा अजून माझी आहे, फक्त तारुण्य मात्र निघून गेलें आहे. माझें विद्यार्थ्याचें हें पोक्त जीवन या घरांत मी घालवतो. भटक्या मुशाफराला लागलेल्या संवयी त्या संवयीप्रमाणें हा आजचा प्रोफेसर— हा कर्मशून्य केवळ विचारांत रमणारा प्रोफेसर या घरांत दररोज वागत असतो.

बहुतः असें हें जीवन रिकामें वाटतें; रुक्ष व पोकळ वाटतें. अर्थहीन वाटतें. परंतु मग इतकें आकर्षक व मोहक तें मला कां वाटावें ? स्वतंत्रतेमुळें. या माझ्या घरांत सुखसोयी नसल्या, इतर आराम व विलास साधनें नसलीं म्हणून काय झालें ? मला त्यांच्याशी काय काम आहे ? सुखसाधनांच्या बाबतींत मी उदासीन आहे त्यांची स्पृहा मला नाहीं. मला या घरांत प्रकाश, शांती व निवारा मिळतो. माझ्या एका बहिणीच्या शेजारीच मी आहे. तिचीं मुलें आहेत व मला तीं फार आवडतात. आणखी काय पाहिजे. जेवढें मिळायला हवें तेवढें बाह्य सुख मिळालें. एवढ्यांत मला समाधान आहे. एवढें सुख अविवाहिताला पुरें झालें.

शिवाय मी मला जडलेल्या संवयींचाच बनलेला नाहीं कां ? त्या संवयींचाच मी गुलाम नाहीं का ? मला ज्या सुखांचा व उपभोगांचा अनुभव नाहीं, त्यांवर प्रेम करण्यापेक्षां, त्यांवर आसक्त होण्यापेक्षां-- माझी कर्मशून्यता व विचाररमतांच मला अधिक प्रिय वाटतें. मी एकूण सुखी

आहे तर, आणि स्वतंत्र आहे. मी एकूण दुःखी नाहीं यावरून ?—येथें एकंदरींत बरें चाललें आहे, व कुरकुरीला कांहीं जागा नाहीं एकंदरींत. परंतु तसेंही नाहीं. आहे म्हणावें तर नाहीं· नाहीं म्हणावें तर आहे. हें हृदय कांहीं सुखी नाहीं. निराशेचे सुसकारे तें सोडीत आहे. कांहींतरी आणखी त्याला पाहिजे आहे; कांहींतरी याहून अधिक चांगलें व सुरेख त्याला पाहिजे आहे. परंतु हृदयाची भूक कधींच शमवावयाची नाहीं; किती खाल्लें तरी अतृप्तच राहणाऱ्या अधाशाप्रमाणें, खादाडाप्रमाणें हें हृदय आहे... आणि बाकी खरें म्हटलें तर कसली तरी असोशी, उत्कंठा कुणाला नसते ? प्रत्येकाच्या हृदयाला आणखी कांहींतरी पाहिजेच असतें. सर्वांच्याच हृदयाची भूक अतृप्त असते. मर्त्यजीवनाचा हा स्वभावच आहे--हा धर्मच आहे स्वतःला संतृप्त करण्यासाठीं, कांहीं लोक दुःख संतापांतून जातात परंतु यश कोणालाच मिळत नाहीं. समाधान, संतोष व तृप्ति या ऐहिक जीवनांत नाहींत; कोणी त्या बहुधा मिळवूं शकत नाहीं. त्यासाठीं कोणी प्रयत्न करो वा न करो; धडपड करो वा न करो. प्रयत्न केला तर परिणाम काय होणार हें कांहींना आधींच दिसतें व ते उगीच धडपड करण्याचें सोडून देतात व वेळींच या निष्फळ आदळ आपटीपासून दूर राहतात. व आहे त्यांतच समाधान मानतात. ज्याअर्थीं सुखी आपण होऊंच शकणार नाहीं, तें शक्यच जर नाहीं, तर मग कां त्रास घ्या, कां एवढी उरस्फोड करा ? जें अत्यंत आवश्यक आहे, तेवढ्यापुरतीच इच्छा ठेवावी— आपल्या सुखसाधनांची सीमा इतकीच कीं अत्यंत आवश्यक आहे तें असावें. फाजील परिग्रह नसावा. संयमानें, नियमित वैराग्य वृत्तीनें राहावें; थोडक्यांत स्वतः समाधान मानावें. सदसद्विवेक बुद्धीचें समाधान, केलेल्या कर्तव्याची जाणीव याशिवाय कशालाही महत्त्व देऊं नये.

परंतु हीसुद्धां कांहीं लहानसहान महत्त्वाकांक्षा नाहीं हेंहि खरें आहे. ही इच्छासुद्धां दुसऱ्या अशक्यतेच्या प्रांतांत आपणांस घेऊन जाते— तें कांहीं नाहीं-- सर्वस्वी व संपूर्णपणें ईश्वराला शरण जाणें, तो ठेवील तसें राहणें, नाचविल तसें नाचणें--हाच सर्वांत सरळ व साधा मार्ग आहे.

बाकी इतर सर्व संत म्हणतात त्याप्रमाणें भूस व कोंडा आहे; तें उगीच आत्म्याला शिणवणें आहे.

ही गोष्ट आज कितीतरी दिवस मला स्वच्छ दिसत आहे. ही एक प्रकारची धार्मिक विनम्र संन्यस्तता-कितीतरी दिवस मला गोड वाटत आहे, मधुर वाटत आहे व तिचा व माझा बराच परिचयही आता झाला आहे. परंतु जो शहाणपणा आपण मिळविलेला असतो, ज्या गोष्टी आपलीं जीवनसूत्रें म्हणून आपण निश्चित करतों, त्यांपासून- ह्या बाह्यजीवनांतील उपाधि आपणांस दूर नेतात, आजुबाजूस शेंकडों गोष्टी असतात कीं ज्या आपणांस बाहेर खेंचतात. या जगांतील निरनिराळ्या लोकांची उदाहरणें एकंदर परिस्थितीचा व चालू काळाचा होणारा अप्रतिहत परिणाम यामुळें आपण जें ठरवलेलें असतें, मिळवलेलें असतें तें गमावून बसतों. आणि मग हें जीवन कंटाळवाणें वाटूं लागतें-ओझें वाटूं लागतें. पुन्हां पुन्हां नवीन आरंभ, कांहीं थोडें मिळवायचें व लगेच तें गमवायचें व पुन्हां आरंभ करावयाचा यानें कंटाळा येतो. ओनामा-यापुढें प्रगतिच होत नाहीं हें पाहून अगदीं वीट येतो. जीवनाची शिसारी व ओकारी येते. अनुभवाचें फळ मिळतांच झोंपी जाणें हें किती बरें; ईश्वराच्या इच्छेजवळचा आपला विरोध संपतांच आपलें जीवनही संपावें; स्वार्थापासून-क्षुद्र अहंकारापासून जेव्हां आपण मुक्त होतों, आपण सर्व मानवजातीशीं जेव्हां प्रेममय वृत्तीचें असतों-कोणाबद्दल मनांत ना द्वेष ना मत्सर, ना विरोध, ना स्पर्धा-त्यावेळेस हे डोळे मिटलें तर किती चांगलें होईल. परंतु हे न होतां, पुन्हां पुन्हां मोहाची आवजाव सुरूं होते, पुन्हा शंका संशय, चर्चा, दुबळेपणा, ग्लानि, विस्मृति यांना तोंड द्यावें लागतें-आणि मग सर्व काव्य जीवनांतलें नाहींसें होतें-संगीत जाऊन केवळ नीरस गद्य मग राहतें; इतरांप्रमाणें आपण पुन्हा होतों-प्रवाहपतित होतों, चाकोरींत रुळून जातों, असभ्य व अडाण्याप्रमाणें वागूं लागतों. पशुजीवन पुन्हां सुरू होतें. हें एकंदर दृश्य-हा अनुभव किती उद्वेगजनक व उदासवाणा आहे!

कवि आपल्या नायकांना या झगड्यांतून शहाणपणानें लौकरच मुक्त करीत असतात; विजय मिळाल्यावरही पुन्हां त्यांना निष्फळ व व्यर्थ जीव-

नाच्या चिखलांत ढकलून ते ओढीत नाहींत हें बरें. जुनी म्हण म्हणते "देवाचे आवडते लौकर मरतात."

परंतु ही जी वरून होणारी कृपा—आपले डोळे लौकर—त्या विजयाच्या वेळेसच मिटावे अशी ईश्वराची कृपा व्हावी असें जें मला वाटतें—त्यांत स्वार्थाचा वास आहे; आत्मप्रीति—अहंता यांचा वास आहे. माझी इच्छा अशी असेल, परंतु देवाची इच्छा म्हणजे माझी इच्छा नाहीं. माझीं इच्छा मी देवावर लादणें म्हणजे देवाहून मी मोठा झालों. ईश्वराला आपणांस पक्कें करावयाचें आहे, आपणांला पुनःपुन्हां तेंच करायला लावायच आहे, हलवून हलवून खुंटा त्याला बळकट रोवायचा आहे. आपणांस हतगर्व व बिनम्र त्याला करावयाचें आहे--निरहंकार बनवावयाचें आहे; शेवटपर्यंत तो परीक्षा घेत राहणार. शेवटपर्यंत आपला छळ होणार, आपण भट्टींत घातले जाणार. आपल्या सद्‌गुणाची खरी कसोटी सहनशीलता व धिमेपणा--अशा ही आहे. सर्व स्वप्नें, सर्व आकर्षकता दूर गेली असली, सर्व आशा मरून गेली असली, तरी जीवनाला कंटाळूं नको; त्याचा स्वीकार कर; सहन कर सारें; शांतीवर जीवाच्या उड्या असतां, मनांतून शांति पाहिजे असतां, अशा प्रमाणें झगडत राहण्याची स्थिती--ती पतकर. धिमेपणाने, धैर्यानें सर्व सहन करीत जगांत राहा. या जगांत रहाणें म्हणजे क्षुद्र वस्तूंच्या संगतींत रहाणें आहे असें वाटलें तरी रहा. या जगाला विटलास तरी जग दुष्ट विचारांच्या झोंबाझोंबीचे जग हे एक रंगण आहे असें अनुभवाला आलें तरी हरकत नाहीं. ठहेर जाव, भागो मत, खोट्या ध्येयांची उपासना करणाऱ्यांची संगत न सोडतां, तुझ्या देवतांहून अन्य धनमानादि दैवतांची उपासना करणाऱ्यांचीही संगति न सोडतां -त्यांच्यामध्येंच स्वतःची देव देवतार्चे तूं करीत रहा. स्वतःच्या श्रद्धेला एकनिष्ठपणें चिकटून रहा. या मानवी दवाखान्यांतून पळून जाण्याला, लौकर सुटून जाण्याचा प्रयत्न करूं नको. उकिरड्यावर जॉब ज्याप्रमाणें चिरकष्ट सहन करीत सोशीकपणें राहिला तसा तूंही या नरकांत, या तप्ततेलांत शांत रहा. याला कर्तव्य म्हणतात--हें कर्तव्य उचल. आशा म्हणून जीवनाला अर्थ ठरला नसला तरी कर्तव्य

म्हणून जीवन उरतेंच; नियतकर्म म्हणून त्याला अर्थ राहतोंच; जीवनाचें खरें नांव कसोटी--सत्त्वपरीक्षा हेंच आहे.

× × ×

१६७

बर्फ वितळत आहे व थंडगार धुकें सर्वत्र पसरलें आहे. ज्या देशांत धुकें फार पडतें त्या नॉर्वे वगैरे देशांची मला आठवण येत आहे व त्याच देशांत जणुं मी गेलों आहे. असें वाटत आहे आपल्या हातानें क्षितिजाला स्पर्श करतां येईल असें वाटत आहे. दूरवर दिसणारा अफाट विस्तृत प्रदेश दाट धूसर पांघुरणांत आच्छादला गेला आहे.

धुक्यांतही एक विशिष्ट काव्य आहे. एक प्रकारचें सौंदर्य, स्वप्नमय माधुरी व मोहकता त्यांत असते. रात्रींच्या वेळीं दीप जें काम करतों तेंच दिवसा धुकें करतें, मनाला एकाग्रतेनें ध्यानाकडे तें वळवतें; मनाला अन्त-र्मुख तें करतें. सूर्य हा सृष्टींत आपणांस विखरतो, इकडे तिकडे फेंकतों, नाचवतों हिंडवतो, परंतु धुकें आपणांस एकत्र आणतें- आपल्या मनोवृत्तींना एकत्र आणतें--एकाग्र करतें. हें धुकें आनंद देणारें--हृदयाला उत्साह देणारें आकपट व साधें, भावनांनी ओतप्रोत भरलेलें आहे असें वाटतें. त्याला आडंबर माहीत नाहीं. सूर्यामध्यें जें काव्य आहे-तें महाकाव्य आहे--नव-रसात्मक काव्य आहे. परंतु धुकें व दहिंवर यांत शोकगीत आहे, धार्मिक भक्तिमय काव्य आहे. सर्वत्र ईश्वर आहे- हें तत्त्वज्ञान प्रकाशांतून जन्माला येतें. प्रकाशबालक आहे तें. परंतु धुकें जवळ असणाऱ्या परित्रात्यांत श्रद्धा निर्माण करतें. ज्या वेळेस विशाल विश्व, अफाट दुनिया आपणांस बंद असते, आपण तिच्यापासून अलग केलेले असतों, तेव्हां घर म्हणजेच लहानसें विश्व होतें. नेहमीं धुक्यांनीं परिवेष्ठित असल्यामुळें, आच्छादित असल्यामुळें माणसें एकमेकांवर अधिक प्रेम करतात, अधिक चाहतात. कारण आपलें कुटुंब हीच एक सत्य गोष्ट त्यावेळेला दिसतें, आणि कुटुंबांतही हृदय ही

पुन्हां मुख्य गोष्ट असते. आणि नीतिशास्त्रज्ञ म्हणतात कीं अत्यंत थोर व महान् विचार हें हृदयांतून बाहेर येतात-प्रकट होतात.

× × ×

१६८

मिस् मुलॉक हिची "जॉन हॅलिफॅक्स" ( Gentlemen ) ही कादंबरी वाचली. दिसतें त्याहून जोरदार व धाडसी पुस्तक हें आहे. समानतेचा जो सामाजिक प्रश्न त्यावर इंग्रज विचारसरणी प्रमाणें व पद्धतीप्रमाणें तिनें हल्ला चढविला आहे. तिचें उत्तर असें कीं, प्रत्येकाला सभ्य मनुष्य, संस्कृत मनुष्य होतां येईल--मग तो कोठें गटारांत उकिरड्यावर का जन्मलेला असेना; सुवृत्तता ही सर्वसाध्य आहे. ती जन्मावर अवलंबून नाहीं. या कादंबरींत काल्पनिक उच्च नीचता, केवळ परंपरेनें व रूढीनें मानलेलें श्रेष्ठ कनिष्ठत्व यावर टीका केलेली आहे, त्याविरुद्ध बंड केलेलें आहे; खरा मोठेपणा चारित्र्यांत, वैयक्तिक गुणांत, निर्दोष नीतींत, भावनांच्या उदात्ततेंत, सुसंस्कृत वाणींत, जीवनाच्या गभीरतेंत, स्वाभिमानांत आहे असें दाखवलें आहे. समानतेच्या राक्षसी व पाशवी वेडाऐवजीं ही दृष्टी चांगली आहे; प्रत्येकाला खालीं ओढण्याऐवजीं प्रत्येकाला वर चढण्याचा हक्क आहे. चढूं दिलें पाहिजे असें ग्रंथकर्त्री सरळपणें सांगत आहेत. एखादा मनुष्य श्रीमंत कुळांत जन्मला असेल, सत्कुलांत जन्मला असेल. परंतु एवढ्यानें तो सभ्य झाला असें नाहीं, सुजन झाला असें नाहीं.

सुजन म्हणजे काय? सभ्य पुरुष म्हणजे काय? जो स्वतंत्र असतो, परिस्थितीपेक्षां बलवान् असतो, परिणामांहून श्रेष्ठ असतो, सर्व ऐहिक संपत्ति व भाग्य यापेक्षां व्यक्तित्वाला जो श्रेष्ठ मानतो, मानसन्मान, पदवी, दर्जा यांना मान न देतां, महत्त्वच न देतां, व्यक्तींत काय आहे याला जो महत्त्व देतो, हेंच महत्त्वाचें, सत्य व खऱ्या किंमतीचें आहे असें जो मानतो-तो सभ्यपुरुष-तुम्ही काय आहांत तें सांगा म्हणजे मी तुमची योग्यता सांगतों.

" ईश्वर हा माझा हक्क " हें त्याचें ब्रीदवाक्य असतें. इंग्लंडमध्यें या एका ध्येयाबरोबरच दुसरेंही एक ध्येय आहे-तें संपत्तीचें ध्येय. या ध्येयाचें ब्रीद-वाक्य त्याच्याजवळ पैसे किती आहेत हें असतें. ज्या देशांत दरिद्री राहणें हा जणुं गुन्हा मानला जातो, त्या देशांत नबाब सज्जन व सभ्य असलाच पाहिजे असें कोणी बहुधा मानीत नाहीं. इंग्लंडमध्यें अशीं दोन ध्येयें आहेत. एक व्यापारी ध्येय व दुसरें सद्गुणाचें ध्येय. एक इंग्रज ध्येय समाजांत घाण निर्माण करतें तर दुसरें तेथें प्रकाश आणतें. एक ध्येय पाशवी वृत्तीकडे राष्ट्राला नेतें, दुसरें त्याला सत्याकडे खेंचतें.

खरा सभ्य तो–जो स्वतःचा स्वामी आहे; स्वाभिमानी आहे, आणि दुसऱ्यांनाहि स्वतःला मान द्यावयास लावतो–स्वतःचा अपमान करूं देत नाहीं. सभ्यतेचें मुख्य चिन्ह म्हणजे आत्मसंयम, आत्मप्रभुत्व. जो स्वतःला ताब्यांत ठेवतो, स्वतःचें नियमन करतो, स्वतःचें शासन करतो; तो सभ्य होय. रोमन लोकांचेंही ध्येय असेंच होतें. हें ध्येय बौद्धिक कमी आहे व नैतिक अधिक आहे. हें ध्येय इंग्लंडला विशेषेंकरून योग्य आहे; कारण इंग्लंड हें कर्मप्रधान राष्ट्र आहे, इच्छाशक्तीचें राष्ट्र आहे, निश्चयी राष्ट्र आहे. स्वाभिमानापासून शेंकडों गोष्टी उत्पन्न होतात. स्वाभिमानाबरोबर शेंकडों गोष्टी—आनुशंगिक येतातच. स्वतःच्या शरीराची नीट काळजी घेणें, तें स्वच्छ ठेवणें, नीट भाषा वापरणें, चालरीत नीट ठेवणें; मनावर व शरीरावर नीट ताबा ठेवणें, पहारा ठेवणें; स्वयंपूर्ण व स्वाश्रयी असण्याची कोशीस करणें, स्वतःच्या वृत्ति व भावना यांवर संयम ठेवणें, त्यांना लगाम घालून ठेवणें; दुसऱ्यांचें कधीं मिंधे न होण्याची निःस्पृह वृत्ति; आपल्याला नाक घांसायची पाळी येऊं नये, मान खालीं घालण्याची पाळी येऊं नये म्हणून दक्षता, कोणत्याही प्रकारच्या लहरीला वश न होणें; स्वतःचा मान व स्वाभिमान नेहमीं सांभाळणें. अशा शेंकडों गोष्टी स्वाभिमान या शद्बाबरो-बर येतात. अशा प्रकारचें आत्मप्रभुत्व--जो कुलज आहे, ज्याला लहान-पणापासून नीट वाढवण्यांत आलें आहे, जो श्रीमंत व सुखी घराण्यांत जन्मलेला आहे, त्याला अंगीं आणणें नैसर्गिक रीत्याच सुकर होत असे

यामुळें पुढें असेंच मानलें जाऊं लागलें. जो श्रीमंत आहे, कुलवान् आहे, धनकनसंपन्न आहे--तो सभ्य व सुसंस्कृत असलाच पाहिजे.

कोणीही आपणांत दोष पाहूं नये, कोणालाही आपणांत दोष दिसूं नये, आपलें उणें काढतां येऊं नये, म्हणून सभ्य पुरुष निर्दोष रहावयाचा प्रयत्न करील. स्वतःला लोकांनीं जरा सन्मानानें वागवावें, म्हणून तो वाटेल त्याच्यांत मिसळणार नाहीं; अलिप्त असा राहील; कोणाला किती मान द्यावा हें तो नीट ठरवील. वय, दर्जा, स्थान यांप्रमाणें तो मान देईल, परंपरागत शिष्टाचार पाळील. म्हणून तो तिऱ्हाइताच्या बाबतींत शांतपणें सावध व दक्ष राहील. ज्या तिऱ्हाइताचें नांवगांव माहीत नाहीं--त्याला आपल्याकडून कदाचित् फाजील मान किंवा कमी मान दाखवला जाईल असें मनांत येऊन तो फार जपतो; होतांहोईतों तो अशा तिऱ्हाइताला टाळतो. तिकडे विशेष लक्ष देत नाहीं. तिऱ्हाइत येऊं लागतांच तो दूर जातो; जर तिऱ्हाइत कांहीं बोलूं लागला तर त्याला हो ना अशींच त्रोटक उत्तरें तो देतो. सभ्य पुरुषाची सभ्यता ही सर्वमान्य नसते, तिच्यांत समभाव व माणुसकी नसते; तर ती व्यक्तिविषयक जसे लोक असतील त्या प्रमाणांत ती असते. प्रत्येक इंग्रज गृहस्थांत दोन भिन्न भिन्न पुरुष असतात; एक व्यावहारिक पुरुष व एक अन्तर्मुख आंतील पुरुष. एक दिवाणखान्यांतील व एक अन्तर्गृहांतील हा बाहेरचा--पुरुष हा बाहेरचा इंग्रज कठोर असतो--किल्ल्याच्या बाहेरच्या फत्तरांसारखा भावनाहीन, शुष्क, कोरडा असतो; आणि जो आंतील इंग्रज असतो तो प्रेमळ, उदार, दिलदार, समजुतदार, सूज्ञ व गोड असतो. ज्या देशांतील नैतिक वातावरणांत थंडगारपणा असतो, अशा देशांतच असे नमुने सांपडतात, आढळतात. बाहेरचें जग बेफिकीर असतें--परंतु अन्तःपुर मात्र प्रेमळ सुस्वागत करणारें—उदार व दिलदार असतें. फळावरून ज्याप्रमाणें झाडाची परीक्षा होते, त्याप्रमाणें त्या त्या राष्ट्रांतील सभ्य पुरुषाच्या लक्षणांच्या पृथक्करणानें त्या त्या राष्ट्राचें स्वरूप, स्वभाव व इतिहास कळून येतो.

× × ×

१६९

तत्त्वज्ञान म्हणजे समजून घेण्याची कला असा जर अर्थ असेल तर खरोखर वस्तुस्थिति काय आहे, प्रत्यक्ष वस्तु काय काय आहेत त्या सर्वांशीं तत्त्वज्ञानाचा नीट परिचय पाहिजे. जी वस्तु समजून घ्यावयाची तिच्याशीं एकरूप झाले पाहिजे; घाई करून एखाद्या वस्तूसंबंधीं विचार करून घेण्यांत तत्त्वज्ञानाचें मरण आहे; ज्या वेळेस शरीर वाढवायचें त्यावेळेस जर उपवास करीत बसलें तर शरीराचा नाश होईल; तसेंच हें आहे. आणि शिवाय जें आपणांस आधींच आहे तेंच आपण समजूं शकतो. समजणें याचा अर्थ जी वस्तु किंवा जी गोष्ट समजली ती आपलीशी करणें, स्वतःची करणें, प्रथम सहानुभूतीनें व नंतर विचारपूर्वक बुद्धिपुरस्सर ती आपलीशीं करणें, म्हणून ज्या वस्तूची कल्पना करून घ्यावयाची आहे, जिचा विचार करावयाचा आहे. त्या वस्तूचें आधींच पृथक्करण करूं नये, तिचे तुकडे तुकडे -शवच्छेदन करूं नये. प्रथम त्या वस्तूसारख्या दुसऱ्या एखाद्या वस्तूला पाहून आरंभ करावा; नंतर त्या वस्तूचें जतन कसें झालें आहे, ती कशी बसली आहे तें पहावें, आणि शेवटीं मग त्या वस्तूचे निरनिराळे भाग व अवयव यांचें परीक्षण करावें. कोणत्याही वस्तूचा अभ्यास करावयाचा असो; घड्याळ असो, झाड असो; कलेचा नमुना असो, चारित्र्य व स्वभाव असो जें जाणण्याचीं उत्सुकता आहे, इच्छा आहे त्या वस्तूचा अभ्यास केला पाहिजे, त्या वस्तूसंबंधीं पूज्य बुद्धि दाखविली पाहिजे; त्या वस्तूचा चुगडा करण्यानें, तिला कुसकरल्यानें तिचें ज्ञान होणार नाहीं. वस्तूशीं एकरूप झालें पाहिजे. कलानें घेतलें पाहिजे, एक प्रकारें त्यांचें ज्ञान करून घेण्यासाठीं त्यांना शरण गेलें पाहिजे. त्या वस्तूंचा प्रभाव समजून घेण्यासाठीं आपण आपलें मन नम्रपणें त्या वस्तूसमोर उघडें करून ठेवलें पाहिजे; त्या वस्तूच्या स्वरूपाशीं त्या वस्तूच्या विशेष स्वरूपाशीं, एकरूप झालें पाहिजे. त्या वस्तूंचें डिसेक्शन करून त्या वस्तूवर जोर करण्यापूर्वी--तिच्याशीं मिळून गेलें पाहिजे.

× × ×

१७०

आजचा काळ व्यक्तिवादाचा आहे. प्रत्येकानें स्वतःचें पहावें--देव सर्वांचें पाहिल असें आजचें आचारसूत्र आहे. मी फक्त माझ्या पुरता, ईश्वर मात्र सर्वांसाठीं ही आजची आचार नीति आहे. अजून सारे आपण एक आहोंत, समान हृदय अजून आपलें आहे--ही गोष्ट जेव्हां कांहीं सामुदायिक फंड वगैरे उभारण्याची चळवळ होते--तेव्हां जरा दिसून येते. एरव्ही त्याचे अस्तित्वहि दिसले नसते; अर्वाचीन माणसाच्या प्रेमाची वृत्ति निराळे व अलग राहण्याची जी आहे तिला थोडासा आळा सार्वजनिक फंड वगैरे चळवळींनीं पडतो व या चळवळी अजून ऐक्य आहे असें दर्शवतात. अजूनहि एका सूत्रांत आपण बांधलेले आहोंत असें दाखवितात--आपले हितसंबंध एकत्रित निगडित आहेत हें दिसून येते. पूर्वीच्या काळांत जबरदस्तीनें लादलेले करही देशभक्तीमुळें आपण सहन करीत असूं त्याप्रमाणेंच आजही सामुदायिक सहानुभूति हे फंड आपल्यावर लादते असें वाटतें व आपण तें सहन करतो, व फंडास हातभार लावतो. एकटे राहूं म्हटलेंत तरी आज एकटे राहतां येणार नाहीं. सर्व जगाच्या व्यवहाराशी आज आपण बांधले गेलो आहोंत व तडजोडीनें वागणें प्राप्त आहे असें मनांत वाटल्याशिवाय रहात नाहीं. आपली इच्छा असो वा नसो जें भयंकर यंत्र चालले आहे, हा जगाचा गाडा, हा जगद्रथ जो धडधडां चालला आहे. त्यामुळें समाज अस्वस्थ व फिकीरींत राहतो. त्याच्या गतीकडे तुम्हाला जर चिरडून जावयाचें नसेल त्याच्याखलीं, तर लक्ष ठेवलेंच पाहिजे. पतीवर सारा कारभार चालला आहे. कोणाचें कधीं दिवाळें निघेल याचा संभव नाहीं; समाजाच्या शांतीचा पाया कृत्रिम आहे व तो सुरक्षित राहण्यासाठीं सारखा थरथरत असतो--भीत असतो. केव्हां जगांत कुठे काय होईल आणि सर्व गाडा गडगडेल याचा नेम नाहीं. आपण ज्वालामुखी पर्वताच्या माथ्यावर नाचत कुदत आहोत हें समाज कधीं कधीं विसरेल, परंतु युद्ध सुरूं होणार अशी अस्पष्ट व अंधुकहि गप्प उठतांच, अशी बाजार बातमी उठतांच आपण कोठे उभे आहोंत याची जाणीव याचे भान अगदीं स्पष्टपणें समाजास होते. परयांचे बांधलेले बंगले श्वासानेही पडतात.

जे गरीब लहानसहान भांडवलवाले असतात, छोटे व्यापारी असतात. त्यांनाहि निरंतरची चिंता असह्य होते. त्यांना धनाढ्य व कोट्याधीश होण्याची इच्छा नसतें. शांतपणें आमचें काम आम्हांला करूं दे एवढेंच त्यांचे म्हणणें असते. परंतु हे निष्ठुर जग म्हणते--" नाहीं, शांति, शांति, शांति ही वस्तु येथें नाहीं; तुमची इच्छा असो वा नसो; माझ्याबरोबर तुम्हांलाहि कष्ट सहन केले पाहिजेत, थरथरां कापलें पाहिजे. " मानव जात जशी आहे, तशी मुकाट्यानें स्वीकारणें, ज्याप्रमाणें निसर्गाशी आपण जुळवून घेतो, त्याच्या लहरींपुढें नमतें घेतो, त्याप्रमाणेंच दुसऱ्यांच्या इच्छेपुढें नमतें घेणें व जें जें होईल तें मुकाट्यानें सोसणें ही गोष्ट कठीण आहे. ईश्वरी सत्तेसमोर आपण वांकतो; परंतु सुलतानाविरुद्ध बंड करतो. ज्या गलबतावर आपणांस बळजबरीनें बसवण्यांत आले आहे. जें आपल्या मनांच्या व इच्छेच्या विरुद्ध दिशेने--प्रतिकूल दिशेनें हांकारलें जात आहे, नेले जात आहे, तें गलबत जर फुटलें तर आपणांस किती वाईट वाटेल! अशा गलबतांत बसून समुद्रांत बुडून जाऊं नये असें आपणांस वाटत असतें--परंतु शक्य कोठें आहे? तुम्हांला त्याच गलबतावर चढलें पाहिजे व सुखाचा व दुःखाचा अनुकूल वा प्रतिकूल वारा सहन केला पाहिजे; समुद्राचा तळ किंवा सुरक्षितता बंदराचा किनारा जें मिळेल तें घेतलें पाहिजे. जीवनांत नेहमीं हें असेंच चाललें आहे. कांहीं थोड्या लोकांच्या चुकांसाठीं आपणां साऱ्यांस भूर्दंड भरावा लागतो, प्रायश्चित्त घ्यावें लागतें.

वैयक्तिक जबाबदारीपेक्षां, व्यक्तिविषयक स्वातंत्र्यापेक्षांहि आज मानवजातीचें ऐक्य अधिक स्पष्टपणें व निश्चितपणें दिसून येत आहे. आपलें व्यक्तिविषयक स्वातंत्र्य या जगदैक्यावर अवलंबून आहे. आपण स्वतंत्र असलों तरी परतंत्र आहोंत. आपण इच्छा व इच्छाशक्ति यांत फारतर स्वतंत्र असतों; परंतु आरोग्यावर, निसर्गावर, समाजावर आपण अवलंबून असतों. आपलें स्वातंत्र्य शेवटीं एका गोष्टींतच फक्त राहातें, एका बाबतींतच उरतें. यां सर्व जुलूम करणाऱ्या व दुष्ट शक्तींशीं झुंजणें त्यांचा प्रतिकार करणें ह्यांतच फक्त मग स्वातंत्र्य राहतें; आपण या सर्व जुलूमजबरदस्तीला सांगूं " ये, चिरड मला; परंतु मला मारलेंस तरी माझी

मान वांकणार नाहीं, तुझ्या करण्याला माझी संमति मी देणार नाहीं, होस हो देणारा होयबा व खुशामता मी होणार नाहीं." आपल्या दृढनिश्चय-शक्तीनें यां कायदेशीर प्रस्थापित होऊं पाहणाऱ्या परिस्थितीला आपण विरोध करण्यास उठूं, बंड करूं, तिला शरण जाण्याचें व तिच्या आज्ञा मानण्याचें नाकारूं. यांतच आपलें नैतिक स्वातंत्र्य आहे. याशिवाय बाकी सर्व बाबतींत आपण जगाचें असतों-जगाच्या ताब्यांत असतों, आपलें शरीर आपली सारी इस्टेट-आपला सर्व जमीन-जुमला, मालमत्ता जगाच्या लहरीवरच अवलंबून राहणार. वारा धुळीच्या कणांचें जसें वाटेल तें करतो त्याप्रमाणें जगाचीं आपण खेळणीं आहोंत; वाळलेलें पान पुरांत ज्याप्रमाणें वाटेल तिकडे खेचलें जातें, तसें या जग प्रवाहांत, या जगाच्या झंझावातांत आपलें होतें. ईश्वर आपणांस तुच्छ लेखीत नाहीं, परंतु दुनिया आपणांस तुच्छतेनें व क्षुद्रतेनें स्वतःच्या निर्दय लाटांत गिळंकृत करून टाकतें. तूं माझें एक खेळणें आहेस, मी तुला वाटेल तसें नाचवीन असें दुनिया आपणांस पदोपदीं सक्रिय सांगत असते व आपणांस तो अनुभव येत असतो.

व्यक्ति म्हणजे कांहीं नाहीं, किंवा सर्व ईश्वराचेंच रूप आहे, किंवा जगांत असें चालावयाचेंच आहे-हें जगच फक्त सत्य आहे-वगैरे सर्व तत्त्वज्ञानें आतां महत्त्वाचीं नाहींत. उघड्या दरवाजाला उघडूं पाहणें, मारलेल्यास मारणें तशा प्रकारची त्यांची स्थिति आहे. अदृश्य असा सद्सद्विवेक बुद्धीचा जो एक मुद्दा--त्याला महत्त्व देण्याचें ज्या क्षणीं आपण बंद करूं, तिला पै किंमतीची लेखूं, कोपऱ्यांत बसवूं, क्षणीं व्यक्ति म्हणजे ग्रहगोलांतील एक अणु होऊन जाते; जो अणु या विश्वांत म्हणजे कांहींच नाहीं असा आहे. मग व्यक्ति म्हणजे केवळ शून्य--; स्वतःचें शून्यत्व, स्वतःची क्षुद्रता अजमावण्यास समर्थ असें शून्य विचार शेवटीं शरणागति आणून देतो, नम्र करतो-लोटांगण घालावयास लावतो. साशंकता निष्क्रियत्वाकडे नेते व निष्क्रियत्व गुलामगिरीकडे नेते. अशा परिस्थितींत आपण होऊन स्वेच्छेनें शांतपणें शरण जाणें, एक प्रकारच्या धार्मिक भावनेनें जें जें प्राप्त होईल तें स्वीकारणें ही एकच पळवाट दिसते.

यांत आपलें वैयक्तिक स्वातंत्र्यही राहतें; फक्त कर्तव्यापुढें शरण गेलों असा त्याचा अर्थ होईल. कर्तव्य हें आपलें कर्मसूत्र; कर्तव्य उत्साह देईल, स्फूर्ति देईल; या जगांत थोडेंफार तरी स्वातंत्र्य कर्तव्य केल्यानें आपणांस मिळेल; कर्तव्य कराल तरच तुमचें नांव राहील, इभ्रत राहील; तुमचा थोरपणा महत्ता कर्तव्य केल्यानेंच दिसेल. माझें कर्तव्य कोणतें हें मी ठरवणार. अमुक तुझें कर्तव्य असें जग मला सांगणार नाहीं, अमुक तुझें कर्तव्य नाहीं असेंही तें सांगणार नाहीं. कर्तव्याच्या बाबतींत माझा मी. राजा राजाशीं वागतो. त्याप्रमाणें याबाबतींत दुनिया माझ्याशीं वागेल--मी दुनियेशीं वागेन. जग माझें शरीर आपल्या जबड्यांत धरील, पंजांत पकडील, परंतु माझें मन तें पकडूं शकणार नाहीं; माझा आत्मा, सद्सद्विवेक बुद्धि जगाला तोंड देईल. जगाशीं झगडेल--जगाला झिडकारील. माझी बुद्धि आणि माझें प्रेम, माझी श्रद्धा व माझी आशा, यांना जग पकडूं शकणार नाहीं; माझें खरें जीवन, माझें खरें स्वरूप, खरा मी--अभंगच राहणार, निष्कलंकच राहणार अनभिभूतच राहणार. जगाला माझ्या खऱ्या स्वरूपावर तडाके मारतां येणार नाहींत--तें त्याला सांपडणारच नाहीं. या बाबतींत आपण विश्वाहूनही मोठें आहोंत. आणि विश्वाला वजन व आकार असेल-परंतु इच्छाशक्ति नाहीं; मानव जातीशीं संबद्ध असूनही आपण तर मग स्वतंत्र राहूं शकूं, कारण जास्तींत जास्त मानवप्राणी काय करणार तर माझें सुख दूर करणार, ज्याप्रमाणें विश्वाला, निसर्गाला फक्त माझें शरीर दूर करतां येईल. शरणागति म्हणजे पराभव नव्हे; तर उलट तें सामर्थ्य आहे.

× × ×

१७१

ख्रिश्चिॲनिटीचें सर्वांत महत्त्व धर्म या नात्यानें आहे. धर्म म्हणजे अमुक प्रकारची पद्धत असा अर्थ नसतो; धर्म म्हणजे उच्चतर आध्यात्मिक जीवन; ज्याचें मूळ अनादि व अनंत आहे- गूढ आहे परंतु ज्याचीं फळें प्रत्यक्ष अनुभवास येतात असा सुंदर जीवनतरू म्हणजे धर्म. धर्म म्हणजे

ईश्वराशीं समरस होणें, ईश्वरांत मिळून जाणें; एक प्रकारचा शांत व अथांग उत्साह- हृदयाच्या आंतील झऱ्यांतून येणारा उत्साह--म्हणजे धर्म- सर्वत्र प्रकाश पसरवणारें प्रेम, कर्मांत प्रकट होणारा जोम, अनंत व अपरिमित आनंद–म्हणजे धर्म. धर्म म्हणजे आत्म्याची एक विशिष्ट स्थिति–मनाची एक विशिष्ट स्थिति -जीवनाची एक विशिष्ट दशा. या पद्धतींना व तत्संबंधींच्या वादविवादाला महत्त्व असलेच तरी तें दुय्यम आहे; केवळ पद्धतींनीं हृदय शांत होणार नाहीं, सद्सद्विवेक बुद्धि उन्नत होणार नाहीं; म्हणून या केवळ पद्धतीसंबंधींच्या वादविवादांत-या बाह्य धार्मिक चर्चांत मला स्वारस्थ वाटत नाहीं–चर्चात्मक धर्माची जरूर नाहीं; ठराविक पद्धतींची धर्माला जरूर नाहीं. खरा धर्म म्हणजे दिव्य ईश्वरमय जीवनाची भावना–त्याची जरूर आहे. " प्रथम देवाचें राज्य शोधा. सत्य व न्याय जें आहे तें शोधा व मग बाकीचें सर्व कांहीं तुला मिळेल. " जो अत्यंत शुद्ध व पवित्र आहे–तो अत्यंत धार्मिक आहे. "सर्वांगें निर्मळ चित्त जैसें गंगाजळ' असा जो असेल तो खरा धार्मिक आहे. धर्माची खरी कसोटी हीच मानली जाईल व यानें फसला जाण्याचा कमी संभव राहील. " माझे शिष्य तूं या खुणेनें ओळख-ते परस्परांस प्रेम देतात कीं नाहीं पहा. "

× × ×

१७२

व्यक्तीची जी योग्यता व पात्रता, त्याची जी लायकी--तितक्याच लायकीचा त्याचा धर्म. आपल्या जीवनाचे स्वरूपावरून आपल्या धर्माचें स्वरूप लक्षांत येतें. या बाबतींत सामान्य लोकांची समजूत व बुद्धिमान लोकांचे विचार यांचें ऐक्य आहे—" चांगले राहा, शुद्ध राहा; सहनशील असा; मर्दाप्रमाणें वागा; श्रद्धा राखा व भक्ति ठेवा; निरहंकार असा व सर्वांवर दया व प्रेम करा; " जी पद्धत तुम्हांला हें असें सांगेल, जें धर्म-पुस्तक, जो पंथ, जो दीक्षागुरु असा उपदेश करील--त्याच्यांत दोष नाहीं.

त्याला मग नांवें ठेवतां येणार नाहीं. धर्मामुळें आपण जणुं ईश्वरांत विलीन होऊन राहतों; (आईच्या कुशींत मुलें झोंपतात त्याप्रमाणें देवाच्या कुशींत जणुं जाऊन बसणें.) परंतु धार्मिक भांडणें, तंटे व वादविवाद जे असतात--ते जगाविषयीं, संसाराविषयीं, गंध कसें लावावें व कपडा कोणता घालावा याविषयींच असतात! म्हणून खरा धर्म व हे धार्मिक वाद यांत साम्य कसलेंही नसतें.

× × ×

१७३

पूर्णता हें ध्येय आहे; ख्रिश्चन धर्म म्हणजे काय? तुम्हांला मार्गावरून जात असतां उदात्त आदर्श समोर असावा म्हणून तसा आदर्श- पूर्णतेचा आदर्श ख्रिश्चन धर्म देत आहे; स्वतःच्या चांगुलपणानें सत्त्वगरिमेनें प्रकट झालेलें--सिद्ध झालेलें दिव्यत्व दिसत आहे--म्हणजे ख्रिश्चन धर्माचें सार नाहीं का? ईश्वर सर्व मानवांत प्रकट होऊं शकतो- हें खरें ध्येय ख्रिश्चन धर्माचें नाहीं का? यांतच त्याची परिपूर्णता नाहीं का?

× × ×

१७४

माझ्या जुन्या मित्रांना माझ्याबद्दल आतां निराशा वाटूं लागली आहे. माझ्याबद्दलच्या ज्या अपेक्षा त्यांनीं केल्या होत्या त्या फोल ठरल्या. मी कांहींच करीत नाहीं असें त्यांचें मत आहे; त्यांच्या आशांना मी फसवलें असें ते म्हणतात. मीही स्वतःबद्दल निराश झालों आहे. जें मला माझा स्वाभिमान पुन्हां प्राप्त करून देईल, स्वतःचा अभिमान वाटण्याचा हक्क ज्यामुळें मला मिळेल--असें सर्व कांहीं आतां अप्राप्य आहे व अशक्य आहे. म्हणून मी साध्या क्षुद्र गोष्टीच करीत बसतो, कधीं हंसत गंमतीच्या गप्पा

मारतों. कांहींतरी मनाला करमणुक करून घेतो. आशा, श्रद्धा व निश्चय तिन्हींचें बळं मजजवळ नाहीं. तिन्ही बाबतींत सारखाच भिकारी मी आहे. एक मात्र आहे कीं माझा दुबळेपणा कधीं कधीं निराश औदासीन्याचें रूप धारण करतों, तर कधीं त्यांत उत्साही व समाधानी, आनंदी व उल्हासी शांत वृत्ति असतें. तथापि माझे वाचणें, बोलणें, शिकवणें, लिहिणें सर्व कांहीं चालूच आहे-परंतु निष्पन्न पूज्य. जणूं मी झोपेंत एखाद्यानें चालावें, त्याप्रमाणेंच सर्व क्रिया करीत असतों. माझ्यामध्यें एक प्रकारची बुद्धधर्मातील निर्वाणाची वृत्ति आहे. स्वतंत्रपणें, स्वतःचें जीवनाला वळण म्हणून मला देतां येत नाहीं. माझ्या जीवनांत नीट व्यवस्था मी लावण्याच्या भानगडींत पडत नाहीं. ही वृत्ति माझ्या कर्मशक्तीला मारते-दुबळी करते. आत्मविश्वासाच्या अभावानें सर्व इच्छा मरून जातात आणि मी पुनः पुन्हां एकप्रकारें नास्तिक निराशवादी होतों-सर्व गोष्टींबद्दल मी सतत शंकाच घेतों जें महत्त्वाचें आहे, सत्यमय आहे त्याबद्दच मी काळजी दाखवतों; माझा स्वतःचा किंवा परिस्थितीचा मी इतर दृष्टीनें विचारच करीत नाहीं. माझें व्यक्तित्व, माझ्या इच्छा, माझे कल, माझ्यांतील वैशिष्ट्य, माझे गुणधर्म, माझ्या देणग्या-यांना मी फार कमी मानतों-तुच्छ व स्वस्त मानतों -कमी किंमतीच्या मानतों. जें सर्वसुंदर आहे व सर्वपूज्य आहे तें सतत डोळ्यासमोर ठेवून मी मला सदैव तुच्छ मानतों थोडक्यांत माझ्या हृदयांत असें कोणीतरी आहे कीं जें मला तूं तुच्छ आहेस असें सांगत असतें. माझा पाणउतारा करणारें कोणी माझ्या हृदयांत नेहमीं असतें. आणि यामुळें जीवनांतील उत्साह नाहींसा झाला-रंग निघून जाते--कळ पडून जाते- उड्या थांबतात.

× × ×

१७५

आज संध्याकाळीं चार्लस हीमबरोबर वेळ गेला. आजपर्यंत माझ्या साहित्यविषयक कामगिरीसंबंधीं--माझ्या साहित्यविषयक लायकीबद्दल त्यानें कधींच मला शाबासकी दिली नाहीं--गौरवानें माझा उल्लेख केला नाहीं.

परंतु ज्या अर्थी माझें त्याच्यावर प्रेम आहे व मी त्याला मानतों--त्याअर्थी मी त्यांना क्षमा करणें माझें कर्तव्य आहे--मी तें मनांत ठेवतां कामा नयें. त्यानें माझी जरा स्तुति करावी असें मला कां बरें वाटतें ? आत्मश्लाघेनें? नाहीं. यांत आत्मश्लाघा किंवा आत्मस्तुतीचा यत्किंचितही संबंध नाहीं. तर इतक्या चांगल्या मित्राकडून शाबासकी मिळण्यांत मोठा आनंद असतो. आपल्या मित्रानें आपणांस चांगलें म्हटलेलें ऐकण्यांत एक प्रकारची अपूर्व गोडी असते. म्हणून आपल्या बाबतींत कांहीं न बोलून--कांहीं मत प्रदर्शित न करून जेव्हां दुसरा नापसंती दर्शवतो तेव्हां फारच निराशा व निरुत्साह वाटतो. माझ्या मित्राला समाधान होईल असा मी प्रयत्न करीन; जें पुस्तक त्याला व शेरर्‌लाही आनंद देईल असें लिहिण्याचा प्रयत्न करीन--कोणतें असें पुस्तक लिहितां येईल त्याचा विचार करीन.

× × ×

१७६

जिन्यांत मला एक लहान पिंवळसर रंगाचें मांजराचें पिलूं सांपडलें. तें कुरूप, घाणेरडें व दीनवाणें होतें. मी त्याला उचलून घेऊन आलों. माझ्या जवळ असलेल्या खुर्चीत तें आतां गुरंगुटी करून राहिलें आहे; तें पूर्णपणें आतां सुखी आहे असें दिसत आहे. त्याला आणखी कांहीं जणुं नको होतें फक्त कोणीतरी प्रेमानें आपणांस उचलून आणावें एवढेंच जणुं त्याला पाहिजे होतें. आतां कांहीं केल्यानें तें मला सोडीत नाहीं; तें आतां जणुं एकदम माणसाळलें आहे; सर्व दिवसभर तें माझ्या पाठोपाठ पाठोपाठ येत होतें. या खोलींतून त्या खोलींत मी गेलों तर तेंही पाठोपाठ येई. घरांत खाण्यास योग्य असें कांहींच नाहीं; परंतु जें कांहीं मला देतां येणें शक्य आहे, जें माझ्याजवळ आहे- तें मी त्याला देतों--त्याच्याकडे प्रेमानें पाहणें व त्याला जवळ घेणें--कुरवाळणें याहून दुसरें मजजवळ काय आहे ? आणि याक्षणीं तरी त्याला एवढें पुरें आहे असें दिसत आहे. जणुं प्रेमाचेंच तें भुकेलें आहे. लहान प्राणी, लहान मुलें, पशुपक्ष्यांचीं पिलें, लहान

जगांत नुकतेच आलेले जीव--यांना सर्वांना संरक्षणाची जरूर सारखीच असते; प्रेमाची व सहानुभूतीची त्यांना जरूर असते......अशक्त व दुबळया जीवांस माझ्या संगतींत सुख होतें, आनंद वाटतो असें माझे मित्र मला म्हणतात. मनुष्य जेव्हां सहृदय असतो, त्याच्या हृदयांत सहानुभूति अनुकंपा यांचा जेव्हां पूर आलेला असतो तेव्हां असें कांहीं एक आकर्षण, अशी कांहीं एक शक्ति त्याच्यांतून प्रकट होत असते कीं जी गरीब जीवांस सुखवते व आनंदविते--हा मनुष्य आपला आहे असें त्या अनाथ व दुबळया जीवांस जणुं वाटत असतें. अशा प्रकारची एक शक्ति माझ्यांत आहे असा मला कधीं कधीं प्रत्यक्ष अनुभवही येतो; ती एक स्वाभाविक नैसर्गिक जणुं मला मिळालेली देणगी आहे. तिचा मला अभिमानही नाहीं किंवा ती शक्ति जणुं माझी मिळकत आहे, माझ्या मालकीची आहे असेंही कधीं मला वाटत नाहीं. चर्चमध्यें असलेल्या एखाद्या पुतळयाच्या डोक्यावर ज्या प्रमाणें पक्षी घरटीं बांधतात, त्याप्रमाणें माझ्या दाढींत तीं आपलीं घरटीं बांधतील असें मला वाटतें; इतकें त्यांचें मन मी ओढून घेईन--मोहून घेईन--इतकें त्यांना आपलेसें करून घेईन असें मला वाटतें. एकंदरींत पाहिलें तर सर्व खालच्या प्राण्यांकडे पाहण्याची हीच मनुष्याची स्वाभाविक दृष्टि असावी. असाच प्रेमाचा संबंध असावा. मनुष्य जसा पाहिजे होता तसा जर तो असता तर पशुपक्ष्यांनीं त्याची पूजा केली असती; त्यांना माणसाचा लळा लागला असता; माणसाचे ते भक्त बनले असते; मनुष्य त्यांचा देव झाला असता. परंतु आज मनुष्य त्यांना मारण्यांत, त्यांचें रक्त सांडण्यांतच आनंद मानीत आहे. वाटेल तेव्हां लहर लागेल तेव्हां तो त्यांची शिकार करील, किंवा मारील, त्यांचे हाल करील, सेंट फ्रॉन्सिसच्या दंतकथा ज्या आपण ऐकतों व वाचतों त्या काल्पनिकच असतील असें नाहीं. खरोखर सर्प त्याच्या अंगावर खेळत असतील, त्याच्यावर प्रेम करीत असतील. मनुष्यावर रानटी पशूंनींच प्रथम हल्ला केला कीं मनुष्यांनीं त्यांच्यावर पहिल्यानें तरवार उपसली हें सांगतां येणार नाहीं—परंतु अतिशयोक्ति नको; क्रूर श्वापदें आपण सोडून देऊं; मांसभक्षक पशूंची गोष्ट सोडून देऊं; परंतु त्यांच्याशिवाय

अशा कितीतरी पशुपक्ष्यांच्या जाती आहेत, हजारों व लाखों आहेत, ज्या मानवापासून शांतीची, प्रेमाची व सहानुभूतीची अपेक्षा राखीत असतात. परंतु आपण तर त्यांच्याबरोबर लढाइच सतत चालवली आहे. क्रूर व निष्ठुर झगडाच त्यांच्याजवळ चालवला आहे. सर्वांत संहार करणारी जात असेल तर ती मानव जात होय; मानव जातीसारखी अपाय करणारी, सर्व भक्षक अशी दुसरी कोणतीहि जात नाहीं. या पृथ्वीवरील सर्व प्राण्यांत इतकी बलवानहि दुसरी जात नाहीं. या मानव जातीनें पुन्हां बळी तो कान पिळी हा नियमही स्वतःचे कृत्यांचे समर्थन करण्यासांठीं शोधून काढला आहे. ह्या हक्काला ते दैवी हक्क मानतात. जित व पददलित लोक समोर दिसत असतांहि सद्सद्विवेक बुद्धीस कांहीं वाटत नाहीं; जें जें या पृथ्वीवर चेतन आहे त्या सर्वांचा स्वतःच्या शिवाय मानवानें फन्ना उडवला आहे; त्या त्या सजीव वस्तूला कायदेबाह्य ठरविलें आहे. स्वतःच्या बुद्धीचा व सामर्थ्याचा हा उघड उघड दुरुपयोग आहे. ईश्वराविरुद्ध हें बंड आहे. ही घाणेरडी गोष्ट आहे. शोभत नाहीं. न्यायाचा हा धडधडीत खून आहे; एकदां हें उदाहरण पडले, ही प्रथा पडली म्हणजे सर्व सत्ताधीश त्यांचे अनुकरण करतात, सर्व चोर व लुटारू त्यांचे भक्त बनतात, या पंथाचे होतात ही समजूत दुष्ट आहे. दंभमय आहे. पुन्हां ईश्वरही आपल्याच बाजूचा आहे असेंही आपण म्हणतो; त्यालाहि आपण लुटालुटीच्या व खुनाखुनीच्या कामांत सामील करून घेतों; आणि अशाप्रकारें जे अन्याय आपण करतो त्याचे कायदेशीरत्व प्रस्थापित करतों. जी जी कत्तल केली जाते. तिला आशीर्वाद देणारे धर्मगुरू कोणी ना कोणी तरी आढळतातच; ज्या पापाला यश आलें, जो दुष्टपणा विजयी झाला त्याला आशीर्वाद देणाऱ्या धर्मगुरुंचा दुष्काळ नाहीं. प्रथम मनुष्य पशूंना मारूं लागला; स्वतःच्या शक्तीनें व साधनांनीं मनुष्येत्तर प्राण्यांचा संहार करूं लागला, त्यानंतर राष्ट्रें राष्ट्रें स्वतःच्या बाबतींत हाच नियम अंमलांत आणूं लागली, मनुष्यामनुष्यांतही ह्याच नियमाचे अवलंबन होऊं लागलें.

याचें प्रायश्चित्तही आपणांस मिळत असतें व तें अत्यंत न्याय्यही असतें. जें जें केलें तें भोगलेंच पाहिजे; केलेलें पाप निस्तरलें पाहिजे; त्याचें

प्रायश्चित्त घ्यावेंच लागणार. मनुष्यानें इतर सजीव प्राण्यांवर, दुबळ्या जीवांवर जे निर्दय अत्याचार केले, जे त्यांच्यावर जुलुम लादले, त्यांचें फळ म्हणजेच निरनिराळ्या ठिकाणची गुलामगिरी हें होय. बळी तो कानपिळी--ही जी विचारसरणी--तिचीं हीं फळें. स्वतःचें संरक्षण करण्यासाठीं व स्वतःचें पोषण करण्यासाठीं फार तर मनुष्यानें पशूंवर सत्ता चालवावी. परंतु कारण नसतां प्राण्यांना मारणें, त्यांचे हालहाल करणें म्हणजे रानटीपणा होय--तें पाप आहे--घोर अपराध आहे. प्राणीही माणसाच्या उपयोगी पडतो; माणसानेंही त्याचा कृतज्ञतेनें सांभाळ करावा- त्याच्यावर प्रेम करावें. सारांश, पशूनें माणसाच्या उपयोगी पडावें व माणसानेंही पशुसंबंधींचें आपलें कर्तव्य करावें. बुद्धधर्मात भूतदयेची अतिशयोक्ति केली आहे- तर पाश्चिमात्यांनीं तिला अजिबात फांटा दिला आहे. परंतु एक दिवस येईल, ज्या दिवशीं मानवी-जीवन उच्चतर होईल. आपलीं माणुसकी आपणांस इतर गोष्टी करावयास लावील. एक दिवस येईल - ज्या दिवशीं मनुष्य लांडग्यावरही प्रेम करील.

× × ×

१७७

बौद्धिक स्वातंत्र्य राखायचें असेल तर कशावरही श्रद्धा ठेवूं नका असा सर्व बुद्धिमान् तरुणांचा दृष्टिकोन आहे. कशावरही विश्वास न ठेवणें म्हणजे मानवाचें परम भाग्य असें त्यांना वाटतें. पूर्वीपासून आलेल्या सर्व समजुती, सर्व मतें, सर्व विचार यांपासून अजिबात मुक्त होणें--यांत मोक्ष नसून याचा परिणाम शेवटीं गुलामगिरींत होईल असें मला वाटतें. याचा परिणाम स्वातंत्र्य नाश होईल. आज संध्याकाळीं आमच्यांतील अत्यंत सुसंस्कृत व विद्वान लोकांचे संभाषण मी ऐकत होतो, त्या वेळेस नवयुग, टॉलेमीचा काळ, पंधराव्या लुईचा काळ हें सर्व माझ्या डोळ्यांसमोर आले; या काळांत बौद्धिक स्वातंत्र्य—कोणी कोणास मानूं नये असा काळ होता—तर याच काळांत त्या त्या देशांत अनियंत्रित सत्ताधीशांची सत्ता होती.

याच्या उलट इंग्लंड, हॉलंड, अमेरिका--यांनीं स्वातंत्र्य मिळवलें--परंतु त्यांनीं तें पूर्वपरंपरा, पूर्वीचें आवश्यक समज व कल्पना या न सोडल्या-मुळें मिळवलें तें राखून स्वतंत्र झालें.

समाज एकत्र रहावा म्हणून कांहींतरी ऐक्यतत्त्व--कांहींतरी अशी एक गोष्ट असली पाहिजे--जी सर्व मानतील--जिच्याभोंवतीं सारे जमतील. एक प्रकारची सर्वांना व्यापून उरेल अशी श्रद्धा हवी. जी तत्त्वें सर्व-मान्य आहेत, ज्यांच्याबद्दल वाद नाहीं असें कांहींतरी असलें पाहिजे, कांहीं व्यावहारिक सत्यें कांहीं सामाजिक संस्था ज्या बहुजनसमाजाच्या प्रत्येक लहरीबरोबर नाहींशा होणार नाहींत- तर सर्व झंझावातांतून टिक-तील--अशीं असलीं पाहिजेत. प्रत्येक गोष्ट चर्चात्मक आहे असें मानून आपण सर्वच धोक्यांत आणतों. संशय हा दास्याचा मित्र आहे. "राष्ट्र जर श्रद्धा राखणार नाहीं तर त्याला आज्ञापालक झालें पाहिजे. जें राष्ट्र कांहीं मानीत नाहीं त्याला दुसऱ्याचें हुकूम मानावे लागतील," असें टॉक्विहिले म्हणत असे. स्वातंत्र्य म्हटलें कीं त्यांतही परतंत्रता असतेच. बंधना-शिवाय मोक्ष नाहीं. स्वातंत्र्याला सुद्धां कांहीं गोष्टी मानाव्या लागतात. परंतु ही गोष्ट सर्व संशयवादी वादविवादक लोक विसरतात. धर्म आपण भिरकावून देऊं असें ते मानतात--परंतु धर्म हा अविनाशी वस्तु आहे हें त्यांना माहीत नाहीं. म्हणून प्रश्न एवढाच आहे कीं तुम्हांला काय पाहिजे? धरसोड करण्यांत अर्थ नाहीं, त्यांत शांतीं नाहीं. बुद्धिस्वातंत्र्य का श्रद्धा? हा प्रश्न आहे. याचें उत्तर हेंच कीं धर्म असावा परंतु तो लादलेला नसावा; स्वतःच्या हृदयाला पटलेला असा धर्म असावा.

× × ×

१७८

माझ्या जीवनाचे बिंदु आ पसरून बसलेल्या अनंततेच्या दरीच्या तोंडांत पडतांना मला स्पष्ट ऐकूं येत आहेत. पाठलाग करीत येणाऱ्या मृत्यु-व्याधाच्या-समोर माझे दिवस सैरावैरा पळत आहेत याचा मला अनुभव

येत आहे. जें कांहीं आठवडे, कांहीं महिने, जीं कांहीं वर्षें अजून माझ्या वांट्यास असतील, सूर्याचा प्रकाश पिण्याला जो कांहीं काळ अजून शिल्लक असेल तो मला एका रात्रींइतकाच वाटत आहे; एका रात्रीहून जास्त नाहीं. तीही उन्हाळयांतील रात्र–लहानरात्र–जी केव्हां येते व जाते-समजतही नाहीं.

मरण ! विराम–विश्राम ! अनंतता ! काय गूढें आहेत–हे शब्द कसे भिववतात; ज्यांना सुखाची, अमृतत्वाची, पूर्णतेची आकांक्षा आहे–त्यांना हे शब्द कसे भयंकर वाटतात ! उद्यां मी कोठें असेन ? उद्यां कशाला–आणखी कांहीं क्षणानंतर कोठें असेन ? शेवटचा श्वास संपतांच कोठें असेन–माझें काय होईल ? कीं ज्यांच्यावर प्रेम करतों, ते कोठें असतील ? आपण सारीं कोठें जात आहोंत ? अशा प्रकारचे हे चिरंतन प्रश्न अत्यंत गंभीरपणें डोळ्यासमोर उभे राहतात. जिकडे पहावें तिकडे गूढ–सारें कोडें-माया. थांग ना पत्ता. या अशा साऱ्या अंधःकारांत व अनिश्चिततेंत श्रद्धेचाच फक्त तारा एक धीर देत असतो.

कांहीं हरकत नाहीं ! जोंपर्यंत जग हें परममंगल अशी एक वस्तु आहे, परममंगलानें तें निर्माण केलें आहे, जोंपर्यंत सद्सद्विवेक बुद्धीनें मला फसवलें नाहीं–मला सोडलें नाहीं–तोंपर्यंत कांहीं फिकीर नाहीं–; दुसऱ्यास सुख देणें व चांगलें करणें; हा एकच मंत्र–एकच नियम; आपला आधारस्तंभ हाच; दीपस्तंभ हाच. आपल्या गलबताचा नांगर हाच; जिवंत रहायचा हेतु एवढाच. बाकी सारे धर्म पडतील, झडतील, कोसळतील; परंतु हा साधा सेवाधर्म जोंपर्यंत अबाधित आहे, तोंपर्यंत आपणांस ध्येय आहे, आणि जीवन जगण्यालायक आहे जीवनास किंमत आहे.

प्रेमाचा धर्म, निःस्वार्थतेचा धर्म, त्यागाचा धर्म, भक्तीचा धर्म जोंपर्यंत जगांत आहे, तोंपर्यंत मानवजातीचा मोठेपणा, मानवजातीची किंमत कशानेंही कमी होणार नाहीं; जोंपर्यंत प्रेम करतां येईल असें आपणांस वाटत आहे, प्रेमाची शक्यता जोंपर्यंत आपणांस आहे, तोंपर्यंत या श्रद्धामंदिराला कोणीही विध्वंसू शकणार नाहीं.

× × ×

१७९

फ्रेंच लोक फ्रान्स म्हणजेच सर्वस्व मानतात. फ्रान्स म्हणजेच जगाचा मध्यबिन्दु. इतर देश–इतर देशांच्या भाषा इतर देशांचे विचार इकडे फ्रेंच लोक फारसें लक्ष देणार नाहींत. सामान्य फ्रेंच मनुष्य जरी त्याच्याजवळ नैसर्गिक चलाखपणा व हुशारी थोडीशी असली तरी तो बावळटच असतो. त्याचा बावळटपणा त्याला भूषण वाटत असतें–ही आणखी मजा. त्याला स्वतःशिवाय बाकी कांहीं समजत नाहीं. पॅरिस म्हणजे त्याचा देव. त्याचें सारें जीवन पॅरिसभोंवतीं फिरत असतें. पॅरिसमधल्या चालीरीती, पॅरिसमधल्या आवडीनावडी, पॅरिसमधल्या फॅशन्स हें त्याला माहीत असतें, पॅरिसप्रमाणें सर्वत्र नक्कल होत असतें. एका मूळच्या अस्सल प्रतीच्या लाखो नकला आपणांस फ्रान्समध्यें मिळतील. फ्रेंच लोक म्हणजे गिरणींतील बॉबिनप्रमाणें पॅरिसभोंवतीं फिरत असतात याचा परिणाम आश्चर्यकारक वाटेल–परंतु तो कंटाळवाणा होईल. व्यावहारिक फायद्याच्या दृष्टीनें आश्चर्यकारक–मनाच्या विकासाच्या दृष्टीनें कंटाळवाणा व नीरस. एक लाख मेंढ्या जमवल्या म्हणून त्यांची अक्कल एका मेंढीच्या अकलेहून जास्त झाली असें थोडेंच आहे; परंतु अक्कल वाढली नाहीं तरी लोंकर, मांस, खत मात्र लाख पटींनीं वाढलें एवढें खरें. धनगराला मग दुसरें काय पाहिजे असतें?–असें तुम्ही म्हणाल. ठीक आहे. परंतु अशा विचारसरणीप्रमाणें शेतें पिकवतां येतील किंवा अनियंत्रित झारशाह्या मिळतील; परंतु लोकसत्ता जर चालवायची असेल–तर तेथें मेंढरें उपयोगाचीं नाहींत.–तेथें माणसें पाहिजेत. ज्यांना कांहीं व्यक्तित्वच नाहीं अशा लोकांवर रिपब्लिक कसें टिकणार?

× × ×

# विषय सूचि

| विषय | पृष्ठ |
|---|---|

| विषय | पृष्ठ |
| --- | --- |

# शुद्धीपत्र

[ अनुस्वारांच्या, ऱ्हस्वदीर्घांच्या, विरामचिन्हांच्या शेंकडों चुका आहेत. त्या वाचकांनीं क्षमाव्या. येथें अर्थाच्या दृष्टीनें महत्त्वाचें असें वाटलें तेवढेंच शुद्धिपत्र देत आहें. सदसद्विवेकबुद्धि हा शब्द सर्वत्र सद्‌सद्विवेकबुद्धि असा छापलेला आहे. या शब्दाची शुद्धि एकदां खालीं दिली आहे. सर्वत्र वाचकांनीं ती करावी. पुस्तकांतील अपरंपार अशुद्धतबद्दल मी वाचकांची क्षमा मागतों. दुसरें माझ्या हातांत काय आहे ! ]

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७ | ७ | त्रियांतून | क्रियांतून |
| ७ | १२ | मतावर | मनावर |
| ८ | ७ | लिलेक | लिलॅक |
| १० | ८ | दिसत होते. चमकत होते, | दिसत होते, चमकत होते. |
| १० | ११ | होतें | होतें. |
| ११ | २ | भणभर | क्षणभर |
| ११ | १४ | मानव | मानवी |
| ११ | २२ | घर्मावर | धर्मावर |
| ११ | ११ | विचारभिंगातून | विचार-भिंगांतून |
| १२ | २७ | म्हणजे विजय | म्हणजे भिंतीवर विजय |
| १४ | ३ | प्रायेक | प्रत्येक |
| १६ | ५ | बोधवाक्य, | बोधवाक्य. |
| १८ | १६ | गोष्टींच्या | गोष्टींचा |
| १९ | २० | एमिलियो | एमिलिया |
| २० | ९ | सद्‌भि | सदाभि |
| २० | १६ | असद्‌भि | असदाभि |
| २१ | १८ | विचार जाणें | विचार-नाणें |
| २२ | २३ | सद्‌सद्विवेक | सदसद्विवेक |
| २२ | २५ | ,, | ,, |
| २३ | १ | आभ्यासाचा | अभ्यासाचा |
| २३ | ४ | तिरस्कारणीय | तिरस्करणीय |
| ,, | २० | सद्‌साद्विवेक | सदसद्विवेक |
| २४ | ६ | अंतरिक | आंतरिक |
| २६ | ७ | सोडण्यासाठीं | सोडविण्यासाठीं |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३१ | ५ | निरभ्न | निरभ्र |
| ३३ | १४ | अवयवांचें | अवयवींचें |
| ३४ | १४ | साणसांचे | माणसाचें |
| ३५ | १० | जागामध्यें | जगामध्यें |
| ,, | २२ | आनंदता | आनन्तता |
| ३५ | १५ | स्वभाविक | स्वाभाविक |
| ३५ | १७ | आदिभौतिक | आधिभौतिक |
| ३६ | ८ | उत्साहप्रत | उत्साहप्रद |
| ,, | १८ | निशीथल | निशीथ |
| ,, | १९ | निशें | निशे |
| ३८ | १५ | ती | तीं |
| ,, | १७ | लेंकरानो देवाच्या | देवाच्या लेंकरानो |
| ,, | २२ | रुपकें | रूपकें |
| ,, | २३ | झाले | उसळलें |
| ४० | ११ | जपलें | जपला |
| ४१ | १० | किर्तीपासून | कीर्ती |
| ४१ | २१ | कड | पूड |
| ४२ | १९ | हा | हीं |
| ४२ | ३ | दंवबिंदु सिंधूत | दंवबिंदु-सिंधूत |
| ४३ | ७ | तत्त्वज्ञानाच्या | तत्वज्ञान्याच्या |
| ४४ | २३ | खोलिहि | खोलीहि |
| ४६ | ९ | माझ्या | त्यामुळें माझ्या |
| ४६ | २० | द्युतांत | द्युतांत |
| ४७ | २३ | अनंततेत | अनंततेस |
| ४८ | २४ | मुसा | मूसा |
| ४८ | २८ | प्रत्येकाच्या | प्रत्येकाला |

| पृष्ट | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५० | १ | समाधिस्त | समाधिस्थ |
| ५३ | १ | रुंजी | रुंझी |
| ५३ | २१ | एकहि | एकाहि |
| ५६ | १ | सुगारस्व | सुपारस्व |
| ५६ | २ | मनाप्रमाणें | मताप्रमाणें |
| ५७ | ५ | आणूं नका | आणूं नको |
| ५८ | १७ | त्या | ज्या |
| ५९ | १९ | अनौतिक | अनैतिक |
| ५९ | २४ | झालें | झालेले |
| ६२ | ९ | गुंगायचें | गुंतायचें |
| ६३ | २२ | देवद्वार | देवदार |
| ६४ | ८ | नि | नि आंत |
| ६४ | १४ | अविष्करणार्थ | आवि |
| ६५ | ६ | उच्चत्तम | उच्चतम |
| ६५ | २६ | सधर्म | स्वधर्म |
| ६७ | ४ | मन | मग |
| ६८ | २२ | आशांस | आशंका |
| ,, | २३ | उत्सहास | उत्साहास |
| ६९ | ४ | प्रभावी असतें | प्रभावी झालें असतें |
| ७० | ५ | हजारच | कांहीं |
| ७० | १० | आतां | आतां हल्लीच्या काळीं |
| ७० | २६ | विमागणी | विभागणी |
| ७१ | १३ | बहुजन | बहुजनसमाज |
| ७१ | २२ | जरींची | परींची |
| ७२ | १ | त्यांचा | त्यांना |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७२ | ४ | जरींचें | परींचें |
| ७५ | १ | गुढतेचें | गूढतेचें |
| ७६ | ११ | असतील | असेल |
| ७७ | १ | प्रवृत्यानुसार | प्रवृत्त्यनुसार |
| ७७ | ९ | यता | याता |
| ७७ | ८ | स्वार्गा | स्वर्गा |
| ७७ | १२ | प्रमातकाळीं | प्रभातकाळीं |
| ७८ | २० | कलावान् | बळवान् |
| ७९ | १० | एवरूप | एकरूप |
| ७९ | २४ | वाट | वाढ |
| ८१ | २७ | ऐक्यता | एकता |
| ८८ | ३ | वज्रमान | वज्रसमान |
| ८८ | २२ | मन | मग |
| ९१ | २१ | करील | करीत |
| ९५ | १९ | अंधारभीरत | अंधारभरित |
| ९५ | २५ | पक्षपाततीत | पक्षपातातीत |
| ९९ | १६ | बुन्दुदसम | बुद्बुदसम |
| १०० | १९ | वाच्यता | वाचाळता |
| १०३ | ४ | प्रार्थना सुख | सुख |
| १०६ | ९ | उद्गारलें | उद्गारलों |
| १०८ | २२ | स्वमावही | स्वभावहि |
| १०९ | २४ | संज्ञा | संवेदना |
| ११२ | २२ | सुगाव्यानी | सुसकाऱ्यांनीं |
| ११५ | ११ | शक्तीचा | शक्तीच्या |
| ११५ | १७ | गुह्य | गूढ |
| ११७ | १४ | निर्बंध | आनर्बंध |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११९ | १८ | ती | जी |
| १२१ | १ | बदलतें | बदललेलें |
| १२३ | २ | संबंध | संबद्ध |
| १२३ | १३ | वक्त्व विगयक | वक्तृत्वविषयक |
| १२४ | १५ | करण्याप्रमाणें | करण्यापेक्षां |
| ,, | १५ | एवढेंच | एकटेंच |
| १२५ | १५ | लाब्निट्झ् | लायब्निट्झ् |
| १३० | ४ | अधिष्ठाची | अधिष्ठात्री |
| १३३ | ४ | सभ्द्रा | सद्धा |
| १३५ | १९ | जव्हर्टच्या | जव्हर्ट |
| १३६ | २० | लकवा | लकबा |
| १४३ | २२ | मिळविणारें | भिवविणारें |
| १४६ | ९ | प्राण | प्राप्य |
| ,, | १० | प्राण्याचा | प्राप्याचा |
| ,, | १० | तत्पर | तयार |
| १४८ | १ | स्वतःसि | स्वतःस |
| १४९ | ४ | कृत्रियता | कृत्रिमता |
| १५० | १९ | चेस्टवटर्ची | चेस्टनटर्ची |
| १५१ | ३ | मधूरता | मधुरता |
| १५२ | १२ | विधोत्पत्तीच्या | विश्वोत्पत्तीच्या |
| ,, | १६ | दिक्कामार्ची | दिक्कालार्ची |
| १५४ | ५ | श्र्द्धेंतून | श्रद्धेंतून |
| ,, | १४ | दिक्कामांत | दिक्कालांत |
| ,, | २३ | नांव | नाव |
| ,, | २४ | कापली जाते | झांकली जाते |
| १५५ | ३ | जेथल्या | तेथल्या |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १५५ | २४ | अमूतांत | अमूर्तांत |
| १५७ | ३ | अनभवी | अननुभवी |
| १५८ | ५ | भ्रमनिराश | भ्रमनिरास |
| १५८ | १४ | या गोष्टींनींच | या गोष्टींशिवाय |
| १६० | ६ | वाद | नाद |
| १६१ | २ | कष्टि | व्यष्टि |
| ” | ” | अंशा | अंश |
| ” | २१ | यांना | यांच्या |
| १६२ | २३ | परमेश्चर | परमेश्वर |
| ” | २५ | योग्ययोग्या | योग्यायोग्या |
| १६३ | १ | विरोधी भास | विरोधाभास |
| ” | १२ | हृदयाशी | हृदयाची |
| १६४ | ३ | प्रज्ञ | प्राज्ञ |
| ” | ४ | स्यं | स्य |
| ” | ५ | जगलां | जगत्यां |
| ” | १२ | भिती | भित्री |
| ” | २४ | अनंत अशी | अनंततेशी |
| १६५ | १ | असानता | असमानता |
| १६६ | २८ | का येईना | का न येईना |
| १६७ | ५ | विचारकती | विचारकर्ता |
| ” | २३ | सव | सर्व |
| १६८ | २५ | सात | सान्त |
| १६९ | ३ | निरपेक्षना | ही निरपेक्षता |
| १७० | १४ | झागझगीत | झगझगीत |
| ” | १५ | रुपांत | रूपांत |
| ” | १६ | शकच | शद्धच |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १७० | १९ | ऋतूच | ऋतूंत |
| ,, | २० | खरें असतें असें | सारेंच असें असतें. |
| ,, | २१ | रुपें | रूपें |
| ,, | ,, | दान | दोन |
| १७० | २२ | एकरुप | एक रूप |
| १७१ | ११ | दिमाख | दिखाऊ |
| ,, | १७ | शकांत | शब्दांत |
| १७२ | ८ | सात | सान्त |
| ,, | २५ | बादित | बाधित |
| १७३ | ६ | रागरागीत | रागरागिणींत |
| ,, | ११ | तळाचीं | तळाशीं |
| ,, | १७ | वस्त | वस्त्र |
| १७४ | १ | असत | असतें |
| १७६ | २३ | ही | ह्या |
| १७७ | १२ | कोठें राहिला | किंमत कोठें राहिली |
| १८० | ४ | द्दष्टीवर | सृष्टीवर |
| ,, | ३ | पसरतो | पसरते |
| १८१ | २१ | कृतघ्न | कृतज्ञ |
| ,, | २६ | जामांत | जोमांत |
| ,, | २६ | होतों | येत होतों. |
| १८२ | ९ | कीं | कीं मला टाकूं नकोस |
| ,, | १४ | शद्बांत | शब्दांत |
| १८३ | २१ | माझें | माझ्या |
| १८४ | ४ | सकळ | सकल |
| ,, | ६ | आसमंताच्या | आसमंतातच्या |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १८४ | २१ | पक्षाचें | पक्ष्याचें |
| १८६ | १० | त्या जगाला | तितक्या जगाला |
| ,, | २२ | द्वेवापेक्षां | द्वेषापेक्षां |
| १८७ | २१ | अश्वि | आधि |
| १८८ | १४ | शार | भार |
| ,, | १८ | येते | येतात |
| १९० | ३ | लघुशब्द | अल्पशब्द |
| ,, | ११ | प्रौढन | प्रौढाँ |
| ,, | १३ | बिषप | बिशप |
| ,, | १४ | स्खलिनता | स्खलितता |
| १९१ | १८ | चित | चीत |
| १९२ | २३ | बाबरन | बायरन |
| ,, | २३ | पॅटोब्रॅड | चॅटोब्रॅड |
| १९८ | ३ | अमर | आन्तर |
| ,, | ४ | ,, | ,, |
| १९९ | ३ | विशुव | विषुव |
| २०२ | ४ | जसा | जरासा |
| ,, | ५ | माझा | माझ्या |
| ,, | २६ | विचाररमतांच | विचार-रतताच |
| २०५ | १० | बिनम्र | विनम्र |
| २०५ | १३ | अशा | अशी |
| ,, | २३ | देवताचं | देवतार्चना |
| ,, | २४ | जाण्याला | जाण्याचा |
| ,, | २७ | ठरला | उरला |
| २०६ | १४ | आकपट | अकपट |
| ,, | १८ | परित्रात्यांत | परिवारांत |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २०७ | ६ | संस्कृत | सुसंस्कृत |
| २०८ | १७ | आनुशंगिक | आनुषंगिक |
| २०९ | २ | धनकन | धनकनक |
| २१० | ७ | आपणांस | आपणांत |
| २११ | ४ | सगान | समान |
| २१३ | २२ | क्षणीं | त्या क्षणीं |
| २१३ | २४ | शून्य | शून्य. |
| २१४ | ७ | राजाशीं | माझ्याशीं |
| २१५ | ९ | स्वारस्थ | स्वारस्य |
| ,, | ११ | न्याय | न्याय्य |
| २१७ | ८ | निर्वाणीची | निर्वाणाची |
| ,, | २१ | झाला | होतो |
| २२३ | १० | कीं | मी |

